# सुत्तनिपात

पालि ग्रंथ व मराठी भाषांतर

भाषांतरकार
प्रा. धर्मानंद कोसंबी

संपादक
प्रा. पु. वि. बापट

ध र्मा नं द स्मा र क ट्र स्ट

पधारे। हिमवान्ने अहोभाग्य माना और देवर्षिको बड़ी श्रद्धाके साथ सपर्या की।

धर्मानंद साहित्य : ४ :

# सुत्तनिपात

आवृत्ति पहिली १९५

प्रकाशक :
श्री. कमलनयन बजाज
धर्मानंद स्मारक ट्रस्ट
५१ महात्मा गांधी रोड,
मुंबई १.

मुद्रक :
मा. ह. पटवर्धन,
संगम प्रेस, लि.,
३८३ नारायण पेठ,
पुणे २

# अनुक्रमणिका

# प्रास्ताविक चार शब्द

आमचे गुरु प्रा० धर्मानंद कोसंबी ह्यांनी सुत्तनिपात ह्या ग्रंथाचें मराठी भाषांतर विविधज्ञानविस्ताराच्या ६८ व्या वर्षाच्या ( १९३७ च्या ) अंकांत क्रमशः छापून काढलें व त्याला त्यांनी छोटीशी प्रस्तावनाही जोडली होती ती येथें छापली आहे. धर्मानंद स्मारक ट्रस्टच्या पदाधिकाऱ्यांनी त्यांचे ग्रंथ छापून काढण्याची योजना आखली व त्यांनी सुत्तनिपाताचें भाषांतर मूळ पालि ग्रंथासह छापण्याचें ठरविलें. ह्या ग्रंथाचें संपादन करण्यासंबंधीं सुमारें पांच वर्षांपूर्वी माझ्याकडे पृच्छा केली व तें मी मोठ्या आनंदानें कबूल केलें.

पुढें भाषांतर मी मूळ ग्रंथाबरोबर वाचून पाहिलें तेव्हा भाषांतरांत कांहीं दुरुस्त्या आवश्यक आहेत असें मला आढळून आलें. ट्रस्टचे विद्वान् सेक्रेटरी कार्यवाह श्री. पुरुषोत्तम मंगेश लाड, आय्. सी. एस. ह्यांच्या नजरेस मीं ही गोष्ट आणली व त्यांनी मला जरूर ते फेरफार करण्यास परवानगी दिली. ह्यातील बरेचसे फेरफार शाब्दिक आहेत व कांहीं अर्थाचे बाबतींत ही आहेत. शिवाय अर्थ स्पष्ट करण्याकरितां कांहीं टीपाही जोडल्या आहेत.

मूळ पालि ग्रंथाच्या बाबतींत मीं १९२४ सालीं छापलेल्या माझ्या सुत्तनिपाताच्या देवनागरी आवृत्तीचाच मुख्यतः उपयोग केला आहे. त्यातील सुत्तनिपाताच्या ग्रंथाशीं विचारसाम्य दाखविणारा भाग व अट्ठकथेंतील संक्षिप्त उतारे ह्या आवृत्तींत वगळले आहेत. इतरही किरकोळ फेरफार केले आहेत.

हा मूळ ग्रन्थ छापताना अर्थावबोधास उपकारक अशा कांहीं टाइपाच्या कल्पना ह्या आवृत्तींत योजिलेल्या आहेत. उदाहरणार्थ, पालि भाषेंत दोन स्वरांचे सन्धि होताना कांहीं ठिकाणीं पहिल्या स्वराचा लोप होतो, तर कांहीं ठिकाणीं दुसऱ्या स्वराचा लोप होतो, तर कांहीं ठिकाणीं दोन्ही स्वर मिळून तिसराच स्वर होतो. म्हणून संस्कृत सन्धीहून भिन्न सन्धि

पाहून वाचक बुचकळ्यात पडतो ज्या ठिकाणीं पहिल्या स्वराचा लोप, इतर कांहीं फेरफार न घडविता, झाला असेल, त्या ठिकाणीं त्या अक्षराच्या खालीं बिन्दु दिला आहे उदाहरणार्थ—महिया + एकरत्तिवासो = महियेकरत्तिवासो ( १९ ), येन + इञ्छिक = येनिञ्छक ( ३९ ), न + एति = नेति ( ०२५ ), अनेजो + अस्स = अनेजस्स ( ९२१ ), बहुजागरो + अस्स = बहुजागरस्स (९७२), हि + अञ्ञदत्थो + अत्थि = हञ्ञदत्थत्थि ( ८२८ ) ज्या ठिकाणीं दुसऱ्या स्वराचा लोप झाला असेल व तो स्वर 'अ' खेरीज अन्य असेल, तर त्या स्वराचा लोप शिरोरेखेमध्यच टिंब देऊन दाखविला आहे 'अ' स्वर असेल तर संस्कृतप्रमाणेंच अवग्रहाची खूण वापरली आहे. उदाहरणार्थ वो + इध = वो ध ( १७३ ), दिट्ठे + एव = दिट्ठे व (२४३), सुदुत्तर + इति = सुदुत्तर ति (३६८) पण सुसुक्दाठो + असि = सुसुक्दाठोऽसि (५४८), एते + अपि = एतेऽपि (८६८). हा सन्धि होताना मागच्या स्वरात कांहीं फरक घडून आला असल्यास ह्या बिन्दूचें चिन्ह वापरलेलें नाहीं करेय्या + इति = करेय्या ति ( ९० ), सद्धा + इध = सद्धीध ( १८२ ), ब्रह्मलोक + उपगो = ब्रह्मलोकूपगो ( १३९ ), थोडक्यात म्हणजे स्वराचा केवळ लोप झाला हें दाखविण्याकरिताच ह्या बिन्दूची योजना केलेली आहे संस्कृतच्या नियमाप्रमाणेंच सन्धि झाला असल्यास ही योजना केलेली नाहीं

गुरुवर्यांनीं आपल्या प्रस्तावनेच्या शेवटीं म्हटल्याप्रमाणें संस्कृतज्ञ पण पालि न जाणणाऱ्या लोकांनाही ह्या प्रसिद्ध होत असलेल्या ग्रंथामुळें पालि जाणण्याचें बाबतींत फारच मदत होईल कारण ह्या ग्रंथामध्यें मूळ पालि ग्रंथ वर व खालीं लगेच त्याचें मराठी भाषांतर असल्यामुळें मूळ ग्रंथाचें आकलन होण्यास फारसे सायास पडणार नाहींत गुरुवर्यांनीं पालि भाषेच्या ज्ञानाचा प्रसार करण्याकरिता किती कष्ट केले हें त्यांचें आत्मचरित्रपर 'निवेदन' ज्यांनीं वाचलें असेल त्यांना परिचितच असेल पालि भाषेच्या प्रसाराकरिता त्यांनीं प्रथम कलकत्ता विद्यापीठात शिकविण्याचें काम पत्करिलें होतें पण महाराष्ट्रात ह्या भाषेच्या ज्ञानाचा प्रसार व्हावा ह्या कळकळीनें त्यांनीं तिकडील काम सोडून देऊन इकडे महाराष्ट्रात येण्याचें ठरविलें

इकडे येऊन डॉ. सर रामकृष्ण भाण्डारकर ह्यांच्या खटपटीमुळें मुंबई विद्यापीठात पालि भाषेचा शिरकाव झाला व त्यांनीं पुण्यात फर्ग्युसन कॉलेजमध्यें पालि भाषा शिकविण्याचा उपक्रम १९१२ सालीं सुरू केला त्यांनीं आपलें स्वतंत्र शिक्षण मराठीमध्यें घेतेलें आहे. व ह्या त्यांच्या उपक्रमास अनुसरूनच **धर्मानंद स्मारक ट्रस्टनें** त्याचे ग्रंथ छापून काढण्याचें ठरविलें आहे हेंही स्तुत्यच होय.

ह्या ग्रंथ तयार करण्याचे कामीं ज्याची ज्याची मला मदत झाली त्याचे त्याचे आभार मानणें मी आपलें कर्तव्य समजतों. मीं १९२४ सालीं प्रसिद्ध केलेल्या पालि सुत्तनिपाताच्या प्रती उपलब्ध नसल्यामुळें छापखान्याच्या उपयोगाकरिता लागणारी प्रत मिळविणें दुरापास्त झालें होतें. तें काम प ना वि तुगार, काव्यतीर्थ, पालितीर्थ ह्यांनीं आपल्या संग्रहीं असलेल्या प्रतींपैकीं एक प्रत उपलब्ध करून दिल्यामुळें सुकर झालें तसेंच छापखान्याकरिता भाषांतराचें लिखाण तयार करण्याचें काम आमचे माजी विद्यार्थी श्री ल पा सातपुते, एम्. ए व तें तपासून पाहण्याचें काम श्री स न्य वैंचे, एम् ए ह्यांनीं केलें तसेंच आमच्या माजी विद्यार्थिनी श्री सौ लीला अर्जुनवाडकर, एम् ए व आमची स्नुषा श्री सौ शीला बापट, बी ए ह्यांनीं प्रुफें तपासण्याचे कामीं मदत केली तसेंच ' ग्रंथ-परिचय ' लिहिण्याचे बाबतींत आमची कन्या श्री सौ मालतीबाई ( कमला ) जोशी बी ए ह्यांनीं मदत केली आमचे फर्ग्युसन कॉलेजातील चिरकालीन सहाध्यापक प्रा र द वाडेकर, एम् ए ह्यांनीं तर अनेक प्रकारें मदत केली ह्या सर्वांचे मी मन पूर्वक आभार मानतों

ह्या ग्रंथात मुद्रणदोष बरेच राहिले आहेत ह्याची जाणीव आहे मुद्रणाऱ्याच्या व्यवस्थापकाच्या मतें ह्यातील काहीं दोष जरी टाळता आले असते, तरी एकदा मशीन चालू झाल्यानंतर टाईप जेव्हा उडून जागच ढळतात तेव्हा नाइलाज असतो असें त्याचें समर्थन आहे, असो वाचकानीं शुद्धिपत्रकात दिलेल्या दुरुस्त्या करून ग्रंथ वाचनास घ्यावा ही विनंति आहे सहज समजण्याजोग्या दुरुस्त्या दाखविलेल्या नाहींत

२० जुलै १९५५ पु वि बापट

## संक्षिप्त अक्षरांचा खुलासा

अ०—अट्ठकथा ( परमत्थजोतिका भाग २ ).

अनु०—अनुक्रम.

नि०—निद्देस.

भा०—भाषांतर.

म०—मरम्म ( ब्रह्मी हस्तलिखितें )

रो०—रोमन ( Anderson and Smith ह्यानीं संपादिलेला व पालि टेक्स्ट सोसायटीनें छापलेला ग्रंथ ).

सि०—सिआम ( सयामी छापील ग्रंथ ).

सी०—सीहल ( सिंहली हस्तलिखितें किंवा छापील ग्रंथ ).

Fsb —फाउसबोलनें संपादिलेला ग्रंथ (पालि टेक्स्ट सोसायटीनें छापलेला)

सूचना—वर ज्या हस्तलिखितांचा उल्लेख केलेला आहे तीं म्हणजे रो० प्रती करिता वापरलेलीं.

# भाषांतरकारांची प्रस्तावना

पालि त्रिपिटकाचे सुत्तपिटक, विनयपिटक व अभिधम्मपिटक असे तीन मुख्य विभाग आहेत सुत्तपिटकाचे पुन दीघनिकाय, मज्झिमनिकाय, संयुत्तनिकाय, अंगुत्तरनिकाय व खुद्दकनिकाय असे पाच पोटभेद आहेत खुद्दकनिकायात जीं १५ प्रकरणें आहेत तीं अशीं—(१) खुद्दकपाठ, (२) धम्मपद, (३) उदान, (४) इतिवुत्तक, (५) सुत्तनिपात, (६) विमानवत्थु, (७) पेतवत्थु, (८) थेरगाथा, (९) थेरीगाथा, (१०) जातक, (११) निद्देस, (१२) पटिसंभिदामग्ग, (१३) अपदान, (१४) बुद्धवंस, (१५) चरियापिटक म्हणजे सुत्तपिटकात खुद्दकनिकाय शेवटचा असून त्यातील १५ प्रकरणात सुत्तनिपात पाचवा आहे तेव्हा सकृद्दर्शनीं हें प्रकरण कालमानानें फार प्राचीन नसावें अशी समजूत होणें साहजिक आहे परंतु बायबलाचे जसे जुना आणि नवा करार असे कालमानावरून भाग पाडले गेले आहेत तसे त्रिपिटकाचे नाहींत

दीघनिकाय याचा अर्थ मोठा निकाय असा नसून मोठ्या प्रमाणाच्या सुत्ताचा संग्रह असा आहे मज्झिमनिकाय म्हणजे मध्यम प्रमाणाच्या सुत्ताचा, संयुत्तनिकाय म्हणजे गद्यपद्यमिश्रित व इतर विविध विषयावरील सुत्ताचा संग्रह. अंगुत्तरनिकाय म्हणजे ज्यात एक वस्तूचा, दोहोंचा, तीहींचा, असे अकरा वस्तूचा समावेश होतो अशा सुत्ताचा संग्रह उत्तरोत्तर एक एक अंग (वस्तु) वाढत जाते म्हणून याला अंगुत्तर (अंग + उत्तर) ही संज्ञा या चारही निकायात असा मजकूर आहे कीं, जो सुत्तनिपातातील मजकुराहून बराच अर्वाचीन ठरेल खुद्द खुद्दकनिकायात तर सुत्तनिपाताएवढें दुसरें कोणतेंहि प्राचीन प्रकरण नाहीं

भाब्रा येथील शिलालेखात खालील सात धर्मपर्यायांचा निर्देश केला आहे. (१) विनयसमुकसे (२) अलियवसानि (३) अनागतभयानि (४) मुनिगाथा (५) मोनेयसूत (६) उपतिसपसिने (७) लाघुलोवादे

मुगावादे आधिगिच्य भगवता बुधेन भासिते यातील विनयसमुकसे हें कोणतें सुत्त असावें याचा अद्यापि निकाल लागला नाहीं. तथापि सध्या माझी अशी समजूत झाली आहे कीं, येथें अशोकानें धम्मचक्कपवत्तनसुत्तालाच विनयसमुकसे म्हटलें असावें विनय शब्दावरून एकदम विनयग्रंथ किंवा त्यात उपदेशिलेले नियम याजकडे लक्ष जातें त्या विनयाचा समुत्कर्ष ज्यात आहे असें कोणतेंहि सुत्त पालि ग्रंथात आढळत नाहीं परंतु विनय या शब्दाचा ' उपदेश ' असाही दुसरा अर्थ आहे. आणि त्या अर्थी हा शब्द नसला तरी हा धातु पुष्कळ ठिकाणीं वापरलेला आढळून येतो. उदा०—चूळसच्चक सुत्तातील ( मज्झिम नि न ३४ ) " कथ पन भो अस्सजि समणो गोमणो सावके विनेति " येथें विनेति किंवा विनयति या शब्दाचा संबंध कोणत्याही रीतीनें विनयग्रंथातील नियमाशीं नाहीं " हे अस्सजि, श्रमण गोतम आपल्या श्रावकाना काय उपदेशितो ? "—असा त्याचा सरळ अर्थ आहे. तव्हा विनय याचा उपदेश असा अर्थ धरला तर त्या उपदेशाचा समुत्कर्ष म्हणजे धम्मचक्कपवत्तनसुत्तच धरावें लागेल कारण यातील उपदेशाला अनेक ठिकाणीं ' बुद्धान सामुक्कसिका धम्मदेसना ' असें म्हटलें आहे या सुत्ताचें तिपिटकात फारच महत्त्व आहे तेव्हा तें अशोकानें आपल्या यादीच्या अग्रभागीं घातलें असल्यास आश्चर्य नाहीं

सुत्तनिपातात या सुत्तातील मजकुराचा म्हणजे चार आर्यसत्याचा निर्देश द्वयतानुपस्सनासुत्तात ( न ३८ ) आरभींच आला आहे बाकी अशोकाच्या लेखातील मुनिगाथा, मोनेयसूते आणि उपतिसपसिने हे तीन धर्मपर्याय अनुक्रमें मुनिसुत्त ( न १२ ), नालकसुत्त[2] ( न ३७ ) आणि सारिपुत्तसुत्त[3] ( न ५४ ) हीं सुत्तनिपातातील सुत्तें आहेत अरियवसानि आणि अनागतभयानि हीं दोन अगुत्तरनिकायात सापडतात, व लाघुलो

---

१ उदाहरणार्थ, उपालिसुत्त, मज्झिम नि भाग १ [P T S ]पृष्ठ ३८० पहा

२ ' मानेयसूते ' हेच हाय ( मानेय्य त उपञ्ञिस्सं, ७०१ ) [ सपादक ]

३ सारिपुत्तालाच उपतिस्स असेंही नाव असे पहा— Dictionary of Pali Proper Names by Prof G P Malalasekera [ सपादक ]

चाद हें मज्झिमनिकायातील अम्बलट्ठिक-राहुलोवादसुत्त (न. ६१) होय.[1] म्हणजे सातांपैकीं एक सर्वत्र, मज्झिम निकायात एक, अंगुत्तरात दोन आणि लहानशा या सुत्तनिपातात तीन सापडतात; आणि या तीन सुत्तांची जी धरती आहे तीच या प्रकरणातील इतर सुत्तांचीही आहे. यावरून बहुतेक सुत्तनिपात अशोकापूर्वी होता असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

खुद्दकनिकायात निद्देस नावाचें जें प्रकरण आहे त्याचे महानिद्देस आणि चूळनिद्देस असे दोन विभाग आहेत. महानिद्देस म्हणजे दुसरें काहीं नसून सुत्तनिपातातील अट्ठकवग्गावर टीका आहे. आणि चूळनिद्देस खग्गविसाण-सुत्तावर व वत्थुगाथांखेरीज करून पारायणवग्गावर टीका आहे. टीकांचा तिपिटकात समावेश झाला असल्यामुळें ज्यांच्यावर ह्या टीका आहेत ते सुत्तनिपाताचे भाग फारच प्राचीन असले पाहिजेत. त्या भागाशिवाय जीं बाकी सुत्तें आहेत त्यांच्या भाषासरणींत आणि त्या भागातील सुत्तांच्या भाषा-सरणींत विशेष फरक नाहीं. ह्यावरूनही सुत्तनिपात फार प्राचीन असला पाहिजे ह्या अनुमानाला अधिक बळकटी मिळते परंतु या पुस्तकात जे गद्य भाग आहेत ते मात्र मागाहून दाखल केले असावेत असें वाटतें. त्यांपैकीं बहुतेक ठराविक असून ते इतर निकायात अनेक ठिकाणीं सापडतात. त्यात विशेषनामाचा तेवढा फरक असतो.

पब्बज्जासुत्त (न. २७), पधानसुत्त (न. २८), नालकसुत्ताच्या वत्थु-गाथा (न. ३७), यांचा बुद्धचरित्राशीं निकट संबध आहे त्यासंबंधीं थोडीबहुत चर्चा बुद्धचरित्र लेखमालेंत येऊन गेली असल्यामुळें पुनरपि येथें विशेष माहिती देण्याची जरूरी वाटत नाहीं. राहुलसुत्तासंबधानें (न. ११) मात्र थोडी चर्चा करणें इष्ट वाटतें.

---

१ ह्या अशोकाच्या शिलालेखातील उल्लेखासंबधीं विशेष चर्चा Indian Antiquary Vol 41, February 1912, P 37-40 आणि पुरातत्त्व पु १ न ४ यात सांपडेल जिज्ञासू वाचकानीं ते लेख वाचावेत

२ पुरातत्त्व त्रैमासिक, पुस्तक दुसरें, बुद्धचरित्र लेखमाला, लेखांक २, ३ आणि ४ पहा

बुद्ध भगवान् गृहत्यागानंतर सात वर्षांनीं कपिलवस्तूला आला, व त्या प्रसंगीं राहुलाच्या आईनें त्याला आपलें दायाद्य मागण्यासाठीं बुद्धाजवळ पाठविलें. बुद्धानें त्याला विहारात नेलें व सारिपुत्ताकडून प्रव्रज्या देवविली. तेव्हापासून राहुल कुमार श्रामणेर झाला ही कथा महावग्गात व त्याच्या अट्ठकथेंत आली आहे, व तिचा उल्लेख सुत्तनिपाताच्या अर्थकथाकारानेंही केला आहे आता असा प्रश्न उपस्थित होतो कीं जर बुद्धानें राहुलाला सात वर्षांचा असताना प्रव्रज्या दिली, तर हे राहुलसुत्त कधीं उपदेशिलें? प्रव्रज्येपूर्वी म्हणावें तर सारिपुत्ताचा आणि राहुलाचा 'अतिपरिचय' (श्लोक ३३५) झाला होता असें म्हणणें अशक्य आहे दुसरें "मनाला आवडणारे व उल्हसित करणारे विषय सोडून" इत्यादि उपदेश बुद्धानें अशा अल्पवयस्क राहुलाला केला असेल हें संभवत नाहीं प्रव्रज्येनंतर राहुलाला हा उपदेश करण्यात आला असें म्हणावें, तर 'श्रद्धापूर्वक घरातून नीघ'—या म्हणण्याचा अर्थ राहत नाहीं तेव्हा या सुत्तावरून असें अनुमान करावें लागतें कीं पुष्कळ वर्षे राहुल गृहस्थाश्रमात असतानाच सारिपुत्ताचा शिष्य होता किंवा आजकालची श्रामणेर करून अल्पवयस्कांना विहारात ठेवण्याची पद्धति त्या वेळीं अस्तित्वात नव्हती हें राहुलसुत्त फार प्राचीन असें गृहीत धरलें तर महावग्गातील आणि अट्ठकथातील राहुलाची कथा मागाहून रचली गेली असें म्हणावें लागतें

हें भाषांतर प्रो बापट [आर्यभूषण प्रेस, १९२४] यांच्या सुत्तनिपाताच्या संस्करणावरून करण्यात आलें आहे पालि टेक्स्ट सोसायटीच्या संस्करणात आणि प्रो बापट यांच्या संस्करणात मुळात फारसा फरक नाहीं. तरी प्रो बापट यांचें संस्करण नागरी लिपींत असल्याकारणानें त्यांच्या बरोबरच हें भाषांतर वाचणें हिन्दी वाचकांना सोयिस्कर होईल

पालि वाङ्मयात सुलभ रीतीनें प्रवेश व्हावा, या हेतूनें हें भाषांतर केलें आहे त्यामुळें कित्येक ठिकाणीं तें दूरान्वय झालें आहे, आणि कदाचित्

१ Oldenberg s Edition P 82

२ बौद्धसंघाचा परिचय (पान ५०)

सामान्य वाचकांना क्लिष्ट वाटेल. पण हें भाषांतर आहे आणि रूपांतर नव्हे हें लक्षात ठेवलें पाहिजे. साध्या भाषेंत नुसतें रूपांतर केलें तर त्यावरून मूळ श्लोकाचा *अर्थ* सुलभपणें लावता यावयाचा नाहीं. ज्याला संस्कृत *भाषा चांगली अवगत आहे, पण पालि येत नाहीं*, त्याला स्वतःच्या प्रयत्नानेंच पालीचा अभ्यास करण्याकरितां या भाषांतराचा चांगला उपयोग होईल अशी आशा बाळगणें असमंजस होणार नाहीं.

धर्मानंद कोसंबी

# ग्रंथ--परिचय

**तिपिटक :**—हिंदूंना ज्याप्रमाणें वेद पवित्र आहेत किंवा मुसलमानाना कुराण, किंवा खिस्ती लोकाना बायबल, त्याप्रमाणें बुद्धानुयायींना तिपिटक (त्रिपिटक) हा ग्रंथसंग्रह आहे. तिपिटकामध्यें तीन पिटकें-पेटारें-असून त्याचे तीन भाग आहेत, म्हणजे (१) विनय पिटक, (२) सुत्त-पिटक (३) अभिधम्म पिटक. विनयपिटकात भिक्षु व भिक्षुणी ह्यांच्या वागण्या-संबंधीचे नियम, प्रसंगोपात्त दाखले देऊन, दिलेले आहेत. मूळच्या नियमातही अनुभवानंतर गौतम बुद्धानें अनेक फेरफार केलेले आहेत. या सबधाची सर्व माहिती विनयपिटकात दिलेली आहे. भगवान् बुद्ध किंवा त्याचे शिष्य ह्यांची बुद्धधर्माच्या धार्मिक व नैतिक तत्त्वाबद्दल जी मनोरंजक चर्चा झाली ती लोकप्रिय रीतीनें सुत्तपिटकात दिली आहे. अभिधम्म-पिटकात बुद्धधर्माचें तत्त्वज्ञान जराशा सूक्ष्म पद्धतीनें सांगितलें आहे. अभिधम्मपिटकातील वर्गीकरणावरून बौद्ध लोकांच्या संख्यायुक्त विभागणी-पद्धतीवर चांगला प्रकाश पडतो. या पुस्तकाचा अभ्यास बुद्धीचा विकास करण्यास किंवा स्मरणशक्ति तीव्र करण्यास फार उपयोगी पडतो.

**सुत्तनिपात त्याचा तिपिटकांतील इतर ग्रंथांशीं संबंध .**—सुत्तनिपात हा सुत्तपिटकाचा एक भाग असून पान १७ वरील कोष्टकावरून त्याचा तिपिटकातील इतर ग्रंथाशीं असलेला संबंध दिसून येईल.

**तिपिटक : तीन शतकांतील बौद्ध साहित्यिक चळवळींचा विपाक**—तिपिटकातील सगळे ग्रंथ एकाच वेळीं तयार झालेले नाहींत. गौतम बुद्ध जेव्हांपासून नवीन धार्मिक संप्रदायाचा संस्थापक म्हणून मान्य केला गेला तेव्हांपासून, म्हणजे आपण असें म्हणूं या कीं बौद्धसंघ स्थापनेपासून, तीनशें वर्षांतील बौद्ध साहित्यिक चळवळीचा निदर्शक असा हा तिपिटक ग्रंथसंग्रह दिसतो. संयुत्त व अंगुत्तर-निकायाचा बराचसा भाग व खुद्दक-


तिपिटक
विनयपिटक
सुत्तपिटक
अभिधम्मपिटक
सुत्तविभंग
खन्धक
परिवार
महावग्ग
चूलवग्ग
दीघ-निकाय
मज्झिम-निकाय
संयुत्त-निकाय
अंगुत्तर-निकाय
खुद्दक-निकाय
खुद्दक-पाठ
धम्म-पद
उदान
इति-वुत्तक
सुत्त-निपात
विमान-वत्थु
पेत-वत्थु
थेर-गाथा
थेरी-गाथा
जातक
निद्देस
पटि-संभिदा
अप-दान
बुद्ध-वंस
चरिया-पिटक
धम्मसंगणि
विभंग
धातुकथा
पुग्गलपञ्ञत्ति
कथावत्थु
यमक
पट्ठान

निकाय हा दीघ व मज्झिम निकायानंतरचा दिसतो. बुद्धाच्या मृत्यूनंतर चाळीस वर्षांनीं राज्य करीत असलेल्या मगध देशाच्या मुंड राजाच्या पत्नीच्या मृत्यूवर आधारलेलें एक सुत्त अंगुत्तरनिकायात आहे. खुद्दक-निकायातील पुस्तकांवरूनही हे सर्व ग्रंथ एकाच वेळचे नाहींत हें स्पष्ट होतें. समन्तपासादिका नावाच्या विनयअट्ठकथेच्या चिनी संस्करणात खुद्दक निकायात चौदाच ग्रंथ असल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. खुद्दकपाठ हें छोटेखानी पुस्तक त्या यादींतून वगळलें आहे. पेतवत्थु व विमानवत्थु या ग्रंथांवरूनही वरील विधानाला पुष्टि मिळते. गौतमबुद्धाच्या मृत्यूनंतर सुमारें दोनशें वर्षांनीं सौराष्ट्रांत (सुरट्ठ) राज्य करीत असलेल्या राजा पिंगलकाचा उल्लेख पेतवत्थूमध्यें (४-३ १) सांपडतो. बुद्धाच्या मृत्यूनंतर बऱ्याच वर्षांनीं घडलेल्या दुसऱ्या एका गोष्टीचा उल्लेखही विमानवत्थु ग्रंथात (७ १०) सांपडतो. विनय आणि अभिधम्मपिटक यांतही हेंच आढळतें. विनय पिटकाचा पांचवा ग्रंथ, परिवार, हा पहिल्या चार ग्रंथांनंतर बऱ्याच काळानें तयार झाल्याचें स्पष्ट दिसतें. तसेंच अभिधम्मपिटकातील कथावत्थु हा ग्रंथ धम्मसंगणीनंतर बऱ्याच काळानें म्हणजे अशोक-कालच्या तिसऱ्या धर्मसंगीतींत तयार झाल्याचा स्पष्ट उल्लेख आढळतो.

**राजगृह, वैशाली व पाटलिपुत्र येथें भरलेल्या धर्मसंगीति**—बौद्धपरंपरेला अनुसरून असें म्हटलें जातें कीं, बुद्धाच्या मृत्यूनंतर लगेच त्याच्या शिष्यांनीं महाकाश्यप नावाच्या महास्थविराच्या नेतृत्वाखालीं राजगृह येथें पहिली संगीति भरविली. या सभेंत पांचशें मुख्य लोक उपस्थित होते. त्यांनीं बुद्धाच्या अनुयायी लोकांत तीव्र स्वरूपाचे मतभेद टाळण्याकरितां बुद्धाच्या शिकवणीला साहित्यिक स्वरूप देण्याचा निश्चय केला. अजातशत्रुराजानें या भिक्षूंना ह्या कामीं मदत केली. बुद्धाचा बरींच वर्षे परिचारक असलेल्या आनंदानें धर्माचें व उपालीनें विनयाचें गायन केलें अशी आख्यायिका आहे. यानंतर शंभर वर्षांनीं वैशाली येथें सातशें भिक्षूंनीं पुन्हा धर्मसंगीति भरवून, बौद्ध संघात फूट पाडणाऱ्या कांहीं मुद्यांवर चर्चा केली. या संगीतीनंतर बौद्ध उपदेशास पुन्हा साहित्यिक स्वरूप देण्यांत आलें. पुढें एकशें छत्तीस वर्षांनंतर म्हणजे बुद्धाच्या निर्वाणानंतर दोनशें

छत्तीस वर्षांनंतर, अशोक राजाच्या कारकीर्दीत तिसरी संगीति पाटलिपुत्र (पाटणा) येथें भरली व आतापर्यंत तयार असलेल्या बौद्ध भिक्षुवर्गाच्या साहित्यिक स्वरूपास पुनः उजळा देऊन सुधारून वाढविलेली नवीन आवृत्ति तयार करण्यांत आली. ह्याच संगीतींत मोग्गलिपुत्त तिस्स थेरानें कथावत्थूचा अंतर्भाव अभिधम्मपिटकांत केला. हाच मोग्गलिपुत्त थेर ह्या संगीतीचा अध्यक्ष होता. या तीन संगीती स्थविरवादी पंथीयांनीं मान्य केलेल्या आहेत.

ओल्डेनबर्ग आणि कर्न ह्यांच्यासारखे पाश्चिमात्य विद्वान् पहिल्या संगीतीच्या ऐतिहासिकतेबद्दल साशंक आहेत. परंतु संगीती भरलीच नसावी असें म्हणणें उचित दिसत नाहीं. उलट पक्षीं, आपल्या धर्मसंस्थापकाच्या मृत्यूनंतर त्याच्या अनुयायी लोकांनीं एकत्र जमून त्याच्या उपदेशाला मूर्त स्वरूप देण्याचें ठरवावें यांत अमान्य असें कांहींच नाहीं. उलट, आपल्या गुरूच्या तत्त्वाबद्दल बेफिकिरी दाखविणें हेंच असंभाव्य वाटतें. [पहिल्या किंवा दुसऱ्या संगीतींत तिपिटकाचीं सगळीं पुस्तकें गायिलीं गेलीं असतील, हें मात्र संभवनीय वाटत नाहीं. कारण त्या वेळेपर्यंत तिपिटक हा संबंध ग्रंथसमूह पूर्ण झालेला होता असें वाटत नाहीं.]

**तिपिटकाचा संभाव्य काल** — सम्राट् अशोकाच्या भाब्रा येथील शिलालेखांत पालि वाङ्मयांतील (१) विनयसमुक्कसे, (२) अलियवसानि, (३) अनागतभयानि, (४) मुनिगाथा, (५) मोनेयसूते, (६) उपतिसपसिने, आणि (७) लाघुलोवादे[१] ह्या धर्मपर्यायांच्या नांवांवरून, इ. स. पूर्वीच्या तिसऱ्या[२] शतकांतील इतर शिलालेखांत धम्मकथिक, पेटकी, सुत्तन्तिक, सुत्तन्तिकिनी व पञ्चनेकायिक, इत्यादि शब्दांवरून असें सिद्ध होतें कीं बौद्ध वाङ्मय व त्यांतील विभाग, उदा० पिटक, सुत्तन्त, निकाय—हे लोकांना

१ भाषांतरकाराची प्रस्तावना पहा (पान ७)

२ Epigraphia Indica II 93 ZDMG. XL, p 58, Rhys David's Buddhist India, pp. 167-68

परिचित होते व त्या वेळेस निकायाची संख्याही पाचपर्यंत होती. तिसऱ्या संगीतीनंतर पालि वाङ्मय अशोकाचा मुलगा–महिन्द ( महेन्द्र ) यानें सिंहल द्वीपात नेलें अशी आख्यायिका आहे. त्यानंतरच्या कालात पालि तिपिटकात ढवळाढवळ झालेली दिसत नाहीं. कदाचित् धार्मिक ग्रंथात ढवळाढवळ करणें हा त्याचा अपमान होय असें मानलें जात असेल. ह्या वेळेपूर्वीच हा ग्रंथसंग्रह पूर्ण झाला असावा कारण बौद्ध धर्माचा मोठा आश्रयदाता सम्राट् अशोक ह्याचें नावही तिपिटकात आढळून येत नाहीं.

अशा रीतीनें तिपिटकाच्या अखेरच्या मर्यादेचा संभाव्य काल ठरविला जातो तो इ. स. पूर्व तिसऱ्या शतकाचा पूर्वार्ध. हाच काल सम्राट् अशोकाच्या कारकीर्दीचा होय.

दक्षिण आशिया खंडातील संप्रदायाप्रमाणें, ४५ वर्षे नवीन धर्माचा उपदेश करून बुद्ध इ. स. पूर्वी ५४३ त मरण पावला. "बऱ्याच वर्षांपर्यंत पाश्चिमात्य विद्वान् गौतमबुद्धाच्या निर्वाणाचा काल इ. स. पूर्वी ४८३ किंवा ४८७ असें मानीत होते," असें चार्लस ईलियट म्हणतो, "परंतु, शैशुनाग राजघराण्याच्या इतिहासावरील नूतन संशोधनावरून असें दिसून येतें कीं, बुद्धाच्या निर्वाणाचा काल इ. स. पूर्वी ५५४ असावा" हें साल दक्षिण आशियातील सांप्रदायिक मताला जवळ आहे. यावरून असें दिसून येतें कीं, जर आपण बुद्धाच्या निर्वाणाचा काल इ. स. पूर्वी ५४३ हा ढोबळ मानानें बरोबर आहे असें धरलें तर बुद्धानें धर्मोपदेशाचें कार्य ६ व्या शतकाच्या पूर्वार्धात केलें असलें पाहिजे. वरील विवेचनावरून असा निष्कर्ष निघतो कीं, तिपिटकाचा समावेश काल इ. स. पूर्वी ६ व्या शतकापासून ते ४ थ्या शतकापर्यंत असावा. एवढा मोठा ग्रंथसंग्रह पुरा होण्यास ३०० वर्षांचा काल म्हणजे कांहीं फार नाहीं.

---

१. Hinduism and Buddhism, vol I, Introd p xix; Vincent Smith's Oxford History of India, p 52 इ० स० पूर्व ४८३ हा काल इतर युरोपीय विद्वानांच्या मतेंही अद्याप निर्णायक असा मानला जात नाही "Still --provisional" ( Cambridge History of India, vol i p 171 )

सुत्तनिपाताची प्राचीनता —बुद्धधर्माच्या अभ्यासाकरिता, धम्मपदाप्रमाणें, सुत्तनिपात या ग्रंथाचा वरचेवर उल्लेख केला जातो कारण हा ग्रंथ फार प्राचीन आहे व म्हणून त्यात आढळणारा बुद्धाचा उपदेशही जुनाच आहे हल्लींच्या स्वरूपातील सुत्तनिपात हा गाथासंग्रह केव्हा अस्तित्वात आला हें जरी नक्की सांगता आलें नाहीं, तरी "मिलिन्द प्रश्न" या ग्रंथात त्याचा अनेक ठिकाणीं (देवनागरीप्रत पान ३६३, ३७८, ४०३, ४०५) नामनिर्देश करून त्यातील गाथा उद्धृत केल्या आहेत हल्लींच्या सुत्तनिपातात अंतर्भूत झालेल्या अट्ठक–वग्गाचा उल्लेख संयुत्त ३ १२, विनय १ १९६–९७, उदान ५.६ यात आलेला आहे पारायणवग्गाचा उल्लेख संयुत्त २ ४९, अंगुत्तर १ १३३–१३४, २ ४५, ३ ३९९, ४०१, ४ ६३ यात आलेला आहे अंगुत्तरनिकायात तर पारायणवग्गातील पुण्णकपञ्ह, उदयनपञ्ह, व मेत्तेय्यपञ्ह याचा प्रत्यक्ष उल्लेख असून त्यातील गाथा उद्धृत केलेल्या आहेत पहिल्या अट्ठकातील सूत्रांवेरीज निदान सात सूत्रें तरी इतर[1] ठिकाणीं आलेलीं आहेत अनेक महायानग्रंथात[2] "अर्थवर्गीय" आणि "पारायणाचा" उल्लेख आलेला आहे या सुत्तनिपात ग्रंथात प्रास्ताविक गद्य भागायाचून अनेक सूत्राचा संग्रह केलेला आहे त्यातील विषयाचा विचार करतांना बौद्ध धर्माच्या आरंभींच्या अवस्थेचेंच वर्णन यात दिसतें काहीं सूत्रें बौद्धधर्माच्या आरंभकालींचीं व काहीं बुद्धाच्या पहिल्या शिष्याच्या[3] वेळेचीं वाटतात सुत्तनिपात तिपिटकातील सर्वांत जुनें काव्य होय खुद्दक पाठ, धम्मपद, उदान, इतिवुत्तक इत्यादि छोट्या काव्याची जरूरी भासण्यापूर्वी सुत्तनिपात

---

१ सुत्त ४ = स १ १७० ८ = खुद्दक० ११ = खुद्दक = ० १२ = जातक ३ १९६ १६ = खुद्दक ६ ३३ = म० (सुत्त ९२) ? = अपदानें १ (पच्चेकबुद्धापदान, गाथा ९०–१३०, Sinh ed, Colombo, 1930

२ अर्थपदसूत्र इंग्रजी प्रस्तावना पान १ ? Sylvain Levi, Journal Asiatique, १९१५ (म जून) पृष्ठ ४०० ?४

३ Winternitz, History of Indian Literature, Vol II (English Translation) p 93 (Calcutta Uni 1933)

अस्तित्वात आलें असलें पाहिजे थेरगाथा, थेरीगाथा, बुद्धवंस, चरियापिटक, अपदान हीं पुस्तकें निस्सशय मागाहून तयार झालेलीं दिसतात म्हणून असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं सुत्तनिपातातील बऱ्याचशा सूत्रांची संहिता ठोकळ मानानें बुद्धाच्या परिनिर्वाणानंतरच्या पहिल्या शतकातील पूर्वार्धातच तयार झाली असावी

सुत्तनिपाताच्या अभ्यासाचें महत्त्व —अनेक दृष्टींनीं सुत्तनिपाताच्या अभ्यासाचें महत्त्व आहे पालि तिपिटकात जागतिक वाङ्मयात देखील अंतर्भूत करता येतील असे जर कोणते दोन ग्रंथ असतील तर ते धम्मपद व सुत्तनिपात हे होत पालि वाङ्मयाच्या अभ्यासकानें जर हे दोन ग्रंथ वाचले नाहींत तर तें व्यर्थ होय वर सांगितल्याप्रमाणें (पृ १९) सुत्तनिपातात सम्राट अशोकानें प्रशंसिलेल्या सात सुत्तांपैकीं तीन सुत्तें (१२, ३७, ५४) आहेत बुद्धाची सर्वांत जुनी शिकवण आपणास येथें सापडते त्याचप्रमाणें बुद्धभिक्षूचें ध्येय काय असावें हेंही सांगितलें आहे.

१ सुत्तनिपाताचें प्राचीनत्व खालील पुराव्यावरूनही दिसतें —

(१) ह्या ग्रंथावरून बुद्धानुयायी लोक व बुद्धधर्म आरंभीच्या अवस्थेतील भासतात

(२) भुतगें किंवा पारमिता वगैरेसारख्या बौद्धधर्माच्या पारिभाषिक वैशिष्ट्यांचा उल्लेख सापडत नाहीं

(३) बुद्धाचें शरीरावशेष किंवा स्तूप यांचा उल्लेख सापडत नाहीं

(४) अथर्ववेदाच्या अभ्यासाला फारसें महत्त्व दिलें जात नव्हतें

(५) ब्राह्मण यज्ञ वरचेवर करीत व ह्या यज्ञांत गाईंची हत्या होत असे। यज्ञांपैकीं कांहींचा उल्लेख गाथा १०२ मध्ये सापडतो त्यातील कांहीं नांवें अप्रसिद्ध आहेत

(६) सुत्तनिपातांतील कांहीं गाथांचे पाद नंतरच्या पालि पुस्तकांत आढळतात उदा० धम्मपद उदान इतिवुत्तक थेरगाथा, इत्यादि किंवा नंतरच्या बौद्ध संस्कृत पुस्तकांतही सापडतात

(७) जुनीं वैदिक व्याकरणांतील रूपें व वाक्प्रचार

(८) जुन्या पद्धतीची छन्दोरचना

२४०० वर्षांपूर्वीच्या भारताचें सामाजिक चित्रही या पुस्तकांत सांपडतें. श्रमण, ब्राह्मण इत्यादि धार्मिक पंथीयांविषयीं माहिती सांपडते. कांहीं ठिकाणीं लोकांच्या रीति-रिवाजाचा उल्लेख सांपडतो. गाथा ५९८ मध्यें आपणांला अमावस्येनंतर प्रथम दिसणाऱ्या चंद्राला वंदन करण्याच्या भारतीय चालीचा उल्लेख सांपडतो. गाथा ४४८ मध्यें योद्ध्यानें डोक्यावर गवत ठेवून युद्धाला बाहेर पडण्याची चाल दिसून येते. गवत हें विजयी वीराचें चिन्ह आहे. अजून ही चाल हिंदुस्थानांतील कांहीं प्रांतांत दिसते. नवरात्रानंतर विजयादशमीच्या दिवशीं सीमोल्लंघन करण्यास जाणारे लोक डोक्यावरील पागोट्यांत किंवा पगडींत, नवरात्रांत घरीं मुद्दाम रोंवून उगवलेलें गवत ( धान्य ) रोंवून बाहेर पडतात. अशा रीतीनें सीमोल्लंघनाम जाणें म्हणजे पावसाळ्यानंतर विजय मिळविण्याच्या ईर्ष्येनेंच मुलुखगिरीस जाण्यासारखें समजलें जातें. गौतमबुद्धाबद्दलही कांहीं ऐतिहासिक माहिती मिळते. बुद्ध शाक्यवंशीय असून आदित्य कुळांतील होता. नालकसुत्तांतील असित ऋषीच्या दंतकथेंतील पौराणिक भाग वगळला, तरी त्यांत थोडेंबहुत सत्यच असेल असें वाटतें. बुद्धाला विरक्ति येण्याचें कारण म्हणजे बारिकसारिक गोष्टींवरून लोकांची कलहप्रवृत्ति! त्यानें थोड्या पाण्यांत तडफडणाऱ्या माशाप्रमाणें या संसारांत झगडणाऱ्या लोकांची वृत्ति पाहिली. त्यामुळें भीतिग्रस्त होऊन त्याच्या ठिकाणीं वैराग्य उत्पन्न झालें ( ९३५–३८ ). हें साधेंसुधें वर्णन आणि ह्याचसंबंधींचें नंतर लिहिलेलें जातक-अट्ठकथेंतील निदानकथा, अगर ललितविस्तर, अगर अश्वघोषाचें बुद्धचरित्र, ह्यांतील अद्भुत वर्णनांत किती महदन्तर! पब्बज्जासुत्तांतील (२७) राजा बिंबिसार व गौतम यांच्या भेटींतील नाट्यमय संभाषणावरून ती एक ऐतिहासिक घटनाच असावी असें वाटतें. पधानसुत्तांत ( २८ ) बुद्धानें परमपद प्राप्त करून घेण्याकरितां केलेले प्रयत्न व त्यासाठीं त्याच्या मनांत होणारें द्वंद्व, याचें चित्र सांपडतें. बुद्धाचे दोन पट्टशिष्य सारिपुत्त व मोग्गल्लान यांचाही उल्लेख कोकालीय सुत्तांत ( ३६ ) सांपडतो. सारिपुत्त बुद्धाचा मुलगा राहुल याचा गुरु होता ( ३३ ). ह्यानेंच बुद्धाच्या पश्चात् धर्मचक्र चालू ठेवलें. पारायणवग्गांतील

वत्थुगाथामध्यें आपणाला भारतातील भौगोलिक माहिती मिळून त्या वेळच्या व्यापारी दळणवळण–मार्गाची कल्पना येते. ह्यासंबधीचें विवरण पुढें येईलच (पान ३२)

**सुत्तनिपाताचे लेखक** :—सुत्तनिपात हा ग्रंथ काहीं एका लेखकाचें काम नाहीं. हा अनेकांच्या गाथांचा संग्रह आहे. डॉ. न्हिस डेव्हिड्स म्हणतात[1] त्याप्रमाणें "सुत्तनिपात" हा एका व्यक्तीच्या प्रयत्नाचा परिपाक नसून एका संघ संघटित वर्गाचा प्रयत्न आहे पहिल्या चार वर्गांतील सूत्रें एकमेकांशीं संबद्ध नाहींत पाचव्या वर्गांतील सूत्रें मात्र एकमेकांशीं निगडित आहेत हें दाखविण्याकरितां त्या वर्गाच्या आरंभीं व शेवटीं कथानकभाग दिला आहे. ह्या कथानकामुळें हीं सूत्रें एकत्र गोवलीं जातात. अट्ठक व पारायणवग्ग हीं सुरवातीपासूनच स्वतंत्र काव्यें म्हणून ओळखलीं जात असत व त्यांचा स्वतंत्र उल्लेख बौद्ध वाङ्मयात येत असल्याचें वर (पान २१) सांगितलेंच आहे तिपिटक ग्रंथामध्येंच निद्देस नावाचा टीकाग्रंथ आहे. त्यांतील पहिला भाग महानिद्देस, हा अट्ठकवर्गावरील टीकाग्रंथ आहे चूळनिद्देस ह्या दुसऱ्या भागात पारायणवग्ग व खग्गविसाण सुत्त ह्यांवरील टीका आहे बुद्धाचा धर्मसेनापति सारिपुत्त यानें ही टीका केली अशी आख्यायिका आहे.

**सुत्तनिपातांतील सुत्तांचें वर्गीकरण व त्यांतील विषय** —सुत्तनिपातातील सुत्तांचें अनेक शीर्षकाखालीं वर्गीकरण केलें जातें. ब्राह्मणधम्मिक (१९) कसिभारद्वाज (४), सुन्दरिकभारद्वाज (३०), किंवा माघ (३१), या सुत्तांत ब्राह्मणाचें जीवन व त्यांच्या सत्ताविषयीं माहिती दिली आहे आमगन्धसुत्तात (१४) बुद्धधर्मांतील पावित्र्य व अपावित्र्य ह्यासंबधींची कल्पना व तिची तत्कालीन ब्राह्मणांच्या कल्पनेहून भिन्नता दाखविली आहे. मेत्तसुत्तात (८) महाविहाराची कल्पना सांगितली आहे. पराभव (६), महामंगल (१६), नावा (२०), किंसील (२१), व धम्मिक (२६), या सुत्तांत नीतिपर उपदेश दिसून येतो. हेमवत (९), सुचिलोम (१७), व आळवक (१०), ह्या सुत्तांमध्यें महाभारतातील यक्षप्रश्ना-

1. Buddhist India, p 179

प्रमाणें यक्षप्रश्न आढळतात. ह्यात यक्ष गौतमबुद्धाला काहीं प्रश्न विचारतात व बुद्ध त्यांचें शंकानिरसन करतो. धनिय (२) व कसिभारद्वाज (४) ह्या सुत्तामध्यें सुंदर संवाद मिळतात. काहीं निव्वळ स्तोत्रपद्धतीचीं सुत्तें आहेत. वगीस (२४), सेल (३३) ह्या सुत्तात बुद्धाचें गुणगान आहे. वसल (७) व वासेट्ठ (३५) ह्या सुत्तामध्य जन्म श्रेष्ठ कीं धर्म श्रेष्ठ याची चर्चा केली आहे. विजय (११), सल्ल (३४), काम (३९) व द्वयतानुपस्सना (३८) ह्या सुत्तामध्यें तत्त्वज्ञानविषयक चर्चा आहे. रतनसुत्त (१३) भुतप्रेतापासून सरक्षण करणाऱ्या स्तोत्र (परित्त)-पद्धतीप्रमाणें आहे कोकालीय सुत्तामध्यें (३६) पौराणिक विवेचन पद्धति असून पापी लोक नरकयोनीप्रत जाऊन तेथें दु:खें कशीं भोगतात याचें वर्णन आहे. उरग (१), खग्गविसाण (३), मुनि (१२), धम्मचरिय (१८), राहुल (२३), सम्मापरिब्बाजनिय (२५), धम्मिक (२६), नाळक (३७), तिस्समेत्तेय्य (४५), मागन्दिय (४७), पुराभेद (४८), तुवट्टक, अत्तदण्ड आणि सारिपुत्त (५२-५४) हीं सुत्तें भिक्षुच्या जीवनाविषयीं असून त्याचें ध्येय व आचरण काय असावें हें त्यात सांगितलें आहे व शेवटीं, पूर्वीच उल्लेल्ल्याप्रमाणें, बुद्धासंबधीचीं कथानकें आहेत. तीं म्हणजे, पब्बज्जा (२७), पधान (२८) व नाळक सुत्तें (३७). पारायणवग्गाच्या आरंभीही (५५) कथानक असून तें ऋग्वेद किंवा महाभारतातील[1] आख्यानपद्धतीचें आहे.

**सुत्तांचीं नावें** —सुत्तनिपातातील सुत्तांचीं नावें एकाच ठराविक पद्धतीचीं अशीं दिलेलीं दिसत नाहींत अट्ठकथाकाराने पुष्कळ सुत्ताना दुसरीं वैकल्पिक नावें दिलीं आहेत विजयसुत्ताला (११) कायविच्छन्दनिकसुत्त असेंही म्हणतात नावासुत्ताला (२०) धम्मसुत्त, सुन्दरिकभारद्वाजाला (३०) पूरळास, धम्मचरियाला (१८) कपिल, सम्मापरिब्बाजनियाला (२५) महासमय व सारिपुत्तसुत्ताला (५४) थेरपञ्हसुत्त–अशींही नावं दिलेलीं आढळतात. नावें देण्याच्या पद्धतींत खालील प्रकार दिसतात —

(अ) पब्बज्जा (२७), पधान (२८), विजय (११), मुनि (१२), व ब्राह्मण-धम्मिक (१९)—ह्या सुत्ताना त्याच्या त्याच्या विषयावरुन शीर्षकें

1. ऋ० १०. १०, ८५, ९५, महा० ३. १९२, १९४.

दिलीं आहेत. ( आ ) धनिय ( २ ), सेल (३३), नाळक (३७), माघ (३१), व सभिय (३२) ह्या सुत्तांना त्यांतील महत्त्वाच्या व्यक्तींवरून नावें दिलीं आहेत ( इ ) उरग (१), खग्गविसाण ( ३ ), पराभव ( ६ ), नावा (१०), पसूर (४६), पुराभेद (४८) या सुत्तांना त्यांतील धुपदांतील किंवा इतर ठिकाणच्या एखाद्या महत्त्वाच्या शब्दावरून किंवा एखाद्या उपमेवरून नावें दिलीं आहेत. ( ई ) हिरि (१५) व किंसील (२१) या सुत्तांना त्यांच्या सुरुवातीच्या शब्दावरून नावें दिलीं आहेत

**सुत्तनिपाताच्या अंतरंगाचें परीक्षण** - (अ) श्रमण—सुत्तनिपातांत बौद्धधर्माची प्राथमिक अवस्थाच दिसून येते असें वर म्हटलेंच आहे. उत्तरकालीन मठव्यवस्था दिसून येत नाहीं बुद्धाच्या काळीं धर्मोपदेश करीत करीत आपापल्या धर्माचें तत्त्वज्ञान सांगत हिंडणारे धर्मगुरु आढळून येत. पूरणकस्सप, मक्खलिगोसाल, अजितकेसकम्बली, पकुधकच्चायन, सजयबेलट्ठिपुत्त व निगण्ठनातपुत्त—हे वेगवेगळ्या सहा पंथाचे गुरु होते त्यांचे अनुयायी आजीविक, निगण्ठ इत्यादि व इतर ब्राह्मण हे वादप्रिय म्हणून प्रसिद्ध असल्याचें सांगितलें आहे ( ३८१—८२ ).

दुसऱ्याच्या मतांचें खंडन करीत करीत व स्वतःच्या पंथाचें स्तोम माजवीत हे धर्मगुरु देशभर हिंडत असत व आपापल्या पंथाचे अनुयायी वाढवीत स्वतःकरिता किंवा लोकांकरिता भरीव कार्य काहींही न करता हे लोक उगीचच आपलें मत आग्रहानें सांगत व वादविवाद करीत फिरत असत. अशीं प्रतिपादिलीं जाणारीं तार्किक मतें ६३ प्रकारचीं होतीं असें गाथा ५३८ मध्यें सांगितलें आहे अशा उपदेशकांचें अनुकरण न करण्याबद्दल गौतमबुद्धानें आपल्या अनुयायीजनांना सक्त ताकीद दिलेली होती अट्ठकवग्गांत अशीं कैक सुत्तें आहेत कीं ज्यांत, "स्वतःच्या मताचें प्रदर्शन करू नये व दुसऱ्याच्या मतांना तुच्छ लेखू नये" (७८२, ७९८, ८६०, ९१८, ९४४, ९६९ ), असें स्पष्ट म्हटलें आहे जो, दुसऱ्यांनीं विचारल्याशिवाय, आपल्या तत्त्वाचें किंवा मताचें प्रदर्शन करतो, त्यास शहाणे लोक "अनार्य धर्मी" समजतात असें सांगितलें आहे ( ७८२ ). निरनिराळ्या पंथांत ज्यायोगें वादविवाद माजतील अशा तऱ्हेचें वर्तन

आपल्या अनुयायीजनानीं कम नये अशी बुद्धाची इच्छा होती ( वाद न जातं मुनि नो उपेति ७८०; ७८७, ७९६, ८२५, ९१३ इ० ). तसेंच त्यानीं आपली तुलना दुसऱ्याशा करून, आपल्याला श्रेष्ठ, कनिष्ठ अथवा इतरांशी समान समजूं नये ( ७९९, ८४२, ८५५, ८६०, ९१८, ९५४ ). दुसऱ्याचे सिद्धान्त कितीही अपायकारक असले तरी आपण सहिष्णुता दाखवावी अशी बुद्धाची शिकवण होती ( ९६५ ). आपल्या तत्त्वज्ञानाला चिकटून राहण्यातच शुद्धि आहे असें काहीं श्रमणाचें म्हणणें होतें ( ८२४ ). अशा तऱ्हेच्या मताना चिकटून राहून ते सभागृहातून वादविवाद करीत व अन्य मताच्या लोकाना मूर्ख ठरवीत. ह्या श्रमणाचें वर्तन व त्याची धर्मासंबंधीची आस्था पाहून या लोकाचें चार वर्ग कल्पिलेले आहेत—(अ) मार्गजिन, (आ) मार्गदर्शक, (इ) मार्गजीवी व (ई) मार्गदूषक (८४–९१).

( आ ) ब्राह्मण—ब्राह्मणाचाही एक महत्त्वाचा वर्ग होता. हे लोक तीन वेद, निघण्टु, इतिहास, व्याकरण, ज्योतिष, छन्द शास्त्र वगैरे मध्यें निष्णात होते व शेंकडो लोकाना विद्यादान करीत असत. चौथ्या वेदाचें नाव आथब्बण ( आथर्वण ) असें गाथा ९२७ मध्यें सांगितलें आहे. परतु या वेदाचा अभ्यास फारसा स्तुत्य नव्हता असें दिसतें. ब्राह्मणाना मन्त्रबन्धु ( मन्तबन्धुनो, १४० ) असें म्हटलें असून सावित्री हा त्याचा मुख्य मत्र सांगितला आहे ( ४५७ ). ब्राह्मणधम्मिक सुत्तामध्यें (१९) ब्राह्मणाची अधोगति कशी झाली व ते नीतिपासून व सात्त्या राहणीपासून कसे च्युत झाले हें सांगितलें आहे. ब्राह्मण लोभी बनले, राजाच्या वैभवी जीवनाबद्दल त्याना आसक्ति उत्पन्न झाली व ते सुदर स्त्रिया व पैसा याचा स्वीकार करू लागले. तसेंच राजदरबारीं जाऊन अश्वमेध, पुरुषमेध, सम्याप्राम, वाजपेय व निरर्गळ अशा नावानें ओळखले जाणारे यज्ञ करू लागले, निरपराध गाई मारल्या जाऊ लागल्या व धर्माचा ह्रास होऊन अधर्म पसरू लागला. ९८ रोगानीं पृथ्वीतल व्यापून टाकलें स्त्रिया पतींबद्दल अनादर दाखवू लागल्या व सगळीकडे गोंधळ व गैरव्यवस्था उत्पन्न झाली. याचीं महाभारतात ( भाडारकर संशोधन मदिर प्रत, १२. २५४. ४५–४७ )

सांगितलेल्या १०० रोगांच्या प्रादुर्भावाच्या परिस्थितीशीं तुलना करण्या जोगी आहे ज्यामध्यें प्राणिहत्या होते अशा यज्ञाबद्दल बुद्धानें नापसंति दर्शविली आहे.

सुन्दरिकभारद्वाज व माघसुत्तामध्यें पुण्याची इच्छा करणाऱ्या ब्राह्मणानें तथागताला, म्हणजे बोधिप्राप्त झालेल्या कोणाही व्यक्तीला, जातगोत न पाहतां दान द्यावें असें लिहिलें आहे बुद्धाच्या मतें हाच खरा यज्ञ होय ब्राह्मण्य हें उच्चकुलोत्पत्तीवर अवलंबून नसून आचार विचारावर अवलंबून आहे हें तत्त्व वासेट्ठसुत्तामध्यें (३७) "त्याला मी ब्राह्मण म्हणतों" अशा तऱ्हेचें ध्रुपद असलेल्या गाथांमध्यें निक्षून सांगितलें आहे व्यक्तीच्या जन्माला महत्त्व नसून त्याच्या आचारविचाराला महत्त्व आहे हें तत्त्व महाभारतामध्येंहि[1] सांगितलेलें आढळतें—

> "शृणु यक्ष कुलं तात न स्वाध्यायो न च श्रुतं ।
> कारणं हि द्विजत्वे च वृत्तमेव न संशय ॥" ३ ३१३ १०८

ब्राह्मण जर वाईट वर्तनाचा (असद्‌वृत्त) असेल व शूद्र जर सच्छील असेल तर तो ब्राह्मणाप्रमाणेंच पूजार्ह होय असें अनुशासनपर्व चित्रशाळाप्रत, १४३ ४७-५१ ) मध्यें सांगितलें आहे

(६) कसिभारद्वाज व धनियसुत्त या मधील सुंदर संवाद— कसिभारद्वाजसुत्तावरून (४) "भिक्षु हा एक आळशी प्राणी आहे" असा आरोप कांहीं लोक करीत असत असें दिसतें भारद्वाजब्राह्मण भिक्षा मागणाऱ्या बुद्धाला म्हणतो– "शेत नांगरून बी पेरून म्हणजे कष्ट करून मिळणाऱ्या घामानें तू अन्न कां मिळवीत नाहींस?" गौतम उत्तर देतो "मी आळशी नसून मीही मानसिक शेतीचें काम करीतच असतों मीही एक शेतकरी असून मनोविकासाचें काम करतों"

---

१ महाभारतावर बौद्धमताची छाप–ह्यासंबंधी सविस्तर विवेचन, "The Buddhist Influence on the Mahābhārata," (The Buddhist, Vesak 1955 Ceylon, Pages 75–77 ) ह्या माझ्या निबंधात सांपडेल

धनियसुत्तांत (२) ही असाच एक सुंदर संवाद आहे. आत्माधारक व कर्तव्यदक्ष पत्नी, सुंदर, निरोगी मुलें व लूप गुरेंढोरें ज्याच्याजवळ आहेत अशा एका गवळ्याची व उलटपक्षी निर्धन व घरदार नसलेल्या, भटक्या, अशा बुद्धाची तुलना करून हा भटक्या बुद्ध देखील सुखी असूं शकतो असें दाखविलें आहे. या अकिंचन बुद्धाला कसलेंही बंधन नसून तो कोणाचाही दास नाहीं. स्वतःच्याच निग्रही मनामुळें स्वतःचाच मालक बनला आहे. सुखामुळें तो हुरळून जात नाहीं किंवा दुःखामुळें गांगरूनही जात नाहीं; कारण तो निरुपाधि (अलिप्त) असा आहे

(ई) गौतमबुद्धाविषयींचीं तीन आख्यानें :—

पब्बज्जा (२७), पधान (२८) व नाळक (३७) ह्या सुत्तांना एक विशिष्ट महत्व आहे. ज्याच्यांतून बुद्धचरित्राची निर्मिति होऊं शकेल अशा एका विशिष्ट जुन्या धार्मिक आख्यानाचें अवशेष ह्यांत दिसतात. नाळकसुत्तांत बुद्धाच्या जन्मानंतर लगेच घडलेल्या एका घटनेची हकीकत आहे. पूज्य असित, बुद्धाच्या जन्मामुळें आनंदित झालेल्या देवांना पाहून, शुद्धोदनाच्या दरबारीं मुलाला पाहण्याकरितां आला. मुलाला पाहून त्यानें भविष्य वर्तविलें कीं, "हा सर्व जगाचा धर्मगुरु होईल". बुद्ध ज्या वेळेस अशा रीतीनें धर्मगुरु होऊन धर्मचक्र चालू करील त्या वेळेस आपण जिवन्त असणार नाहीं ह्यावद्दल त्याला वाईट वाटलें. म्हणून त्यानें आपला भाचा नाळक याला बुद्धाचा शिष्य होण्यास सांगितलें. अशा तऱ्हेचा कथाभाग ह्या सुत्ताच्या पहिल्या भागांत म्हणजे वत्थुगाथेंत आहे ह्याच सुत्ताच्या उत्तर भागात 'मोनेय' (७०१ पासून पुढें) सांगितलें आहे बालबुद्धाविषयीं ही पौराणिक कथा आहे व त्यांत बुद्धाची चमत्कार दाखविण्याची शक्ति वर्णिलेली आहे. पब्बज्जासुत्तांत बुद्धाच्या प्रव्रज्येची हकीकत आहे. आपलें घरदार सोडून मगध देशांत हिंडत असतां तो मगधाची राजधानी, राजगृह, येथें आला. मगध देशाचा राजा बिंबिसार यानें बुद्धाची भेट घेतली व आपल्या दरबारीं राहण्यास विनविलें पण बुद्धानें तें नाकबूल केलें व आपलें ध्येय गांठण्याकरितां अवश्य तें प्रयत्न करणें प्राप्त आहे असें सांगून तो निघून गेला. पधानसुत्तांत मार व गौतम यांचें संभाषण आहे गौतम

नेरंजरा (४२५) नांवाच्या नदीच्या काठीं बसला असून आपलें ध्येय गाठण्यासाठीं ध्यानस्थ बसलेला आहे. मार बुद्धाला त्या मार्गापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करतो व असा उपदेश करतो कीं, "ह्या काहीं भानगडींत न पडतां ब्रह्मचर्याच्या जीवनानेंच किंवा यज्ञ करूनच पुण्यसंचय करता येईल." पण गौतम पुण्यसंपादन करण्याबद्दल बेफिकिर असतो. शेवटीं, "सात वर्षें मी तुझा पाठलाग करीत आहें तरी मी तुझें मन वळवू शकलों नाहीं व तुझ्यावर ताबा मिळवू शकलों नाहीं," अशी कबुली देऊन निरुत्साही व दुःखित मनानें मार नाहींसा झाला (४४६–४४९). ही गोष्ट म्हणजे गौतमाच्या मनातील सत्प्रवृत्ति व असत्प्रवृत्ति ह्यांचा झगडा सुचविणारें काव्यमय रूपकच होय. लोभ, असमाधान, क्षुत्-पिपासा, तृष्णा, अनुत्साह व आलस्य, भीति, कुशंका, परगुणाबद्दल तिरस्कार, दुराग्रह, लाभ, कीर्ति व खोट्या मार्गानें मिळविलेल्या यशामुळें प्राप्त होणारी आत्मस्तुति व परनिंदा—हीं माराचीं आयुधें होतीं (४३६–४३९). ह्या सर्व असत्प्रवृत्तींवर जय मिळवल्यावर बुद्धाच्या मनातील सत्प्रवृत्तींचा विजय होतो.

(ड) *अट्ठकवग्ग*.—ह्या वग्गात सोळा सुत्तें आहेत, ह्यांचें, "अर्थकवर्गीय सूत्र" नावाचें संस्कृत भाषेंतील संस्करणाचे काहीं खंडित भाग मध्य-आशियात सापडले आहेत. एकात वर दिलेलें नाव सापडतें. चिनी[१] भाषेंतही या ग्रंथाचें संस्करण उपलब्ध असून त्यात प्रत्येक सुत्ताच्या पूर्वी गद्य कथानक घातलेलें आहे. चिनी ग्रंथाचें नावावरून मूळ नाव 'अर्थपदसूत्र' असेंही असावें असें दिसतें. ह्या सोळा सुत्रांपैकीं बहुतेक सुत्तांत शेवटल्या गाथेंत आदर्श मुनीचें वर्णन आहे. कामोपभागापासून दूर राहावें असें काम (३९), गुहट्ठक (४०), तिस्समेत्तेय्य (४५), व मागन्दिय (४७), ह्या सुत्तांत सांगितलें आहे. सर्व प्रकारचे वाद टाळून, आपली इतर पंथीयांशीं तुलना करून आपण श्रेष्ठ, बरोबरीचे किंवा कनिष्ठ अशी भाषा

१ *अर्थवर्गसूत्र* (*Vishva Bharati Studies*, 13, *Shantiniketan*, 1951) भाग १–२, ह्या मासिकाच्या इंग्रजी प्रस्तावनेंत चिनी संस्करणासंबंधीची सविस्तर माहिती मिळेल.

वर्ज्य करून आत्मश्लाघा किंवा परनिंदा सोडून द्यावी-असा विषय दुट्ठट्ठक, सुद्धट्ठक, परमट्ठक (४२–४३), पसूर, मागन्दिय (४६-४७), कलहविवाद (४९), चूळव्यूह, महाव्यूह (५०–५१), अत्तदण्ड (५३), इत्यादि सुत्तांचा आहे पुराभेद (४८), तुवट्टक, अत्तदण्ड व सारिपुत्त (५२–१४)—ह्या सुत्तांत आदर्श मुनीची चर्या (आचरण) सांगितली आहे ह्या व पुढील पारायणवग्गात, "दिट्ठ-सुत-मुत-वि-ञात," व शीलव्रतें ह्यांत गुरफटून जाऊ नये असें मोठ्या अट्टाहासानें सांगितलें आहे. उपनिषदांत सांगितल्याप्रमाणें, "आत्मा वा अरे द्रष्टव्य, श्रोतव्य, मन्तव्य निदिध्यासितव्य" (बृह० २ ४ ५) असल्या वचनांवर विश्वास ठेवणाऱ्या लोकांच्या दृष्ट, "श्रुत, मत, विज्ञात" (छां० ६ १३, ६ ४ ५) असल्या तऱ्हेच्या बडबडींत गुरफटून घेऊ नये कारण असल्या तऱ्हेच्या दृष्टीनें, श्रुतीनें किंवा ज्ञानानें, "मुनि बनत नसतो" (१०७८), अशानें काहीं शुद्धि प्राप्त होत नाहीं (७९०, ८३९, तेव्हा भिक्षूनें असल्या गोष्टींना किंवा शीलव्रतांना थारा देऊ नये (७९८)

(ऊ) **पारायणवग्ग**.— पारायणवग्गामधील वत्थुगाथेंतील आख्या नामुळें त्या वग्गांतील पुढचीं सोळा सुत्तें एकत्र ओंवली गेलीं आहेत. *बावरि नावाचा एक ब्राह्मण गोदावरी नदीच्या तीरावर यज्ञयाग करीत* राहत होता फार लांबून दुसरा एक ब्राह्मण आला व बावरीला ५०० (निष्क) मागू लागला नुकत्याच केलेल्या यज्ञांत पुष्कळ खर्च झाल्यामुळें *दरिद्री बनलेला बावरि पैसे देण्यास असमर्थ होता त्यामुळें हा दुसरा ब्राह्मण रागावला व त्यानें त्याला शाप दिला कीं,* "तुझ्या डोक्याचीं सात शकलें होतील" शाप ऐकून बावरि घाबरून गेला त्याची एक हितचिंतक देवता होती तिनें बावरीची अशी खात्री केली कीं, त्या दुष्ट्या ब्राह्मणाला डोकें किंवा डोक्याचीं शकलें होणें ह्यासंबंधीं काहींही ज्ञान नाहीं. तेव्हा त्यानें श्रावस्तीच्या बुद्धाकडे धाव घेऊन आपली शंका फेडून घ्यावी. *बावरीनें अजितादि आपल्या सोळा शिष्यांना बुद्धाकडे जाण्यास सांगितलें.* शिष्य प्रवासास निघाले त्यांच्या रस्त्यावरील गावाचीं नावेंही ह्या ठिकाणीं आपणास मिळतात व त्यावरून दक्षिणेंतून उत्तरेकडे

जाण्याकरिता चालू असलेल्या दळणवळणाच्या मार्गाची कल्पना येते. दक्षिणेकडून उत्तरेकडे जाणाऱ्या मार्गावरचीं ठिकाणें दिलीं आहेत तीं क्रमानें अशीं–प्रतिष्ठान (पैठण), माहिष्मती, उज्जयिनी, गोनद्ध, विदिशा, वनसाव्हय, कौशाम्बी, साकेत, श्रावस्ति, व तेथून पुढें सेतव्य, कपिलवस्तु, कुसिनगर (कुसिनारा), पावा व राजगृह. येथें राजगृहात गौतम बुद्ध श्रावस्तीहून आलेला होता. या शिष्याना जवळ येताना पाहून त्याच्या मनातील शंका बुद्धानें आपल्या दिव्य चक्षूनें ओळखल्या व त्याचें शंका-निरसन केलें. " अविद्या हें मस्तक आहे व श्रद्धा, स्मृति, समाधि, छन्द व वीर्य यानीं युक्त अशी जेव्हा विद्या असते तेव्हा ती मस्तकाचीं शकलें करणारी (मुद्धातिपातिनी) बनते " बुद्धाची ही दिव्य दृष्टि व दिव्य ज्ञान पाहून शिष्य खूप झाले व त्यानीं आपल्या गुरूच्या वतीनें साष्टांग प्रणिपात केला. बुद्धानें बावरीबद्दल व शिष्यांबद्दल सदिच्छा प्रकट केली व " तुमच्या इतर काहीं शंका असल्यास त्याचें निरसन करूं " असें आश्वासन दिलें. मग सोळाहि शिष्यानीं पाळीपाळीनें बुद्धाला प्रश्न केले व बुद्धानें त्याचीं उत्तरें दिलीं.

पारायणवग्ग सुत्तनिपाताच्या शेवटीं यावा हें यथायोग्यच आहे. या वग्गातच बुद्धानें बौद्धाचे जें उच्च ध्येय, निर्वाण किंवा मोक्ष, त्यासंबंधीं उत्तरें देऊन त्या सोळा शिष्यांचें समाधान केलें आहे. भवसागर कसा रीतीनें तरून जावा, लोभ व तृष्णा याचा कसा नाश करावा, दृष्टि (दिट्ठि), शील व व्रत या कशामध्येंही आसक्त न होता, मृत्यूची भीति न बाळगता, या जगात संपूर्ण सुखाचें स्थान कसें मिळविता येईल—हें सांगितलें आहे. थोडक्यात म्हटलें म्हणजे मृत्यूपार जाण्याचा, निर्मोक्षाचा किंवा निर्वाणाप्रत जाण्याचा, मार्ग सांगितला आहे (१०८९, ११०९, ११३९).

४९. आदर्शमुनि व त्याचें जीवन.—आदर्श मुनीच्या जीविताविषयीं व त्याच्या ध्येयप्राप्तीकरिता कराव्या लागणाऱ्या यत्नाविषयींची माहिती देणारीं बरींच सुत्तें या ग्रंथात आहेत एका जुन्या वचनाला सुत्तनिपाताचा पाठिंबाच मिळतो—" न यिद सुकर अगार अज्झावसता एकन्तपरिपुण्ण एकन्त परिसुद्ध सखलिखित ब्रह्मचरिय चरितु" (दीघ, सुत्त २,§४१). "जो मनुष्य

घरात राहतो त्याला संपूर्णपणे निष्कलंक असे जीवित जगणे कठिण " हे माहीत असल्यामुळे मुनि सर्व ऐहिक वस्तूपासून व इष्टमित्रापासून दूर राहतो कारण त्याचा सहवास दुःखास कारणीभूत होईल असे तो समजतो तो रानांत राहतो व भिक्षा मागण्यापुरताच गावात येतो भिक्षा मिळून गावातील राजकारणात किंवा इतर भानगडीत न पडता लगेच तो रानात परततो उत्तम वागणूक ठेवतो म्हणजे प्राणिहत्या, अब्रह्मचर्य, चोऱ्या, खोटे बोलणे व मद्यपान इत्यादीपासून दूर राहतो उच्च आसने, अलंकार, फुले, अत्तरे यांचा त्याग करून तो साधे आयुष्य घालवितो सोन्या चांदीचा स्वीकार करीत नाही, खरेदी विक्रीत गुंतून पडत नाही कोणाचे दास्य पत्करीत नाही, अधोदृष्टि ठेवून, चंचलता वर्ज्य करून, तो सरळ मार्गाने चालतो दिवसातून एकदाच जेवतो व तें सुद्धा मध्यान्ह होण्यापूर्वीच तो मिताहार घेतो पोट फुटेल इतके जेवत नाही किंवा पुढे उपयोगी पडेल म्हणून अन्न राखूनही ठेवीत नाही तो कोणाला ज्योतिष सांगून किंवा औषधे देऊन किंवा अथर्व वेदातल्याप्रमाणे मंत्रतंत्र सांगून आपली उपजीविका करीत नाही. स्वप्नाची फळे सांगत नाही किंवा पशुपक्ष्यांच्या ओरडण्यातील मर्मेही सांगत नाही तो पातिमोक्खातील नियमांचे कडक पालन करतो व शरीर, मन व जिव्हा यावर संयम राखतो. नफा तोटा, सुख दुःख, स्तुति निंदा, कीर्ति अपकीर्ति-यामुळे त्याचे मन हेलावत नाही " मी काय खाऊ ? कुठे खाऊ ? मला चांगली झोप मिळाली नाही, आज मी कुठे झोपू ? " ( १७० ), इत्यादि विचाराला थारा देत नाही. शीत उष्ण इत्यादि हवामानातील फरक तो सहन करतो चिलटे, डास किंवा भुईवर सरपटणाऱ्या प्राण्यांच्या दंशासंबंधी तो पर्वा करीत नाही कटु शब्द मुकाट्याने सहन करतो तो " जशास तसे " वागत नाही जेवणानंतरची दुपार ध्यानचिंतनात घालवतो. रूपावचर अरूपावचर ध्याने प्राप्त करून घेतो किंवा ब्रह्मविहाराची भावना करतो, म्हणजे विश्वातील अखिल प्राणिमात्रावर दया करतो, रोगानी पछाडलेल्या लोकांबद्दल करुणा बाळगतो, लोकांच्या भरभराटीत आनंद मानतो, पण कशातही त्याचे मन आसक्त राहत नाही सर्वांच्याबद्दल त्याच्या भावना समान असतात

**मुनीचें तत्त्वज्ञान** —मुनि कामभोगात चेहोषही होत नाहीं, किंवा उल्टपक्षीं देहदंडही आचरणात आणीत नाहीं दोन्ही टोंकें कटाक्षानें टाळून तो सुवर्णमध्य स्वीकारतो शाश्वतदृष्टि किंवा उच्छेददृष्टि या दोन्ही पासूनही तो दूर राहतो बौद्ध तत्वज्ञानातील तीन तत्त्वांवर त्याची अढळ श्रद्धा असते म्हणजे जगातील प्रत्यक्ष वस्तु 'अनित्य' आहे, 'दुःखमय' आहे, व 'अनात्म' आहे म्हणजे तत्त्वतः आपली म्हणता येईल अशी, किंवा चिरकाल टिकणारी अशी, नाहीं हें जाणतो मुनीचा विश्वास असा कीं जग हें कर्मानुसारी आहे—

"कम्मना वत्तति लोको, कम्मना वत्तति पजा ।
कम्मनिबन्धना सत्ता रथस्साणीव यायतो ।" (६२५)

जगातील दुःखावर विचार करून त्याला चार आर्यसत्यें व जगातील कार्य कारणभाव (पटिच्चसमुप्पाद) याचें ज्ञान चांगलें झालेलें असतें अविद्येमुळें तृष्णा उत्पन्न होते व तृष्णा हें सर्व दुःखाचें मूळ आहे, हे तो जाणतो तृष्णेचा नाश करणें शक्य आहे व तो नाश करण्याचा मार्गही आहे, हें तो जाणतो द्वयतानुपस्सनासुत्तात (३८) हें स्पष्ट सांगितलें आहे कीं सर्वसाधारण लोक अज्ञानामुळें हा नियम जाणत नाहींत (भवरागपरेतेहि भवसोतानुसारिहि । मारधेय्यानुपन्नेहि नाय धम्मो सुसम्बुधो ॥ ७६४) ज्या स्थितींत सर्व आस्रवांचा नाश होतो त्याचें ज्ञान फक्त आर्यांनाच होतें

को नु अञ्ञत्रमरियेहि पद सम्बुद्धुमरहति ।
य पद सम्मदञ्ञाय परिनिब्बन्ति अनासवा ॥ (७६५

ह्या आनंदमय स्थितीप्रत मुनि पोहोंचतो

**निर्वाण** —सर्व दुःखाचा नाश ज्या स्थितींत होतो त्या स्थितीला निर्वाण असें म्हणतात परंतु ती स्थिति कशी प्राप्त होते ? बौद्धधर्माच्या उत्तर कालीन इतिहासावरून असें आढळून येतें कीं निर्वाण या ध्येयाच्या बौद्धांच्या कल्पनेमध्यें अनेक फेरफार झालेले आहेत या संबंधाची सुत्तनिपातातील कल्पना आरंभींच्या कालाची दिसते निर्वाण हें यांत नम्मी तृष्णेच्या नाशामुळें व रागद्वेषमोहादि क्लेशांच्या उच्छेदामुळें प्राप्त होतें.

नन्दी-संयोजनो लोको वितक्कस्स विचारणा ।
तण्हाय विप्पहानेन निब्बाणमिति वुच्चति ॥ (११०९)

दुसऱ्या एका गाथेंत विमोक्षाबद्दल असें म्हटलें आहे—

यस्मिं कामा न वसन्ति तण्हा यस्स न विज्जति ।
कथंकथा च यो तिण्णो विमोक्खो तस्स नापरो ॥ (१०८९)

"ज्याच्या ठिकाणीं लोभ, तृष्णा, किंवा शंका कुशंका राहिल्या नाहींत त्याला विमोक्ष म्हणजे काहीं दुसरी वस्तु नव्हे" अशी स्थिति प्राप्त झालेल्या गरीब निष्कांचन मुनि कुठल्याही गोष्टीबद्दल लोभ न धरता, सांप्रदायिक दृष्टि (दिट्ठि), शील-व्रत यांच्या जंजाळांत न गुरफटता, तात्त्विक विचारानें चित्ताची समतोलता सांभाळीत, मरणाचा ( परिनिर्वाणाचा ) दिवस येईपर्यंत सन्मार्गानें आयुष्य घालवीत राहतो.

**परिनिर्वाणानंतरची स्थिति** —मृत्यूनंतर मुनीची काय अवस्था होते याबद्दल बुद्ध स्पष्ट काहींच सांगत नाहीं जगाची उत्पत्ति, हेतु, किंवा शेवट यासारख्या प्रश्नाप्रमाणेंच हा प्रश्न अज्ञेय आहे. बुद्ध म्हणतो—ज्याप्रमाणें दिव्याची ज्योत विझल्यानंतर तिचें काय होतें हें आपण जाणत नाहीं, त्याप्रमाणेंच मुनि नामकायापासून मुक्त झाल्यावर नाहींसा होतो, त्याचें काय होतें हें सांगता येत नाहीं

अच्चि यथा वातवेगेन खित्तो । अत्थं पलेति न उपेति संखं ।
एवं मुनि नामकाया विमुत्तो । अत्थं पलेति न उपेति संखं ॥ (१०७४)

देव व गन्धर्व देखील त्याची स्थिति जाणत नाहींत ( ६४४ ) ही शब्दातीत स्थिति आहे बावरीच्या सोळा शिष्यांपैकीं एकानें म्हणजे उपसीवानें बुद्धाला प्रश्न विचारला कीं, मुनि विमुक्त झाल्यानंतर तो कोणत्या स्थितींत असतो ? तो उच्छेद पावतो कीं शाश्वत कालपर्यंत निरोगी असा असतो ? बुद्धानें उत्तर केलें कीं, तो अस्तगत आहे त्याची मोजमापानें गणना केली जात नाहीं, व कोणचेही शब्द त्याचें वर्णन करू शकत नाहींत

अत्थंगतस्स न पमाणमत्थि । येन नं वज्जु तं तस्स नत्थि ।
सब्बेसु धम्मेसु समूहतेसु । समूहता वादपथाऽपि सब्बे ॥ (१०७६)

**बुद्धधर्म नीतिधर्म**—बुद्धधर्माला नीतिधर्म असेंही कित्येक वेळा म्हटलें जातें व ह्याला भरपूर बळकटी सुत्तनिपातात आढळते ईश्वराबद्दल जरी बुद्धधर्मांत–विशेषत प्राचीन बुद्धधर्मांत–मुग्धता बाळगलेली आढळते, तरी बौद्ध लोक देव देवता, स्वर्ग, नरक, कर्म पुनर्जन्म यावर विश्वास ठेवतात ब्राह्मणाचे देव, शक्र, ब्रह्मा, वगैरे–ह्याना बुद्धापेक्षा कनिष्ठ समजतात व ते बुद्धाकडे येऊन त्याला वन्दन करतात असें वर्णन आढळतें नीतिमय आयुष्य घालविण्याबद्दल व जगाचें खरें स्वरूप जाणण्याबद्दल भिक्षूना व गृहस्थ-लोकाना बुद्ध नेहमी उपदेश करीत असे धम्मिकसुत्तात ( २६ ) नीतिमय आयुष्य घालविण्याबद्दलच नियम सागितले आहेत व त्या नियमाचें पालन झालें म्हणजे गृहस्थ व्रताचें पालन झालें ह्या नीतिपरतेचें दुसरें लक्षण जें दिसून येतें तें हें कीं ब्राह्मण, श्रमण, स्नातक ( न्हातक ) खेत्तजिन, वेदगू परिव्राजक, नाग, पण्डित, श्रोत्रिय, इत्यादि शब्दाचा अर्थ नीतिपर लावणें हाय अशा तऱ्हेचे या शब्दाचे अर्थ सभियसुत्तात (३२) दिलेले आढळतात

**भाषा व विचारमाडणी** —सुत्तनिपाताचें प्राचीनत्व त्याच्या विषया प्रमाणें त्याच्या भाषेवरूनही दिसून येतें डॉ फाउसबोल ह्यानीं खालील विशेषाकडे विद्वानाचें लक्ष वधलेंच आहे —

नामाची व क्रियापदाची वैदिक बहुवचनी रूपें–समूहतासे (१४), पच्चयासे (१५), पण्डितासे (८७५ ७६) किंवा, चरामसे (-९), सिक्खिस्सामसे (८१४)

सक्षिप्त रूपें विनिच्छया, लक्खणा, ( विनिच्छयानि लक्खणानि ), मन्ता, परिञ्ञा लाभकम्या ( मन्ताय, परिञ्ञाय, लाभकम्याय ) सत्या, दुगच्छा, तिण्हा, समुच्चा थिया

काहीं ठिकाणीं छन्दाकरिता रूपें सक्षिप्त केलेलीं आहेत—

तद ( तदा ) ६८९, जनेत्व ( जनेत्वा ) ६९१, यद ( यदा ) ६९६, सिंचित्व ( सिंचित्वा ) ६७१

वैदिक कृदन्त रूपें —विप्पहातवे, उण्णमेतवे, सपयातवे, ( वैदिक त्वै प्रत्ययापासून )

वाढविलेलीं रूपें—आतुमान (८८८) सुवामि (६६६), सुवाना (२०१)

आर्षरूपे— सम्पति ( सन्निसम्मि ), पाद किंवा पाजा ( पपद्‌दि ), पवेच्छे ( पवेसेय्य ), मुस्स ( मुनिस्सामि ), दट्ठ ( दिस्वा ), परिब्बसानो ( परिवसमानो ), अवोचामि ( अवोच ), रुण्णेन ( रुदितेन ) ५८४, उग्गहायन्ति ( उग्गण्हन्ति ) ७९१.

अनियमित शब्द— आपथ ( १६४, ९६१ ), भुनहु, पटिसेनियन्ति, क्यास्स ( ९६१ ), उपय ( ७८७ ), अनानुदाता ( ७८४ ).

काहीं ठिकाणीं सांकेतिक शब्दयोजना किंवा संक्षिप्त रचना आढळते— युप्पपटिच्चसन्ति ( ७८४ ), मन्तमन्त्री मिगव्बगन्त्री, विभूतसञ्ञी ( ८७४ ), दिगुण, दसगुण ( ७१४ )

ब्राह्मण ग्रंथ व उपनिषदाप्रमाणें पालि वाङ्मयातही अनेक वाक्यें व शब्दप्रयोग यांची पुनरुक्ति आढळते सुत्तनिपात ह्याला अपवाद नाहीं सुत्तें ३, ६, ७, ११, १४, १६, २०, ३१, ३५ ह्या सुत्तांत कित्येक गाथांतील शेवटला चरण ध्रुवपद म्हणून वापरलेला आहे इतर पालि पुस्तकांप्रमाणें येथेंही हृदयाला भिडणाऱ्या भरपूर उपमा, उत्प्रेक्षा, रूपकें किंवा दृष्टान्त आढळतात ( ४६, ४८, २०१, २६५, ३२१, ५५३, ४४३, ८० ८३१, १२०, १०१४ ) मूर्ख माणसाची तुलना अर्धवट भरलेल्या भांड्याशीं किंवा खळखळणाऱ्या ओढ्याशीं केली आहे तर शहाण्या मनुष्याला शान्त सरोवराची किंवा शान्त नदीची उपमा दिली आहे ( ७२०-२१ ) या उपमा किती सार्थ आहेत ! एके ठिकाणीं आपल्या नातेवाइकांत असून बोलणारा माणूस जेव्हा मृत्यूनें ओढला जातो तेव्हा त्याला वधस्थानां त्याजकडून ओढल्या जाणाऱ्या गायीची उपमा दिली आहे ( ५८० ). दुसरे एके ठिकाणीं एकमेकांशीं झोंबाझोंबी करणाऱ्या या जगांतील माणसांना उथळ पाण्यांत जीवनाकरितां तडफडणाऱ्या माशाची उपमा दिली आहे ( ९३६ ). गृहस्थाश्रमी मनुष्य मुनीची बरोबरी कदापि करू शकत नाहीं, हें दाखविण्याकरितां एक अतिसमर्पक दृष्टान्त दिलेला आहे त्याप्रमाणें निळी मान असल्यामुळें सुंदर दिसणारा व आकाशांत ( थोडेंसें ) उडणारा मोर हंसाची गति कदापि प्राप्त होण्याजोगी नाहीं, त्याप्रमाणें गृहस्थाश्रमी मनुष्य मुनीची कदापि बरोबरी करू शकणार नाहीं ( २२१ ).

**छन्दोरचना.**—सुत्तनिपाताची सर्वसाधारण छन्दोरचना म्हणजे जुने वैदिक छन्द–आठ अक्षराचा अनुष्टुभ्, अकरा अक्षराचा त्रिष्टुभ्, किंवा बारा अक्षराचा जगती या छन्दातून अक्षराची संख्या ठराविक असते परंतु अक्षराच्या ह्रस्वत्वाकडे किंवा दीर्घत्वाकडे लक्ष दिलें जात नाहीं या वैदिक छन्दात छन्द शास्त्रातील उत्तर कालीन गणपद्धतीचा अवलंब केला जात नाहीं सुत्तनिपातात आपणास काहीं ठिकाणीं उत्तरकालीन गणवृत्ता पैकीं इन्द्रवज्रा व उपेन्द्रवज्रा याचें मिश्रण झालेलें आढळतें (२०८-२१२-२१४ १९) काहीं ठिकाणीं वंशस्थ व इन्द्रवंशा याचेंही मिश्रण आढळतें (२२१, ६८८ ९०) काहीं गाथा तेरा अक्षराच्या आहेत (२२०, ६७९-८०, ६९१-९८) त्याना अतिजगती असें म्हणतात पण त्यातील पक्तींचें पृथःकरण केलें तर गणपद्धतीच्या कोणत्याहि एका वर्गांत बसतीलच असें नाहीं काहीं गाथा वैतालीय वृत्तात आहेत (३७ ३४, ६५८ ५९, ८०४ १३) काहीं औपच्छन्दसिकात आहेत (१ १७, ८३-८७, ३६९-७३). कोकालियसुत्तातील (६६३ ७६) गाथाचें वृत्त वेगवती असून थोडाफार लवचिकपणाही त्यात आढळून येतो काहीं गाथाची शब्दरचना निर्दोष नसल्यामुळें त्या नीट सुरात म्हणता येत नाहींत (१४३-१५२, ९१६-३४). यामुळें त्याना सर्वसाधारण गाथा या नावानें संबोधलेलें बरें.

उत्तरकालीन संस्कृत वाङ्मयातल्याप्रमाणें या ग्रथात काव्यरचनेचे ठराविक नियम पाळलेले दिसत नाहींत. अनुष्टुभ् छन्दातील कित्येक गाथामध्यें सहा पाद किंवा चरण आढळतात (३०२, ३०६-३०७, ५४७, ७३९, ७८१, ७६२, ७६३, ९९२) त्रिष्टुभ् वृत्तातीलही काहीं गाथात पाच किंवा सहा पाद आढळतात (४६९, ४७८, ५०८, ८६३, ८७५,) काहींत सात किंवा आठही पाद आहेत (२१३, २३१, १०७९, १०८१, १०८२) गाथा ६५९ मध्यें आपणास वैतालिय वृत्तात पाच पाद आढळतात काहीं ठिकाणीं अनुष्टुभ व वैतालीय याचें मिश्रण आढळतें (१५३, ४५७, ५४०), तर काहीं ठिकाणीं अनुष्टुभ् व त्रिष्टुभ् याचें मिश्रण आढळतें (३२७, ४५९, ४८२, ४८६, १०५५ ते २०६८, ११४९).

अशा रीतीनें ह्या ग्रंथाचा परिचय सर्व साधारण वाचकासही उद्बोधक होईल अशा रीतीनें करून दिला आहे. जिज्ञासू लोक ह्या ग्रंथ प्रत्यक्ष वाचूनच त्याचा परिचय करून घेतील अशी आशा प्रदर्शित करून हा लांबलेला ग्रंथ-परिचय पुरा करतो.

स्वाध्याय, पुणें ४
२०।७।५५

पु. वि. बापट

## सुत्तनिपाताच्या अभ्यासास उपयोगी पडणारीं पुस्तकें

१. सुत्तनिपात— Anderson and Smith ह्यानीं संपादिलेला व पालि टेक्स्ट सोसायटीनें छापलेला ग्रंथ.

२. सुत्तनिपात— मूळ व इंग्रजी भाषांतर – Buddha's Teachings, by Lord Chalmers (Harvard Oriental Series, No. 37).

३. सुत्तनिपात— (Part I-II) उरगवग्ग व चूळवग्ग – मूळ व इंग्रजी भाषांतर by Sister Vajira, Mahabodhi Society, Sarnath, U. P.

४. सुत्तनिपात— मूळ व हिन्दी भाषांतर, भिक्षु धर्मरत्नकृत, महाबोधिसभा, सारनाथ.

५. सुत्तनिपात— बंगाली भाषांतर, भिक्षु शीलभद्रकृत, महाबोधि सोसायटी, कलकत्ता.

६. सुत्तनिपात— सिंहली लिपींत छापलेला, विद्यारत्नाकर छापखाना, बुद्धशक २४३४ = इ. स. १८९१.

७. सुत्तनिपात— इंग्रजी भाषांतर, Woven Cadences, by E. M Hare, Oxford Uni Press, 1947.

८. सुत्तनिपात— इंग्रजी भाषांतर, फाउसबोलकृत, Sacred Books of the East, Vol. X.

९. सुत्तनिपात— मूळ, इंग्रजी प्रस्तावना, टीकेंतील उतारे व समानार्थी उताऱ्याच्या संदर्भासह, डॉ. पु. वि. बापट ह्यानीं संपादिलेला, पुणें, १९२४.

१०. परमत्थजोतिका— भाग २ (सुत्तनिपात-अट्ठकथा), Helmer Smith नें संपादिलेला (PTS.)

११. परमत्थजोतिका — भाग २ ३ (पृष्ठे ५६७ ६४४) Metres of Suttanipāta

१२. निद्देस — अट्ठकवग्ग, पारायणवग्ग व खग्गविसाणसुत्त ह्यावर त्रिपिटकात अन्तर्भूत झालेली टीका (PTS and Simon Hevavitarane Bequest Fund Series, Colombo)

१३ निद्देसटीका—सद्धम्मपज्जोतिका, edited by A P Buddhadatta (PTS) भाग १–२

१४ अर्थपद्सूत्र — पालि अट्ठकवग्ग व चिनी संस्करणाचें इंग्रजी भाषांतर, डॉ पु वि बापटकृत, विश्वभारती, शान्तिनिकेतन, १९५१

१५ Katam Karaniyam— Anesaki s Articles reprinted, Tokyo, 1934, pp. 288 304

१६, University of Ceylon Review, 1948 -49, 50 सुत्तनिपातावर N A Jayawikrama यानीं लिहिलेले लेख.

१७ History of Indian Literature Vol II pp 92 98 English Translation (Calcutta University, 1933)

१८, History of Pali Literature—by B C Law, Vol I, pp 230 260

नमो तस्स भगवतो अरहतो सम्मासम्बुद्धस्स।

# सुत्तनिपातो।



## [ १. उरगवग्गो ]

### १

### [ १. उरगसुत्तं ]

१ यो[1] उप्पतितं विनेति कोधं विसतं[2] सप्पविसं'व ओसधेहि।
सो भिक्खु जहाति ओरपारं उरगो जिण्णमिव तचं पुराणं ॥१॥

१ सी०–यो वे. २–म०–विसटं.

त्या भगवान् अर्हत् सम्यक्–सबुद्ध [ गोतमाला ] नमस्कार असो.

# सुत्तनिपात

## [ उरगवग्ग, पहिला ]

### १

### [ १ उरगसुत्त ]

१. पसरत जाणाऱ्या सर्पाच्या विषाचा ज्याप्रमाणें औषधानीं नाश करावा, त्याप्रमाणें एकाएकीं उत्पन्न होणाऱ्या क्रोधाचा जो नाश करतो तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो. ( १ )

२ यो रागमुदच्छिदा असेस भिसपुप्फं'व सरोरुहं विगुय्ह ।
सो भिक्खु जहाति ओरपार उरगो जिण्णमिव तच पुराण ॥२॥

३ यो तण्हमुदच्छिदा असेस सरित सीघसर विसोसयित्वा ।
सो भिक्खु जहाति ओरपार उरगो जिण्णमिव तच पुराण ॥३॥

४ यो मानमुदब्बधी असेस नळसेतुं'व सुदुब्बल महोघो ।
सो भिक्खु जहाति ओरपार उरगो जिण्णमिव तच पुराण ॥४॥

---

१ सी०–विसेसयित्वा.

---

२. पाण्यात शिरून जसें (सुलभपणें) कमळ तोडावें, तसा ज्यानें कामविकाराचा समूळ त्याग केला आहे तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो. (२)

३. ज्यानें जोरानें वाहणाऱ्या तृष्णा-नदीला शोषवून तिचा समूळ नाश केला आहे तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत इहपरलोक सोडून जातो. (३)

४. जसा महौघ देवनळाचा अति-दुर्बळ पूल (सहज) मोडून टाकतो, तसा ज्यानें आपल्या मानाचा (अहंकाराचा) क्षय केला आहे तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो. (४)

५ यो नाज्झगमा भवेसु सारं विचिनं पुप्फमिव उदुम्बरेसु।
सो भिक्खु जहाति ओरपारं उरगो जिण्णमिव तच पुराण ॥५॥

६ यस्सऽन्तरतो न सन्ति कोपा इति भवाभवत च वीतिवत्तो।
सो भिक्खु जहाति ओरपारं उरगो जिण्णमिव तच पुराण ॥६॥

७ यस्स वितक्का विधूपिता अज्झत्तं सुविकप्पिता असेसा।
सो भिक्खु जहाति ओरपारं उरगो जिण्णमिव तच पुराण ॥७॥

१. म०-विदूसिता.

५. उदुंबर वृक्षावर जसें शोधूं गेलें तरी फूल सांपडत नाहीं, तसें ज्याला भवांत (पुनर्जन्मांत) सार दिसलें नाहीं तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो. (५)

६. ज्याच्या अन्तःकरणांत कोप राहिला नाहीं, व जो शाश्वतता आणि अशाश्वततो याच्या पलीकडे पोहोंचला आहे तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो. (६)

७. ज्याच्या अन्तःकरणांतील वितर्क जाळून समूळ कापून टाकले गेले आहेत तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो. (७)

१. अट्ठकथाकारानें दिलेल्या अनेक अर्थांपैकीं हा एक अर्थ आहे.
२. वितर्क तीन प्रकारचे—(१) कामवितर्क, (२) व्यापादवितर्क व (३) विहिंसावितर्क

८ यो नाच्चसारी न पच्चसारी सब्बं अच्चगमा इमं पपञ्चं ।
सो भिक्खु जहाति ओरपारं उरगो जिण्णमिव तचं पुराणं ॥८॥

९ यो नाच्चसारी न पच्चसारी सब्बं वितथमिदं'ति ञत्वा लोके ।
सो भिक्खु जहाति ओरपारं उरगो जिण्णमिव तचं पुराणं ॥९॥

१० यो नाच्चसारी न पच्चसारी सब्बं वितथमिदं'ति वीतलोभो ।
सो भिक्खु जहाति ओरपारं उरगो जिण्णमिव तचं पुराणं ॥१०॥

---

१ म०—नच्चसारि. २ म०—अच्च°.

---

८. जो पुढें धांव घेत नाहीं व मागेंही पडत नाहीं[1], व जो या प्रपंचाच्या पार गेला आहे तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो. ( ८ )

९. जो पुढें धाव घेत नाहीं व मागेंही पडत नाहीं, व (प्रापंचिक) वस्तुजात भासते तशी खरोखर नाहीं असें जो जाणतो तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो. ( ९ )

१०. जो पुढें धांव घेत नाहीं व मागेंही पडत नाहीं, आणि (प्रापंचिक) वस्तुजात जशी भासते तशी खरोखर नाहीं असें जाणून वीतलोभ होतो तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो. ( १० )

---

१. पुढें धाव घेणें म्हणजे अतिविचार करणें, व मागें पडणें म्हणजे आळसांत पडून राहणें.

११ यो नाच्चसारी न पच्चसारी सब्ब वितथमिद ति वीतरागो ।
सो भिक्खु जहाति ओरपार उरगो जिण्णमिव तच पुराण ॥११॥

१२ यो नाच्चसारी न पच्चसारी सब्ब वितथमिद'ति वीतदोसो ।
सो भिक्खु जहाति ओरपार उरगो जिण्णमिव तच पुराण ॥१२॥

१३ यो नाच्चसारी न पच्चसारी सब्ब वितथमिद'ति वीतमोहो ।
सो भिक्खु जहाति ओरपार उरगो जिण्णमिव तच पुराण ॥१३॥

---

११. जो पुढें धाव घेत नाहीं व मागेंही पडत नाहीं, आणि (प्रापचिक) वस्तु जात जशी भासते तशी खरोखर नाहीं असें जाणून वीतराग होतो तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो. (११)

१२. जो पुढें धाव घेत नाहीं व मागेंही पडत नाहीं, आणि (प्रापचिक) वस्तुजात जशी भासते तशी खरोखर नाहीं असें जाणून वीतद्वेष होतो तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो. (१२)

१३. जो पुढें धाव घेत नाहीं व मागेंही पडत नाहीं, आणि (प्रापचिक) वस्तुजात जशी भासते तशी खरोखर नाहीं असें जाणून वीतमोह होतो तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो. (१३)

१४ यस्सानुसया न सन्ति केचि मूला अकुसला समूहतासे ।
सो भिक्खु जहाति ओरपारं उरगो जिण्णमिव तच पुराणं ॥१४॥

१५ यस्स दरथजा न सन्ति केचि ओरं आगमनाय पच्चयासे ।
सो भिक्खु जहाति ओरपारं उरगो जिण्णमिव तच पुराणं ॥१५॥

१६ यस्स वनथजा न सन्ति केचि विनिबन्धाय भवाय हेतुकप्पा ।
सो भिक्खु जहाति ओरपारं उरगो जिण्णमिव तच पुराणं ॥१६॥

---

१ म०---उरगजा

---

१४ ज्याच्या अन्तःकरणात अनुशये मुळींच राहिले नाहींत, आणि अकुशलाचीं मुळें उपटून टाकण्यात आलीं आहेत तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो. (१४) [१] [२]

१५ इहलोकीं पुनर्जन्माला कारणीभूत असे भीतीपासून उद्भवलेले संस्कार ज्याच्यामध्यें राहिले नाहींत तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो. (१५)

१६. ज्याच्यामध्यें भवबन्धनाला कारणीभूत असे तृष्णेपासून उद्भवलेले संस्कार राहिले नाहींत तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो (१६)

---

१. अनुशय म्हणजे दडून राहणारे पापसंस्कार—ते सात आहेत राग, द्वेष, मान, (मिथ्या) दृष्टि, शंका, पुनर्जन्माचा लोभ व अविद्या
२. अकुशलाचीं मुळें तीन—लोभ, द्वेष आणि मोह

१७ यो नीवरणे पहाय पंच अनिघो[1] तिण्णकथंकथो विसल्लो[2] ।
सो भिक्खु जहाति ओरपारं उरगो जिण्णमिव तचं पुराणं ॥१७॥

उरगसुत्तं निट्ठितं ।

---

## २

### [ २. धनियसुत्तं ]

१८ पक्कोदनो दुद्धखीरो[2]ऽहमस्मि (इति धनियो गोपो)
अनुतीरे महिया समानवासो ।
छन्ना कुटि आहितो गिनि
अथ चे पत्थयसी[3] पवस्स देव ॥१॥

---

१ सी०, अ०—अनीघो. २ म०—°खिरो. ३ म०—पत्थयसि.

---

१७. जो पाच ( बुद्धीचीं ) आवरणें[1] सोडून निर्दुःख, निःशंक आणि तृष्णाशल्यविरहित होतो तो भिक्षु, सर्प जसा जीर्ण झालेली जुनी कातडी टाकून जातो, तद्वत् इहपरलोक सोडून जातो. (१७).

उरगसुत्त समाप्त

---

## २

### [ २. धनियसुत्त ]

१८ "माझें अन्न तयार आहे, व गाई दोहून झाल्या आहेत," असें धनिय गोप म्हणाला—, "मही नदीच्या तीरीं मी प्रियजनांसह राहत आहें, माझी कुटी शाकारलेली आहे, व आग पेटवलेली आहे, तर हे मेघराजा, तुझी इच्छा असल्यास खुशाल वर्षाव कर !" ( १ )

१. बुद्धीचीं आवरणें ( नीवरणें ) हीं पाच आहेतः— कामच्छन्द, व्यापाद ( द्वेषबुद्धि ), आळस, भ्रान्तचित्तता व कुशंका. विशेष माहितीसाठीं 'समाधिमार्ग' पृष्ठ ३२ पहा.

१९ अक्कोधनो विगतखिलोऽहमस्मि (इति भगवा)
अनुतीरे महियेकरत्तिवासो।
विवटा कुटि निब्बुतो गिनि
अथ चे पत्थयसी पवस्स देव ॥२॥

२० अंधकमकसा न विज्जरे (इति धनियो गोपो)
कच्छे रूळ्हतिणे चरन्ति गावो।
वुट्ठिऽपि सहेय्यु आगतं
अथ चे पत्थयसी पवस्स देव ॥३॥

१ रो०- °खीलो. २ म०-पत्थयासि. ३ म०-गावो.

१९. "मी अक्रोधन आणि विगतखिल[1] आहे," असें भगवान् म्हणाला,—"महीच्या कांठीं (केवळ) एका रात्रीचा निवास आहे, माझी कुटी उघडी आहे व अग्नि[2] विझलेला आहे, तर हे मेघराजा, तुझी इच्छा असल्यास खुशाल वर्षाव कर!" (२)

२०. "येथें गोमाशा[3] व डास नाहींत,"—असें धनिय गोप म्हणाला,—"नदीकांठीं वाढलेल्या गवतांत गाई चरतात, तेव्हां पाऊस आला तरी त्या सहन करतील, तर हे मेघराजा, तुझी इच्छा असल्यास खुशाल वर्षाव कर!" (३)

१. उघर जमिनीला खिल म्हणतात. अशा तऱ्हेचें काठिन्य ज्याच्या चित्तांतून गेलें तो विगतखिल. चित्ताचे पांच खिल आहेत, त्यांचें वर्णन मज्झिम-निकायांतील चेतोखिल सुत्तांत (नं. १६) सांपडेल.

२. अग्नि ११ आहेत. ते हेः—काम, क्रोध, मोह, जाति, जरा, मरण, शोक, परिदेव, दुःख, दौर्मनस्य, उपायास. (महावग्ग, आदित्तपरियायसुत्त पहा.)

३. अ०—छा(ळ) मक्खिका किंवा पिंग मक्खिका.

२१ बद्धा हि भिसी[1] सुसंखता[2] (इति भगवा)
तिण्णो पारगतो[3] विनेय्य ओघ ।
अत्थो भिसिया न विज्जति
अथ चे पत्थयसी पवस्स देव ॥४॥

२२ गोपी मम अस्सवा अलोला (इति धनियो गोपो)
दीघरत्त[4] सवासिया मनापा ।
तस्सा न सुणामि किंचि पाप
अथ चे पत्थयसी पवस्स देव ॥५॥

२३ चित्त मम अस्सव विमुत्त (इति भगवा)
दीघरत्त[5] परिभावित सुदन्त ।

१ म०–भिसि. २ म०– °खाता. ३ म०–पारगतो. ४ म०– दि°
५ म०–दि

२१. "माझा ताफा बांधून चांगला तयार आहे" असें भगवान् म्हणाला,— "मी ओघ उतरून पार गेलों आहे, आता ताफ्याचें कारण राहिलें नाहीं, तर हे मेघराजा, तुझी इच्छा असल्यास खुशाल वर्षाव कर!" (४)

२२. "माझी गोपी आज्ञाधारक आणि स्थिर मनाची आहे"— असें धनिय गोप म्हणाला,—"चिरकाल ती मजबरोबर राहत असून मला प्रिय आहे, तिच्यात कोणतेंही वाईट असल्याचें माझें ऐकिवात नाहीं, तर हे मेघराजा, तुझी इच्छा असल्यास खुशाल वर्षाव कर!" (५)

२३ "माझें चित्त माझ्या ताब्यात आहे, व तें विमुक्त आहे" असें भगवान् म्हणाला,—"तें चिरकाल अभ्यासानें भावित आणि

पाप पुन[1] मे न विज्जति
अथ चे पत्थयसी पवस्स देव ॥६॥

२४ अत्तवेतनभतोऽहमस्मि (इति धनियो गोपो)
पुत्ता च[2] मे[2] समानिया अरोगा ।
तेसं न सुणामि किंचि पाप
अथ चे पत्थयसी पवस्स देव ॥७॥

२५ नाहं भतकोऽस्मि कस्सचि ( इति भगवा )
निब्बिट्ठेन चरामि सब्बलोके ।
अथो भतियों[4] न विज्जति
अथ चे पत्थयसी पवस्स देव ॥८॥

१ म०–ंभटो २–२ म०–चेमे ३ अ०–भटको ४ म० भटिया अ०–भटिया ति पि

संयमित आहे, माझ्यात पाप नाहीं, तर हे मेघराजा, तुझी इच्छा असल्यास खुशाल वर्षाव कर ! " ( ६ )

२४ " मी स्वतःच्या श्रमानें निर्वाह करतों "–असें धनिय गोप म्हणाला,—" आणि माझे पुत्र माझ्या बरोबर आहेत व निरोगी आहेत, त्यांच्यात कोणतेंही वाईट असल्याचें माझें ऐकिवात नाहीं तर हे मेघराजा, तुझी इच्छा असल्यास खुशाल वर्षाव कर ! " ( ७ )

२५ " मी कोणाचा नोकर नाहीं "–असें भगवान् म्हणाला, " मी माझ्या माडवलावर राहत आहें, नोकरीची मला गरज नाहीं, तर हे मेघराजा, तुझी इच्छा असल्यास खुशाल वर्षाव कर ! " ( ८ )

२६ अत्थि वसा अत्थि धेनुपा ( इति धनियो गोपो )
गोधरणियो पवेणियोऽपि अत्थि ।
उसभोऽपि गवपती च अत्थि
अथ चे पत्थयसी पवस्स देव ॥९॥

२७ नत्थि वसा नत्थि धेनुपा (इति भगवा)
गोधरणियो पवेणियोऽपि नत्थि ।
उसभोऽपि गवपतीध नत्थि
अथ चे पत्थयसी पवस्स देव ॥१०॥

२८ खीलाँ निखाता असपवेधी ( इति धनियो गोपो )
दामा मुञ्जमया नवा सुसण्ठाना ।

१ म०–पवेनियो. २ म०–ति ३ म०–ति च. ४ सी०–खिळा, म०– खिला.

२६. "मजपाशीं गाई[1] व दूध पिणारीं वासरें आहेत"—असें धनिय गोप म्हणाला,—"गाभण्या व फळणाऱ्या गाई आहेत, आणि गाईंचा पुढारी बैल आहे, तर हे मेघराजा, तुझी इच्छा असल्यास खुशाल वर्षाव कर !" (९)

२७. "मजपाशीं गाई व दूध पिणारीं वासरें नाहींत"—असें भगवान् म्हणाला,—"गाभण्या व फळणाऱ्या गाई नाहींत, आणि गाईंचा पुढारी बैल नाहीं, तर हे मेघराजा, तुझी इच्छा असल्यास खुशाल वर्षाव कर !" (१०)

२८. "खुंट चांगले गाडले आहेत, ते हालत नाहींत"—असें धनिय गोप म्हणाला,—"दावीं मुंज गवताचीं असून उत्तम

१ पण अ०–दमन न करता बाढलेलीं वासरें.

न हि सक्खिन्ति धेनुपाऽपि छेत्तु
अथ चे पत्थयसी पवस्स देव ॥११॥

२९ उसभोरिव छेत्व बधनानि ( इति भगवा )
नागो पूतिलत व दालयित्वा।
नाहं पुन उपेस्सं गब्भसेय्य
अथ चे पत्थयसी पवस्स देव ॥१२॥

३० निन्नं च थलं च पूरयन्तो महामेघो पावस्सि तावदेव।
सुत्वा देवस्स वस्सतो इममत्थं धनियो अभासथ ॥१३॥

१ म०—सक्खिस्सन्ति २ म०—छेत्वा ३ सी०—दाळ°, म०—पदालयित्वा ४ म०—उपेय्य

बनविलीं आहेत व नवीं आहेत, दूध पिणाऱ्या वासरांना देखील तीं तोडता येणार नाहींत, तर हे मेघराजा, तुझी इच्छा असल्यास खुशाल वर्षाव कर !" (११)

२९ "ऋषभाप्रमाणें ( प्रमुख बैलाप्रमाणें ) मीं बन्धनें तोडलीं आहेत"—असें भगवान् म्हणाला,—"हत्तीनें जशी गुळवेल तोडावी, तद्वत् मी त्याचा उच्छेद केला आहे आता मी पुनरपि गर्भवासाला जाणार नाहीं, तर हे मेघराजा, तुझी इच्छा असल्यास खुशाल वर्षाव कर !" (१२)

३० असें भगवान् म्हणत आहे तोंच जलस्थळ महामेघानें भरून टाकलें पाऊस पडू लागल्याचा आवाज ऐकून धनिय येणें-प्रमाणें बोलता झाला —(१३)

३१ लाभा वत नो अनप्पका ये मयं भगवन्तं अद्दसाम ।
सरणं तमुपेम चक्खुम सत्था नो होहि तुवं महामुनि ॥१४॥

३२ गोपी च अहं च अस्सवा ब्रह्मचरियं सुगते चरामसे ।
जातिमरणस्स पारगो दुक्खस्सऽन्तकरा भवामसे ॥१५॥

३३ नन्दति पुत्तेहि पुत्तिमा (इति मारो पापिमा)
गोमिको गोहि तथेव नन्दति ।

उपधी हि नरस्स नन्दना
न हि सो नन्दति यो निरूपधि ॥१६॥

---

१ अ०—चरेमसे इति'पि पाठं विकप्पेन्ति । २ म०—जातिजरामरणस्स. ३ म०—°गू. ४ म०—गोपियो, अ०—गोमियो.

---

३१. "खरोखर आम्ही धन्य आहोंत; का कीं, भगवन्ताचें आम्हास दर्शन घडलें । हे चक्षुष्मन्, तुला आम्ही शरण जातों. हे महामुने, तू आमचा शास्ता हो. (१४)

३२. "मी आणि माझी आज्ञाधारक गोपी सुगताच्या आश्रया-खालीं ब्रह्मचर्य पालन करूं आणि जन्ममरणाच्या पार जाऊन दु:खाचा अन्त करूं." (१५)

३३. "पुत्रवन्ताला पुत्रामुळें आनंद होतो." असें पापी मार म्हणाला, "त्याचप्रमाणें गाईच्या मालकाला गाईमुळें आनंद होतो; कारण उपाधि मनुष्याला आनंद देते व उपाधिरहित माणसाला आनंद मिळत नाहीं." (१६)

३४ सोचति पुत्तेहि पुत्तिमा (इति भगवा) गोमिको[1] गोहि तथेव सोचति।
उपधी हि नरस्स सोचना न हि सो सोचति यो निरूपधी
ति ॥१७॥

धनियसुत्तं निट्ठितं।

---

## ३

### [ ३. खग्गविसाण–सुत्तं ]

३५ सब्बेसु भूतेसु निधाय दण्डं अविहेठयं[2] अञ्ञतरऽपि तेसं।
न पुत्तमिच्छेय्य कुतो सहाय एको चरे खग्गविसाणकप्पो ॥१॥

१ म०-गोपियो, गोपिको. २ नि०- अहेठयं.

३४. "पुत्रवन्ताला पुत्रामुळें शोक होतो." असें भगवान् म्हणाला, "त्याचप्रमाणें गाईंच्या मालकाला गाईंमुळें शोक होतो; कारण उपाधि माणसाला शोकदायिनी आहे व जो उपाधिरहित, तो शोक करीत नाहीं." (१७)

धनियसुत्त समाप्त

---

## ३

### [ ३. खग्गविसाणसुत्त ]

३५. भूतमात्राविषयीं दण्डबुद्धि सोडून देऊन त्यापैकीं एकालाही त्रास देऊं नये, (आणि) पुत्राचीहि आशा धरूं नये, मग सहायाची (मित्राची) गोष्ट कशाला? (आणि) गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (१)

३६ संसग्गजातस्स भवन्ति[1] स्नेहा स्नेहन्वयं दुक्खमिदं पहोति ।
आदीनवं स्नेहजं पेक्खमानो एको चरे खग्गविसाणकप्पो ॥२॥

३७ मित्ते सुहज्जे अनुकम्पमानो हापेति अत्थं पटिबद्धचित्तो[2] ।
एतं भयं सन्थवे[3] पेक्खमानो एको चरे खग्गविसाणकप्पो ॥३॥

३८ वंसो विसालो'व यथा विसत्तो पुत्तेसु दारेसु च या अपेक्खा[4] ।
वंसाकळीरो[5] व असज्जमानो एको चरे खग्गविसाणकप्पो ॥४॥

३९ मिगो अरञ्ञम्हि यथा अबद्धो येनिच्छकं गच्छति गोचराय ।
विञ्ञू[6] नरो [7]सेरितं पेक्खमानो एको चरे खग्गविसाणकप्पो ॥५॥

---

१ रो०-भवति स्नेहो. २ म०-पटिबन्धचित्तो. ३ म०-°न्थ. ४ सी०-अपेक्खा. ५ सी०-°क्कळीरो, अ०-वंसक्कळीरो. ६ म०-विञ्ञु. ७ निद्दे०-सेरितं.

---

३६. संसर्ग घडल्यानें स्नेह उत्पन्न होतो. स्नेहापासून हें दुःख उत्पन्न होतें. हा स्नेहापासून उत्पन्न होणारा दोष पाहून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (२)

३७. मित्रसुहृदांना मदत करण्याच्या उद्देशानें आसक्तचित्त होऊन सदर्थ सोडून देतो. परस्पर प्रेमात हें भय पाहून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (३)

३८. विशाल वेळू जसा ( इतर वेळूमध्यें ) गुंतून जातो, तद्वत् पुत्रदाराची अपेक्षा होय. वेळूच्या मोडाप्रमाणें संलग्न न होतां गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (४)

३९. अरण्यातील मोकळा मृग चरण्यासाठीं जसा यथेष्ट विहार करतो, त्याप्रमाणें सुज्ञ माणसानें आपली स्वतंत्रता जाणून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (५)

४० आमन्तना होति सहायमज्झे वासे[1] ठाने[2] गमने चारिकाय ।
अनभिज्झित[3] सेरित पेक्खमानो एको चरे खग्गविसाणकप्पो ॥६॥
४१ खिड्डा रती होति सहायमज्झे पुत्तेसु च विपुल होति पेम ।
पियविप्पयोग विजिगुच्छमानो एको चरे खग्गविसाणकप्पो ॥७॥
४२ चातुद्दिसो अप्पटिघो च होति सन्तुस्समानो इतरीतरेन ।
परिस्सयान सहिता अछम्भी[4] एको चरे खग्गविसाणकप्पो ॥८॥
४३ दुस्सगहा पब्बजिता पि एके अथो गहट्ठा घरमावसन्ता ।
अप्पोस्सुक्को परपुत्तेसु हुत्वा एको चरे खग्गविसाणकप्पो ॥९॥

१ म०— °न्तणा २-२ म० वासेय्यठाने. ३ म०—अनतिज्झित, अनभिज्झित. ४ अ०—अच्छमी.

४०. मित्राबरोबर असल्यानें राहण्या-उसण्यासाठीं व जाण्या-येण्यासाठीं बोलावणें होतें, (पण) निर्लोभता ही स्वतंत्रता असें जाणून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (६)

४१. आप्तेष्टाबरोबर राहिल्यानें करमणूक आणि आनंद वाटतो, आणि मुलांवर फार प्रेम जडतें. (पण) प्रियाच्या वियोगामुळें उबग वाटून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें (७)

४२. कितीहि अल्पलाभ झाला तरी त्यात संतोष मानणारा चार ही दिशांना जाण्याला मोकळा व अप्रतिबन्ध होतो. (म्हणून) विघ्नें सहन करून निर्भयपणें गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें (८)

४३ कित्येक संन्यासीहि असे असतात कीं, त्यांचा संग्रह करणें कठीण जातें, मग घरात राहणाऱ्या गृहस्थाश्रम्यांची (तर गोष्टच विचारावयास नको.) (म्हणून) इतरांच्या मुलांविषयीं बेफिकिर होऊन गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (९)

४४ ओरोपयित्वा गिहिब्यञ्जनानि संसीनपत्तो यथा कोविळारो ॥
छेत्वान वीरो[१] गिहिबन्धनानि एको चरे खग्गविसाणकप्पो ॥ १० ॥

४५ सचे लभेथ निपकं सहायं सद्धिंचरं साधुविहारि धीरं ।
अभिभुय्य सब्बानि परिस्सयानि चरेय्य तेनऽत्तमनो सतीमा ॥ ११ ॥

४६ नो चे लभेथ निपकं सहायं सद्धिंचरं साधुविहारि धीरं ।
राजा व रट्ठं विजितं पहाय एको चरे खग्गविसाणकप्पो ॥ १२ ॥

४७ अद्धा पसंसाम सहायसंपदं सेट्ठा समा सेवितब्बा सहाया ॥
एते अलद्धा अनवज्जभोजी एको चरे खग्गविसाणकप्पो ॥ १३ ॥

१ म०-सभिन्न°, सञ्छिन्न°. २ म०-धीरो ३ ज०-°रिं ४ म०-°जि.

४४. पानें गळालेल्या कोविदार वृक्षाप्रमाणें गृहस्थाश्रमाचीं चिन्हें टाकून आणि गृहस्थाश्रमाचीं बन्धनें तोडून शूरानें गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें (१०)

४५ जर हुशार, सन्मार्गानें वागणारा व धैर्यवान् साथी मिळाला, तर सर्व विघ्नें सहन करून स्मृतिमान् राहून आनंदानें त्याजबरोबर राहावें (११)

४६ जर हुशार, सन्मार्गानें वागणारा व धैर्यवान् साथी मिळाला नाहीं, तर राजा विजित (दुसऱ्याच्या ताब्यांत गेलेलें) राष्ट्र सोडून जातो, तद्वत् गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें (१२)

४७. मित्रसंपदेची आम्ही खात्रीनें तारीफ करतों समानशील किंवा आपणापेक्षा श्रेष्ठ मित्राची संगत धरावी (पण) जर असे साथी मिळाले नाहींत, तर शुद्ध[१] अन्न सेवन करीत गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें (१३)

१ शुद्ध अन्न सेवन करणें म्हणजे सदाचारानें वागणें जो असदाचारी तो कितीही सोंवळें पाळीत असला, तरी अशुद्धच अन्न खातो.

४८ दिस्वा सुवण्णस्स पभस्सरानि कम्मारपुत्तेन सुनिट्ठितानि ।
संघट्टमानानि दुवे भुजस्मिं एको चरे खग्गविसाणकप्पो ॥१४॥
४९ एव दुतियेन सहो ममऽस्स वाचाभिलापो अभिसज्जना वा ।
एत भय आयतिं पेक्खमानो एको चरे खग्गविसाणकप्पो ॥१५॥
५० कामा हि चित्रा मधुरा मनोरमा विरूपरूपेन मथेन्ति चित्त ।
आदीनव कामगुणेसु दिस्वा एको चरे खग्गविसाणकप्पो ॥१६॥
५१ ईती च गण्डो च उपद्दवो च रोगो च सल्ल च भय च मे त ।
एत भय कामगुणेसु दिस्वा एको चरे खग्गविसाणकप्पो ॥१७॥

१ नि० सघट्टयतानि २ नि०—दुतीयेन ३ म०— सह ४ म०—ईति

४८ सोनारानें उत्तम रीतीनें तयार केलेलीं सोन्याचीं प्रभासपन्न दोन कंकणें एका हातात एकमेकावर आदळत असलेलीं पाहून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें (१४)

४९ याप्रमाणें दुसऱ्यासहवर्तमान राहिल्यास, माझ्याकडून बडबड केली जाईल, किंवा मला त्याची आसक्ति जडेल, हें पुढील आयुष्य क्रमात भय पाहून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें (१५)

५० कारण पचेंद्रियाचे विषय विचित्र, मधुर आणि मनोरम आहेत, ते नानाप्रकारें मनुष्याचें चित्त मथन करतात विषयामध्यें असलेला हा दोष पाहून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें (१६)

५१ मजवर हें सकट आहे, हा गड आहे, हा उपद्रव आहे, हा रोग आहे, शल्य आहे, भय आहे—याप्रमाणें (पचेंद्रियाच्या) विषयात भय पाहून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें (१७)

५२ सीतं च उण्हं च खुदं पिपासं वातातपे डंससिरिंसपे च ।
सब्बानिऽपेतानि अभिसंभवित्वा एको चरे खग्गविसाणकप्पो ॥ १८ ॥
५३ नागो'व यूथानि विवज्जयित्वा सञ्जातखन्धो पदुमी उळारो ।
यथाभिरन्तं विहरे अरञ्ञे एको चरे खग्गविसाणकप्पो ॥ १९ ॥
५४ अट्ठान तं सङ्गणिकारतस्स यं फस्सये सामयिकं विमुत्तिं ।
आदिच्चबन्धुस्स वचो निसम्म एको चरे खग्गविसाणकप्पो ॥ २० ॥
५५ दिट्ठीविसूकानि उपातिवत्तो पत्तो नियामं पटिलद्धमग्गो ।
उप्पन्नञाणोऽम्हि अनञ्ञनेय्यो एको चरे खग्गविसाणकप्पो ॥ २१ ॥

१ म०—खुद्दं. २ म०—विहरं. ३ म०—अट्ठानं. ४ म०— यं पस्सये, नि०—फु°. ५ म०—समायिकं, सामायिक. ६ म०—°विसुकानि. ७ म०—°णऽम्हि.

५२ शीत, उष्ण, तहान, भूक, ऊन, वारा, डास, साप—हे सर्व (क्लेश) सहन करून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (१८)

५३. जसा पद्मकुलात जन्मलेल्या भव्य खांद्याचा मोठा हत्ती यूथ सोडून अरण्यात यथेच्छ संचार करतो, त्याप्रमाणें गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (१९)

५४. मंडळीत सुख मानणाऱ्याला (समाधिलाभानें प्राप्त होणारी) क्षणिक विमुक्ति मिळेल हें अशक्य आहे. (म्हणून) आदित्यबन्धूचें (बुद्धाचें) वचन ऐकून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (२०)

५५ मी विषम संप्रदायाच्या पार गेलों आहें, मी न्याय्य पथावर आलों आहें, (खरा) मार्ग मला मिळाला आहे, मला ज्ञान उत्पन्न झालें आहे, इतरांनीं समजावण्याची आता जरूरी राहिली नाहीं, असें जाणून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (२१)

५६ निल्लोलुपो निक्कुहो निप्पिपासो निम्मक्खो निद्धन्तकसावमोहो।
निरासयो सब्बलोके भवित्वा एको चरे खग्गविसाणकप्पो ॥२२॥
५७ पापं सहायं परिवज्जयेथ अनत्थदस्सिं विसमे निविट्ठं।
सयं न सेवे पसुतं पमत्तं एको चरे खग्गविसाणकप्पो ॥२३॥
५८ बहुस्सुतं धम्मधरं भजेथ मित्तं उळारं पटिभानवन्तं।
अञ्ञाय अत्थानि विनेय्य कखं एको चरे खग्गविसाणकप्पो ॥२४॥
५९ खिड्डं रतिं कामसुखं च लोके अनलङ्करित्वा अनपेक्खमानो।
विभूसनट्ठाना विरतो सच्चवादी एको चरे खग्गविसाणकप्पो ॥२५॥

१ नि०–निराममो. २ म०– खिड्डारतिं. ३ नि० (सी०)– विभूसट्ठाना.

५६. निर्लोलुप, अदांभिक, निस्तृष्ण, गुणाघ्न, कषाय (क्लेश)–मोहापासून मुक्त व सर्व लोकीं निर्लोभ होऊन गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (२२)

५७. असदर्थाचा उपदेश करणारा व विषम मार्गांत निविष्ट अशा पापी साथ्याचा त्याग करावा; आपण होऊन अशा आसक्त आणि प्रमत्त माणसाची संगति धरू नये, (व) गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें (२३.)

५८. बहुश्रुत, धर्मधर, उदार व प्रतिभासंपन्न अशा मित्राची संगत धरावी. व (त्याजकडून) सदर्थ समजून घेऊन व शंकेचें निरसन करून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (२४)

५९. क्रीडा, मजा, चैन–एवढ्यानें इहलोकीं समाधान न मानता व याची अपेक्षा न धरता शृंगारभूषणापासून निवृत्त व सत्यवादी होऊन गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (२५)

६० पुत्तं च दारं पितरं च मातरं धनानि धञ्ञानि च बन्धवानि ।
हित्वान कामानि यथोधिकानि एको चरे खग्गविसाणकप्पो ॥२६॥

६१ सङ्गो एसो परित्तमेत्थ सोख्यं अप्पस्सादो दुक्खमेत्थ भिय्यो ।
गण्डो एसो इति ञत्वा मुतीमा एको चरे खग्गविसाणकप्पो ॥२७॥

६२ सन्दालयित्वा संयोजनानि जालं'व भेत्वा सलिलम्बुचारी ।
अग्गीव दड्ढं अनिवत्तमानो एको चरे खग्गविसाणकप्पो ॥२८॥

६३ ओक्खित्तचक्खु न च पादलोलो गुत्तिन्द्रियो रक्खितमानसानो ।
अनवस्सुतो अपरिडय्हमानो एको चरे खग्गविसाणकप्पो ॥२९॥

१ रो०-बधवानि च. २ म०-यतोधिकानि. ३ सी०-गलो, म०-गण्ठो, गण्टो. ४ नि०-मुतिमा. ५ म०-पदालयित्वा, Fsb, नि०-सन्दालयित्वा. ६ सी०-जाल भेत्वा, म०-जाल भित्वा, जालं'व भित्वा. ७ रो०-°चक्खु.

६०. पुत्रदारा, आईबाप, धनधान्य, बान्धव आणि आपल्या आवाक्यातील उपभोग्य वस्तू सोडून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें (२६)

६१ हा सङ्ग (आसक्ति) आहे, यात सौख्य थोडें, आस्वाद थोडा, आणि यात दुःख जास्ती आणि हा गळ आहे, असें जाणून सुज्ञानें गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (२७)

६२ पाण्यात फिरणारा (मासा) जसा जाळें तोडून पार जातो, त्याप्रमाणें संयोजनें तोडून, आणि अग्नि जसा जळलेल्या ठिकाणी परत येत नाहीं, तद्वत् माघारें न येता, गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (२८)

६३ दृष्टि खालीं, पादचाचल्य (इकडे तिकडे फिरण्याची हाव) नाहीं, इंद्रिय स्वाधीन, मन सुरक्षित, विषयाबद्दल अनासक्त आणि मन सन्ताप नाहीं—असा (होऊन) गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (२९)

६४ ओहारयित्वा गिहिव्यञ्जनानि सञ्छिन्नपत्तो यथा पारिछत्तो ।
कासायवत्थो अभिनिक्खमित्वा एको चरे खग्गविसाणकप्पो ॥३०॥
६५ रसेसु गेधं अकरं अलोलो अनञ्ञपोसी सपदानचारी ।
कुले कुले अप्पटिबद्धचित्तो एको चरे खग्गविसाणकप्पो ॥३१॥
६६ पहाय पञ्चावरणानि चेतसो उपक्किलेसे ब्यपनुज्ज सब्बे ।
अनिस्सितो छेत्वा सिनेहदोसं एको चरे खग्गविसाणकप्पो ॥३२॥
६७ विपिट्ठिकत्वान सुखं दुखं च पुब्बेव च सोमनदोमनस्सं ।
लद्धानुपेक्खं समथं विसुद्धं एको चरे खग्गविसाणकप्पो ॥३३॥

१ सी०–संछन्न॰. २ नि०–न्य॰ ३ अ०, म०–स्नेह॰. ४ म०– दुक्खं.
५ म०, अ०–सोमनस्सदोमनस्सं.

६४. पानें गळून गेलेल्या पारिच्छत्र ( पारिजात ) वृक्षाप्रमाणें गृहस्थाश्रमाचीं चिन्हें टाकून काषाय वस्त्रें परिधान करून व पूर्णपणें गृहत्याग करून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें ( ३० )

६५. जिभेची चट नाहीं, अचंचल, दुसऱ्यांना न पोसणारा, लहानमोठ्या घरीं क्रमशः [१] ( एकादें घर न चुकवतां ) भिक्षा ग्रहण करणारा, कोणत्याही कुटुंबाविषयीं आसक्ति न ठेवणारा–असा ( होऊन ) गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. ( ३१ )

६६ चित्ताचीं पांच आवरणें सोडून, चित्तक्लेश दूर सारून, अनासक्त होऊन व स्नेहदोष तोडून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. ( ३२ )

६७. आधीं सौमनस्य आणि दौर्मनस्य व नंतर सुख व दुःख मागें टाकून, उपेक्षायुक्त शुद्ध शम ( समाधि ) संपादून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. ( ३३ )

१. आपणास कदाचित् चांगली भिक्षा मिळणार नाहीं म्हणून आपल्या मार्गांतील गरिबाचीं घरें कांहीं लोक टाळतात, तसें न करणारा

६८ आरद्धविरियो परमत्थपत्तिया अलीनचित्तो अकुसीतवुत्ति ।
दळ्हनिक्कमो थामबलूपपन्नो एको चरे खग्गविसाणकप्पो ॥३४॥
६९ पटिसल्लानं झानमरिञ्चमानो धम्मेसु निच्चं अनुधम्मचारी ।
आदीनवं सम्मसिता भवेसु एको चरे खग्गविसाणकप्पो ॥३५॥
७० तण्हक्खयं पत्थयं अप्पमत्तो अनेळमूगो सुतवा सतीमा ।
सङ्खातधम्मो नियतो पधानवा एको चरे खग्गविसाणकप्पो ॥३६॥
७१ सीहो'व सद्देसु असन्तसन्तो वातो'व जालम्हि असज्जमानो ।
पदुम'व तोयेन अलिप्पमानो एको चरे खग्गविसाणकप्पो ॥३७॥

१ सी०, म०– अलिप'

६८. परमार्थप्राप्तीसाठीं पूर्ण उत्साही, समाधानचित्त, निरलस-वृत्ति, दृढनिश्चयी व स्थिर (ज्ञान)-बलसपन्न होऊन गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (३४)

६९. एकान्तवास आणि समाधि न सोडता, नित्य सद्धर्मानुसार वागणारा व पुनर्जन्मात दोष पाहणारा होऊन गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (३५)

७०. तृष्णाक्षयाची उत्कट इच्छा बाळगणारा, अप्रमादी, हुशार, विद्वान्, स्मृतिमान्, धर्मज्ञानी, आर्यमार्ग जाणून त्याची प्राप्ति करून घेतलेला व उत्साही होऊन गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. (३६)

७१. सिंहाप्रमाणें शब्दाना न घाबरता, वाऱ्याप्रमाणें जाळ्यात न अडकता, व कमलांप्रमाणें पाण्यात न लिंपता गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें (३७)

१. वेडगळ नसलेला.

७२ सीहो यथा दाठबली पसय्ह राजा मिगान अभिभुय्यचारी ।
सेवेथ पन्तानि सेनासनानि एको चरे खग्गविसाणकप्पो ॥३८॥
७३ मेत्तं उपेक्खं करुणं विमुत्तिं आसेवमानो मुदितं च काले ।
सब्बेन लोकेन अविरुज्झमानो एको चरे खग्गविसाणकप्पो ॥३९॥
७४ रागं च दोसं पहाय मोहं संदालयित्वा संयोजनानि ।
असन्तसं जीवितसंखयम्हि एको चरे खग्गविसाणकप्पो ॥४०॥
७५ भजन्ति सेवन्ति च कारणत्था निक्कारणा दुल्लभा अज्ज मित्ता ।
अत्तऽट्ठपञ्ञा असुची मनुस्सा एको चरे खग्गविसाणकप्पो ति॥४१॥

खग्गविसाणसुत्तं निट्ठितं ।

१ म०—पदालयित्वान, Fsb —सदालयित्वान २ म०—°त्ता. ३ म०—अत्तत्थ° ४ नि०— असुचि मनुस्सा

७२ मृगाचा राजा दंष्ट्राबलि सिंह जसा ( सर्वांचा ) निग्रह करून, पराभव करून राहातो, त्याप्रमाणें अरण्याच्या सीमाप्रान्तातील निवासस्थानीं राहून गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें ( ३७ )

७३ मैत्री, करुणा, मुदिता व उपेक्षा या चित्तविमुक्तींची यथाकाल भावना करून व प्राणिमात्राविषयीं अविरोधी होऊन गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें. ( ३९ )

७४. राग, द्वेष आणि मोह सोडून, संयोजनें तोडून, व जीवित नाशाचा प्रसंग आला असताहि न डगमगता गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें ( ४० )

७५ लोक फायद्यासाठीं संगति धरतात, मैत्री करतात, अकारण मित्र सापडणें आजकाल कठीण, अपवित्र माणसें आपल्याच हिताची बुद्धि धरतात, (हें जाणून) गेंड्याच्या शिंगाप्रमाणें एकाकी राहावें (४१)

खग्गविसाणसुत्त समाप्त

## ४

## [ ४. कसिभारद्वाजसुत्तं ]

एवं मे सुतं। एकं समयं भगवा मगधेसु विहरति दक्खिणागिरिस्मिं एकनालाय ब्राह्मणगामे। तेन खो पन समयेन कसिभारद्वाजस्स ब्राह्मणस्स पञ्चमत्तानि नङ्गलसतानि पयुत्तानि होन्ति वप्पकाले। अथ खो भगवा पुब्बण्हसमयं निवासेत्वा पत्तचीवरमादाय येन कसिभारद्वाजस्स ब्राह्मणस्स कम्मन्तो तेनुपसङ्कमि। तेन खो पन समयेन कसिभारद्वाजस्स ब्राह्मणस्स परिवेसना वत्तति। अथ खो भगवा येन परिवेसना तेनुपसङ्कमि, उपसङ्कमित्वा एकमन्तं अट्ठासि। अद्दसा खो कसिभारद्वाजो ब्राह्मणो भगवन्तं पिण्डाय ठितं। दिस्वान भगवन्तं एतदवोच—अहं खो समण कसामि च वपामि च, कसित्वा च वपित्वा

---

## ४

## [ ४ कसिभारद्वाजसुत्त ]

असें मी ऐकलें आहे. एके समयीं भगवान् मगध देशांतील दक्षिणागिरी प्रान्तांत एकनाला नावाच्या ब्राह्मण ग्रामांत राहत होता. त्या काळीं कृषिभारद्वाज-ब्राह्मणाच्या शेतांत पेरणीच्या वेळीं पांचशें नांगर चालू होते. तेव्हां भगवान् सकाळच्या प्रहरीं वस्त्र परिधान करून पात्रचीवर घेऊन कृषिभारद्वाज-ब्राह्मणाच्या (शेतीचें) काम चालू होतें तेथें गेला. तेथें कृषिभारद्वाज ब्राह्मणाच्या (भोजनसमारंभाती पंक्तीचें) वाढप (परिवेसना) चालू होतें तिकडे जाऊन भगवान् एका बाजूस उभा राहिला. कृषिभारद्वाज-ब्राह्मणानें भिक्षेसाठीं उभा राहिलेल्या भगवंताला पाहिलें. पाहून तो भगवंताला म्हणाला, “हे श्रमणा, मी नांगरतों आणि पेरतों, नांगरून आणि पेरून

च भुञ्जामि, त्वंऽपि समण कसस्सु च वपस्सु च, कसित्वा च वपित्वा च भुञ्जस्सू ति । अहंऽपि खो ब्राह्मण कसामि च वपामि च, कसित्वा च वपित्वा च भुञ्जामी ति । न खो पन मयं पस्साम भोतो गोतमस्स युगं वा नङ्गलं वा फालं वा पाचनं वा बलिबद्दे वा, अथ च पन भवं गोतमो आह—अहं पि खो ब्राह्मण कसामि च वपामि च, कसित्वा च वपित्वा च भुञ्जामी ति । अथ खो कसिभारद्वाजो ब्राह्मणो भगवन्तं गाथाय अज्झभासि—

७६ कस्सको पटिजानासि न च पस्साम ते कसिं ।
कसिं नो पुच्छितो ब्रूहि यथा जानेमु ते कसिं ॥१॥

७७ सद्धा बीजं तपो वुट्ठि पञ्ञा मे युगनङ्गलं ।
हिरि ईसा मनो योत्तं सति मे फालपाचनं ॥२॥

---

माझा निर्वाह करतों तूहि, हे श्रमणा, नांगर व पेर नांगरून व पेरून तुझा निर्वाह कर " " हे ब्राह्मणा, मी देखील नांगरतों व पेरतों, नांगरून व पेरून माझा निर्वाह करतों " " पण भगवान् गोतमाचें जू, नांगर, फाळ, चाबूक किंवा बैल कोठें आम्हास दिसत नाहींत, तरी पण भगवान् गोतम म्हणतो कीं, हे ब्राह्मणा मी देखील नांगरतों व पेरतों, नांगरून व पेरून माझा निर्वाह करतों " तदनंतर कृषिभारद्वाज ब्राह्मण भगवंताला ( या ) गाथेनें बोलला—

७६ तू आपणाला शेतकरी म्हणवतोस, पण तुझी शेती आम्हास दिसत नाहीं तुझी शेती कोणती हें आम्ही विचारतों तें तू आम्हास समजावून सांग ( १ )

७७ (भगवान्—) श्रद्धा हें माझें बी, तपश्चर्या वृष्टि, प्रज्ञा जू आणि नांगर, पापलज्जा इसाड, चित्त दोरी, व स्मृति ( जागृति ) फाळ आणि चाबूक ( २ )

७८ कायगुत्तो वचीगुत्तो आहारे उदरे यतो।
सच्चं करोमि निद्दानं सोरच्चं मे पमोचनं ॥३॥

७९ विरियं मे धुरधोरय्हं[1] योगक्खेमाधिवाहनं।
गच्छति अनिवत्तन्तं यत्थ गन्त्वा न सोचति ॥४॥

८० एवमेसा कसी कट्ठा सा होति अमतप्फला।
एतं कसिं कसित्वान सब्बदुक्खा पमुच्चति ॥५॥

अथ खो कसिभारद्वाजो ब्राह्मणो महतिया कंसपातिया पायासं वड्ढेत्वा भगवतो उपनामेसि—भुञ्जतु भवं गोतमो पायासं, कस्सको भवं, यं हि भवं गोतमो अमतप्फलं कसिं कसती ति।

१ अ०–°धोरेय्य.

७८. कायेचें आणि वाचेचें मी रक्षण करतों, उदरनिर्वाहाच्या आहारात मर्यादित राहतों. सत्य हें माझें निंदण व संतोष ही मुक्ती. (३)

७९. धुरा वाहणारा माझा उत्साह तो योगक्षेमाभिमुख (निर्वाणाभिमुख) जातो व तेथें गेल्यावर तो परत येत नाहीं व (माझ्यासारखा शेतकरी) शोकरहित होतो. (४)

८० याप्रमाणें शेती केली असता, ती अमृतफलदायक होते, अशी शेती करून सर्व दुःखांपासून (मनुष्य) मुक्त होतो. (५).

तेव्हां कृषिभारद्वाज-ब्राह्मणानें मोठ्या कांस्याच्या ताटांत पायस वाढून तो–भवान् गोतम पायसाचा स्वीकार करो; भवान् शेतकरी आहे का कीं, भवान् गोतम अमृतफलदायक शेती करतो–असें म्हणून भगवन्तापुढें केला.

८१ गाथाऽभिगीतं मे अभोजनेय्यं। सम्पस्सतं ब्राह्मण नेस धम्मो।
गाथाभिगीतं पनुदन्ति बुद्धा। धम्मे सति ब्राह्मण वुत्तिरेसा ॥६॥

८२ अञ्ञेन च केवलिनं महेसिं। खीणासवं कुक्कुच्चवूपसन्तं।
अन्नेन पानेन उपट्ठहस्सु। खेत्तं हि तं पुञ्ञऽपेक्खस्स होती
ति ॥७॥

अथ कस्स चाहं भो गोतम इमं पायासं दम्मी ति। न ख्वाऽहं तं ब्राह्मण पस्सामि सदेवके लोके समारके सब्रह्मके सस्समणब्राह्मणिया पजाय सदेवमनुस्साय यस्स सो पायासो भुत्तो सम्मा परिणामं गच्छेय्य। अञ्ञत्र तथागतस्स वा तथागतसावकस्स वा, तेन हि त्वं ब्राह्मण तं पायासं अप्पहरिते वा छड्डेहि, अप्पाणके वा उदके ओपिलापेही[1] ति। अथ खो कसिभारद्वाजो ब्राह्मणो तं पायासं अप्पाणके उदके

८१ (भगवान् म्हणाला)—या अन्नासंबंधी मी गाथा बोललों, तेव्हा तें मला स्वीकारता येत नाहीं हे ब्राह्मणा, (तें स्वीकारणें) हा जाणत्याचा धर्म नव्हे. ज्या अन्नासंबंधीं गाथा म्हटल्या, तें बुद्ध स्वीकारीत नसतात हे ब्राह्मणा, सदाचाराला ही पद्धत योग्य आहे (६)

८२ कैवल्य प्राप्त झालेल्या क्षीणपाप व कौकृत्यें शान्त झालेल्या महर्षीची तू अन्य अन्नपानानें सेवा कर का की पुण्येच्छूला तो पुण्यक्षेत्रासारखा होय.

"भो गोतम, असें जर आहे, तर हा पायस मी दुसऱ्या कोणास देऊं?" "हे ब्राह्मणा, तथागताशिवाय किंवा तथागतश्रावकाशिवाय सदेवक, समारक, सब्रह्मक लोकांत, श्रमणब्राह्मणांत, देवमनुष्यांत असा कोणी मला दिसत नाहीं की, ज्याला हा पायस खाल्ला असता पचेल. म्हणून, हे ब्राह्मणा, तू हा पायस गवत नसलेल्या ठिकाणीं टाक किंवा

१. १२८ व्या गाथेंतील या शब्दावरील टीप पहा

ओपिलापेसी ति। अथ खो सो पायासो उदके पक्खित्तो चिच्चिटायति चिटिचिटायति सन्धूपायति सम्पधूपायति। सेय्यथाऽपि नाम फालो दिवससन्तत्तो उदके पक्खित्तो चिच्चिटायति चिटिचिटायति सन्धूपायति सम्पधूपायति, एवमेव सो पायासो उदके पक्खित्तो चिच्चिटायति चिटिचिटायति सन्धूपायति सम्पधूपायति। अथ खो, कसिभारद्वाजो ब्राह्मणो संविग्गो लोमहट्ठजातो येन भगवा तेनुपसङ्कमि, उपसङ्कमित्वा भगवन्तं पादेसु सिरसा निपतित्वा भगवन्तं एतदवोच— अभिक्कन्तं भो गोतम, अभिक्कन्तं भो गोतम। सेय्यथाऽपि भो गोतम निक्कुज्जितं वा उक्कुज्जेय्य, पटिच्छन्नं वा विवरेय्य, मूळ्हस्स वा मग्गं आचिक्खेय्य, अन्धकारे वा तेलपज्जोतं धारेय्य चक्खुमन्तो रूपानि दक्खिन्ती ति, एवमेव भोता गोतमेन अनेकपरियायेन धम्मो पकासितो।

प्राणी नसलेल्या पाण्यात टाक." तेव्हां कृषिभारद्वाज-ब्राह्मणानें तो पायस प्राणी नसलेल्या पाण्यात टाकला. तो पायस पाण्यात टाकला असता 'चिटिचिटि' शब्द करू लागला व वाफ सोडू लागला. जसा दिवसभर सन्तप्त झालेला नांगराचा फाळ पाण्यात टाकला असता 'चिटिचिटि' शब्द करतो, वाफ सोडतो, तसाच तो पायस 'चिटिचिटि' शब्द करू लागला व वाफ सोडू लागला. तेव्हां कृषिभारद्वाज-ब्राह्मणाला संवेग झाला, रोमहर्ष झाला, व भगवतापाशीं येऊन भगवन्ताच्या पायावर साष्टांग दंडवत घालून भगवन्ताला म्हणाला, "धन्य धन्य, भो गोतम, जसें पालथें पडलेलें भांडें नीट करावें, किंवा झाकलेली वस्तु विवृत करावी, वाट चुकलेल्याला वाट दाखवावी, किंवा डोळसांना पदार्थ दिसावे या उद्देशानें अंधारात मशाल पाजळावी, त्याप्रमाणें भवान् गोतमानें अनेक पर्यायांनी धर्म प्रकाशित केला आहे. हा मी भगवान् गोतमाला शरण जातों, धर्माला

एसाहं भगवन्तं गोतमं सरणं गच्छामि धम्मं च भिक्खुसंघं च। लभेय्याहं भोतो गोतमस्स सन्तिके पब्बज्जं, लभेय्यं उपसम्पदं ति। अलत्थ खो कसिभारद्वाजो ब्राह्मणो भगवतो सन्तिके पब्बज्जं, अलत्थ उपसम्पदं। अचिरूपसम्पन्नो खो पनायस्मा भारद्वाजो एको वूपकट्ठो अप्पमत्तो आतापी पहितत्तो विहरन्तो न चिरस्सेव यस्सत्थाय कुलपुत्ता सम्मदेव अगारस्मा अनगारियं पब्बजन्ति तदनुत्तरं ब्रह्मचरियपरियोसानं दिट्ठे व धम्मे सयं अभिञ्ञा सच्छिकत्वा उपसम्पज्ज विहासि। खीणा जाति, वुसितं ब्रह्मचरियं, कतं करणीयं, नापरं इत्थत्ताया ति अब्भञ्ञासि। अञ्ञतरो च खो पनायस्मा भारद्वाजो अरहतं अहोसी ति।

कसिभारद्वाजसुत्तं निट्ठितं।

---

शरण जातों, आणि भिक्षुसंघाला शरण जातों, भवान् गोतमापाशीं मला प्रव्रज्या आणि उपसंपदा मिळावी ”

त्याप्रमाणें कृषिभारद्वाज-ब्राह्मणाला भगवतापाशीं प्रव्रज्या व उपसंपदा मिळाली उपसंपदेनंतर थोड्याच काळांत आयुष्मान् भारद्वाज एकाकी, एकान्तवासी, अप्रमादी, उत्साही व प्रहितात्मा होऊन राहत असतां, ज्याच्यासाठीं कुलीन मनुष्य चांगल्या रीतीनें घरांतून निघून अनागारिक प्रव्रज्या घेतात, तें अनुत्तर ब्रह्मचर्य-पर्यवसान ( निर्वाण ) याच आयुष्यांत स्वतः जाणून, साक्षात् अनुभवून, प्राप्त करून घेऊन राहिला जन्म क्षीण झाला, ब्रह्मचर्य आचरिलें, कर्तव्य केलें, व आतां पुनर्जन्म राहिला नाहीं हें त्यानें जाणलें आणि आयुष्मान् भारद्वाज अरहन्तांपैकीं एक झाला.

कसिभारद्वाजसुत्त समाप्त

## ५

## [ ५. चुन्दसुत्तं ] १

८३ पुच्छामि मुनिं पहूतपञ्ञ (इति चुन्दो कम्मारपुत्तो) बुद्ध धम्मस्सामि वीततण्ह ।
दिपदुत्तम सारथीन पवर । कति लोके समणा तदिंघ ब्रूहि ॥१॥

८४ चतुरो समणा न पञ्चमत्थि (चुन्दा ति भगवा) ते ते आविकरोमि सक्खिपुट्ठो ।
मग्गजिनो मग्गदेसको च मग्गे जीवति यो च मग्गदूसी ॥२॥

८५ क मग्गजिन वदन्ति बुद्धा (इति चुन्दो कम्मारपुत्तो) मग्गऽक्खायी कथ अतुल्यो होति ।
मग्गे जीवति मे ब्रूहि पुट्ठो । अथ मे आविकरोहि मग्गदूसिं ॥३॥

१ म०–द्विपदुत्तम. २ रो०–पञ्चमोऽत्थि ३ रो०–मग्गज्झायी.

## ५

## [ ५ चुन्दसुत्त ]

८३. विपुलप्रज्ञ, धर्मस्वामी, वीततृष्ण, द्विपदश्रेष्ठ, सारथ्यांत सर्वोत्तम अशा मुनीला, बुद्धाला मी विचारतों—असें चुन्द लोहार म्हणाला—इहलोकीं श्रमण किती तें सांग. ( १ )

८४ चारच श्रमण, पांचवा नाहीं—हे चुन्दा असें भगवान् म्हणाला—तू विचारलें म्हणून तें तुला मी सांगतों. मार्गजिन, मार्ग-दर्शक, मार्गजीवी आणि मार्गदूषक ( हे ते चार ). (२)

८५ बुद्ध कोणाला मार्गजिन म्हणतात—असें चुन्द लोहार म्हणाला—अतुल असा मार्गदर्शक कसा होतो ? मार्गजीवी कोणता आणि मार्गदूषक कोणता ?—हें मी विचारतों तें तु मला सांग. (३)

८६ यो तिण्णकथंकथो विसल्लो निब्बाणाभिरतो अनानुगिद्धो।
लोकस्स सदेवकस्स नेता तादिं मग्गजिनं वदन्ति बुद्धा ॥४॥

८७ परमं परमं ति यो ध ञत्वा अक्खाति विभजेति इधेव धम्मं।
तं कंखच्छिदं मुनिं अनेजं दुतियं भिक्खुनमाहु मग्गदेसिं ॥५॥

८८ यो धम्मपदे सुदेसिते मग्गे जीवति संयतो सतीमा।
अनवज्जपदानि सेवमानो, ततियं भिक्खुनमाहु मग्गजीविं ॥६॥

८९ छदनं कत्वान सुब्बतानं पक्खन्दि कुलदूसको पगब्भो।
मायावी असञ्ञतो पलापो पतिरूपेन चरं स मग्गदूसी ॥७॥

१ सी०—अननुगिद्धो. २ रो०, सी०—सञ्ञतो.

८६. जो शंकेच्या पार गेलेला, तृष्णाशल्यरहित, निर्वाणाभिरत, निर्लोभी आणि सदेवक जगाचा नेता अशा माणसाला बुद्ध मार्गजिन म्हणतात. ( ४ )

८७. परम ( जें निर्वाण तें ) परमत्वानें इहलोकीं जाणून जो धर्मोपदेश करतो, धर्माचें विवेचन करतो, त्या शंका दूर करणाऱ्या तृष्णाविरहित मुनीला दुसरा (म्हणजे) मार्गदर्शक-भिक्षु म्हणतात.(५)

८८. उत्तम प्रकारें उपदिष्ट धर्ममार्गात जो संयमी, स्मृतिमान्, अनवद्य पदार्थांचें सेवन करणारा होऊन वागतो, त्याला तिसरा ( म्हणजे ) मार्गजीवी भिक्षु म्हणतात.

८९. 'साधूंचा वेष घेऊन जो (संघात) घुसणारा, कुटुंबाची अपकीर्ति फैलावणारा, धृष्ट, मायावी, असंयत, फोल—असा असतां बाह्याकारीं साधूसारखा वागणारा, तो मार्गदूषक होय. ( ७ )

॰ एते च पटिविज्झि यो गहट्ठो सुतवा अरियसावको सपञ्ञो ।
सब्बे नेतादिसा ति ञत्वा इति दिस्वा न हापेति तस्स सद्धा ।
कथं हि दुट्ठेन असंपदुट्ठं सुद्धं असुद्धेन समं करेय्या ति ॥८॥

चुन्दसुत्तं निट्ठितं ।

६

[ ६. पराभवसुत्तं ]

एवं मे सुतं । एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे । अथ खो अञ्ञतरा देवता अभिक्कन्ताय रत्तिया अभिक्कन्तवण्णा केवलकप्पं जेतवनं ओभासेत्वा येन भगवा तेनुपसंकमि ।

---

९०. ज्या विद्वान् सप्रज्ञ आर्यश्रावक गृहस्थानें हे (श्रमण) जाणले आहेत, तो 'सगळेच त्यासारखे नाहींत' असें जाणून व हें पाहून आपली श्रद्धा कमी करीत नाहीं. कारण दुष्ट आणि अदुष्ट, शुद्ध आणि अशुद्ध हे सारखेच, असें तो कसें समजेल ॥ (८)

चुन्दसुत्त समाप्त

६

[ ६. पराभवसुत्त ]

असें मीं ऐकलें आहे. एके समयीं भगवान् श्रावस्ती येथें जेतवनात अनाथपिंडिकाच्या आरामांत राहत होता. तेव्हा रात्र सपत आली असता एक अत्यंत सुन्दर देवता सर्व जेतवन प्रकाशित करून

उपसंकमित्वा भगवन्तं अभिवादेत्वा एकमन्तं अट्ठासि । एकमन्तं ठिता खो सा देवता भगवन्तं गाथाय अज्झभासि—

९१ पराभवन्तं पुरिसं मयं पुच्छाम गोतमं ।
भगवन्तं पुट्ठुमागम्म किं पराभवतो मुखं ॥१॥

९२ सुविजानो भवं होति सुविजानो पराभवो ।
धम्मकामो भवं होति धम्मदेस्सी पराभवो ॥२॥

९३ इति हेतं विजानाम पठमो सो पराभवो ।
दुतियं भगवा ब्रूहि किं पराभवतो मुखं ॥३॥

९४ असन्तस्स पिया होन्ति सन्ते न कुरुते पियं ।
असतं धम्मं रोचेति तं पराभवतो मुखं ॥ ४ ॥

---

भगवान् होता तेथें आली. तेथें येऊन भगवन्ताला नमस्कार करून एका बाजूस उभी राहिली. एका बाजूला उभी राहून ती देवता भगवन्ताशीं गाथेनें बोलली—

९१. आम्ही भगवन्ताला विचारण्यास येऊन पराभव पावणारा पुरुष कोणता हें विचारतों. पराभवाचें कारण कोणतें? ( १ )

९२. ( भगवान्— ) वृद्धिंगत होणारा पुरुष सहज जाणता येतो. पराभव पावणाराही सहज जाणता येतो. वृद्धिंगत होणारा धर्मपरायण असतो; पराभव पावणारा धर्माचा द्वेष करतो. ( २ )

९३. ( देवता— ) हा पहिला पराभव आम्हांस समजला. भगवन्, दुसरें पराभवाचें कारण कोणतें तें सांग. ( ३ )

९४. त्या ( पुरुषाला ) खल आवडतात, सज्जनाविषयीं प्रेम नसतें, व खलाचा धर्म आवडतो, हें ( त्याच्या ) पराभवाचें कारण होय. ( ४ )

९५ इति हेत विजानाम दुतियो सो पराभवो ।
तति‍य भगवा ब्रूहि किं पराभवतो मुख ॥ ५ ॥

९६ निद्दासीली सभासीली अनुट्ठाता च यो नरो ।
अलसो कोधपञ्ञाणो त पराभवतो मुख ॥ ६ ॥

९७ इति हेत विजानाम ततियो सो पराभवो ।
चतुत्थ भगवा ब्रूहि किं पराभवतो मुख ॥ ७ ॥

९८ यो मातर वा पितर वा जिण्णक गतयोब्बन ।
पहु सन्तो न भरति त पराभवतो मुख ॥ ८ ॥

९९ इति हेत विजानाम चतुत्थो सो पराभवो ।
पञ्चम भगवा ब्रूहि किं पराभवतो मुख ॥ ९ ॥

१. रो०—पहू.

९५ हा दुसरा पराभव आम्हास समजला. भगवन् पराभवाचें तिसरें कारण कोणतें तें साग. ( ५ )

९६ निद्रावश, सभाप्रिय, प्रयत्न न करणारा, आळशी आणि क्रोधाविष्ट असा जो मनुष्य, तें ( त्याच्या ) पराभवाचें कारण होय. ( ६ )

९७. हा तिसरा पराभव आम्हास समजला भगवन्, चवथें पराभवाचें कारण कोणतें तें साग. ( ७ )

९८ जो समर्थ असून वयातीत वृद्ध आईचा किंवा बापाचा समाळ करीत नाहीं, तें ( त्याच्या ) पराभवाचें कारण होय ( ८ )

९९ हा चवथा पराभव आम्हास समजला भगवन्, पाचवें पराभवाचें कारण कोणतें तें साग ( ९ )

१०० यो ब्राह्मण वा समण वा अञ्ञ वा पि वनिब्बकं ।
मुसावादेन वञ्चेति त पराभवतो मुख ॥ १० ॥

१०१ इति हेत विजानाम पञ्चमो सो पराभवो ।
छट्ठम भगवा ब्रूहि किं पराभवतो मुख ॥ ११ ॥

१०२ पहूतवित्तो पुरिसो सहिरञ्ञो सभोजनो ।
एको भुञ्जति सादूनि त पराभवतो मुख ॥ १२ ॥

१०३ इति हेत विजानाम छट्ठमो सो पराभवो ।
सत्तम भगवा ब्रूहि किं पराभवतो मुख ॥ १३ ॥

१०४ जातित्थद्धो धनत्थद्धो गोत्तत्थद्धो च यो नरो ।
स ञातिं अतिमञ्ञेति त पराभवतो मुख ॥ १४ ॥

१००. जो ब्राह्मणाला, श्रमणाला किंवा दुसऱ्या एखाद्या गरीब माणसाला खोटें बोलून ठकवितो, तें (त्याच्या) पराभवाचें कारण होय (१०)

१०१ हा पाचवा पराभव आम्हास समजला भगवन्, सहावें पराभवाचें कारण कोणतें तें सांग (११)

१०२ पुष्कळ संपत्ति, धन आणि अन्न असलेला मनुष्य गोड गोड अन्न एकटाच खातो तें (त्याच्या) पराभवाचें कारण होय. (१२)

१०३ हा सहावा पराभव आम्हास समजला भगवन्, सातवें पराभवाचें कारण कोणतें तें सांग (१३)

१०४. कुळाच्या, धनाच्या आणि गोत्राच्या गर्वानें फुगून जाऊन जो पुरुष आपल्या आप्ताची अवहेलना करतो, तें (त्याच्या) पराभवाचें कारण होय (१४)

१०५ इति हेत विजानाम सत्तमो सो पराभवो ।
अट्ठमं भगवा ब्रूहि किं पराभवतो मुखं ॥ १५ ॥

१०६ इत्थिधुत्तो सुराधुत्तो अक्खधुत्तो च यो नरो ।
लद्धं लद्धं विनासेति तं पराभवतो मुखं ॥ १६ ॥

१०७ इति हेतं विजानाम अट्ठमो सो पराभवो ।
नवमं भगवा ब्रूहि किं पराभवतो मुखं ॥ १७ ॥

१०८ सेहि दारेहिऽसन्तुट्ठो वेसियासु पदिस्सति ।
दिस्सति परदारेसु तं पराभवतो मुखं ॥ १८ ॥

१०९ इति हेतं विजानाम नवमो सो पराभवो ।
दसमं भगवा ब्रूहि किं पराभवतो मुखं ॥ १९ ॥

१. म०–दारेसु°, सी०–°सतुट्ठो

१०५. हा सातवा पराभव आम्हास समजला. भगवन्, आठवें पराभवाचें कारण कोणतें तें सांग (१५)

१०६. स्त्रीव्यसनी, दारुबाज व जुगारी होऊन जो मनुष्य जें जें मिळेल तें तें घालवितो, तें (त्याच्या) पराभवाचें कारण होय (१६)

१०७. हा आठवा पराभव आम्हास समजला. भगवन्, नववें पराभवाचें कारण कोणतें तें सांग (१७)

१०८. स्वस्त्रीच्या संगतींत संतोष न मानता जो वेश्यागमन आणि परदारागमन करतो तें (त्याच्या) पराभवाचें कारण होय. (१८)

१०९. हा नववा पराभव आम्हास समजला. भगवन्, दहावें पराभवाचें कारण कोणतें तें सांग (१९)

११० अतीतयोब्बनो पोसो आनेति तिम्बरुत्थनिं ।
तस्सा इस्सा न सुपति तं पराभवतो मुखं ॥ २० ॥

१११ इति हेतं विजानाम दसमो सो पराभवो ।
एकादसमं भगवा ब्रूहि किं पराभवतो मुखं ॥ २१ ॥

११२ इत्थिं सोण्डिं विकिरणिं पुरिसं वाऽपि तादिसं ।
इस्सरियस्मिं ठापेति तं पराभवतो मुखं ॥ २२ ॥

११३ इति हेतं विजानाम एकादसमो सो पराभवो ।
द्वादसमं भगवा ब्रूहि किं पराभवतो मुखं ॥ २३ ॥

११४ अप्पभोगो महातण्हो खत्तिये जायते कुले ।
सो च रज्जं पत्थयति तं पराभवतो मुखं ॥ २४ ॥

---

११०. वयातीत पुरुष तिंबरु वृक्षाच्या फळाप्रमाणें ( लहान ) स्तन असलेल्या ( तरुण ) स्त्रीशीं लग्न करतो, व तिच्या ईर्ष्येनें झोंपत नाहीं, तें ( त्याच्या ) पराभवाचें कारण होय ( २० )

१११ हा दहावा पराभव आम्हास समजला भगवन्, अकरावें पराभवाचें कारण कोणतें तें सांग ( २१ )

११२ व्यसनी आणि उधळ्या स्त्रीला किंवा तशाच पुरुषाला जो अधिकारावर नेमतो, तें ( त्याच्या ) पराभवाचें कारण होय ( २२ )

११३ हा अकरावा पराभव आम्हास समजला भगवन् बारावें पराभवाचें कारण कोणतें तें सांग ( २३ )

११४ क्षत्रिय कुलांत जन्मलेला, गरीब पण हाव मोठी असलेला मनुष्य इहलोकीं राज्य मिळविण्याची इच्छा धरतो, तें ( त्याच्या ) पराभवाचें कारण होय ( २४ )

११५ एते पराभवे लोके पण्डितो समवेक्खिय ।
अरियो दस्सनसपन्नो स लोकं भजते सिवं'ति ॥ २५ ॥

पराभवसुत्तं निट्ठितं ।

---

७

[ ७. वसलसुत्तं ]

एवं मे सुतं । एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथ-पिण्डिकस्स आरामे । अथ खो भगवा पुब्बण्हसमयं निवासेत्वा पत्तचीवर-मादाय सावत्थियं पिण्डाय पाविसि । तेन खो पन समयेन अग्गिक-भारद्वाजस्स ब्राह्मणस्स निवेसने अग्गि पज्जलितो होति, आहुति पग्गहिता । अथ खो भगवा सावत्थियं सपदानं पिण्डाय चरमाने

---

११५ शहाणा, तत्त्वज्ञानसंपन्न आर्य हे पराभव बरोबर जाणून कल्याणप्रद लोकीं जातो (२५)

पराभवसुत्त समाप्त

---

७

[ ७. वसलसुत्त ]

असें मीं ऐकलें आहे एके समयीं भगवान् श्रावस्ती येथें जेत-वनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत राहात होता. तेव्हां भगवान् सकाळच्या प्रहरीं वस्त्र परिधान करून व पात्र-चीवर घेऊन श्रावस्तींत भिक्षाटनाला गेला. त्या समयीं अग्निक भारद्वाज ब्राह्मणाच्या घरीं अग्नि प्रज्वलित केलेला होता, व आहुति देण्यांत येत होती तेव्हां

येन अग्गिकभारद्वाजस्स ब्राह्मणस्स निवेसन तेनुपसङ्कमि । अद्दसा खो अग्गिकभारद्वाजो ब्राह्मणो भगवन्त दूरतो'व आगच्छन्त । दिस्वान भगवन्तं एतदवोच--तत्रेव मुण्डक, तत्रेव समणक, तत्रेव वसलक तिट्ठाही ति । एव वुत्ते भगवा अग्गिकभारद्वाज ब्राह्मण एतदवोच--जानासि पन त्वं ब्राह्मण वसल वा वसलकरणे वा धम्मे ति । न ख्वाहं भो गोतम जानामि वसल वा वसलकरणे वा धम्मे, साधु मे भव गोतमो तथा धम्म देसेतु, यथाऽहं जानेय्य वसल वा वसलकरणे वा धम्मे'ति । तेन हि ब्राह्मण सुणाहि, साधुक मनसि करोहि, भासिस्सामी ति । एव भो'ति खो अग्गिकभारद्वाजो ब्राह्मणो भगवतो पच्चस्सोसि । भगवा एतदवोच--

---

भगवान् श्रावस्तीमध्यें घरोघरीं क्रमश भिक्षेसाठीं फिरत असता आग्निक-भारद्वाज-ब्राह्मणानें भगवन्ताला दूरूनच येताना पाहिलें; व पाहून भगवन्ताला म्हणाला, " हे मुण्डका, हे श्रमणका, हे वृषलका, तेथेंच उभा राहा." असें बोलल्यावर भगवान् आग्निक-भारद्वाज-ब्राह्मणाला म्हणाला, " हे ब्राह्मणा, तू वृषल कोण व वृषलाचे गुण कोणते हें जाणतोस काय?" "गोतमा, वृषल किंवा वृषलाचे गुण कोणते हें मी जाणत नाहीं. भगवान् गोतमानें मला असा धर्मोपदेश करावा कीं जेणेंकरून वृषल कोण व वृषलाचे गुण कोणते हें मी जाणू शकेन." "असें आहे तर, हे ब्राह्मणा, ऐक व नीट लक्षात घे. हें मी तुला सांगतों." "ठीक आहे" असें आग्निक-भारद्वाज-ब्राम्हणानें भगवन्ताला उत्तर दिलें. आणि भगवान् म्हणाला--

११६ कोधनो उपनाही च पापमक्खी च यो नरो ।
मिच्छादिट्ठी मायावी तं जञ्जा वसलो इति ॥ १ ॥
११७ एकजं वा द्विजं वाऽपि यो ध पाणं विहिंसति ।
यस्स पाणे दया नत्थि तं जञ्जा वसलो इति ॥ २ ॥
११८ यो हन्ति परिरुन्धति गामानि निगमानि च ।
निग्गाहको समञ्ञातो तं जञ्जा वसलो इति ॥ ३ ॥
११९ गामे वा यदि वाऽरञ्ञे यं परेसं ममायितं ।
थेय्या अदिन्नं आदियति तं जञ्जा वसलो इति ॥ ४ ॥
१२० यो हवे इणमादाय चुज्जमानो पलायति ।
न हि ते इणमत्थी ति तं जञ्जा वसलो इति ॥ ५ ॥
१२१ यो किञ्चिक्खकम्यता पन्थस्मिं वजतं जनं ।
हन्त्वा किञ्चिक्खमादेति तं जञ्जा वसलो इति ॥ ६ ॥

---

११६ रागीट, मूट उगविण्याचा बुद्धि धरणारा, पापी, गुणीजनास दोष लावणारा, मिथ्या दृष्टि आणि मायावी अशा माणसाला वृषल समजावें (१)

११७ जरायुज किंवा अंडज प्राण्याचा जो वध करतो त्याला प्राण्याची दया नाहीं, त्याला वृषल समजावें (२)

११८ जो गांवें आणि शहरें यांना वेढा घालून लुटतो, उध्वस्त करतो, ज्याला जुलमी म्हणून ओळखतात, त्याला वृषल समजावें (३)

११९ गांवांत किंवा अरण्यांत जो इतरांच्या मालकीची वस्तु, न दिली असतां घेतो त्याला वृषल समजावें (४)

१२० जो ऋण घेऊन, तें परत मागितलें असतां, 'तुझें मी देणें नाहीं' असें म्हणून पळ काढतो, त्याला वृषल समजावें (५)

१२१ जो कोणत्याही पदार्थाच्या इच्छेनें वाटमारेपणा करून लोकांस लुटतो, त्याला वृषल समजावें (६)

१२२ यो अत्तहेतु परहेतु धनहेतु च यो नरो ।
सक्खिपुट्ठो मुसा ब्रूति [redacted] जञ्ञा वसलो इति ॥ ७ ॥
१२३ यो ञातीनं सखानं वा दारेसु पटिदिस्सति ।
सहसा सम्पियेन वा तं जञ्ञा वसलो इति ॥ ८ ॥
१२४ यो मातरं वा पितरं वा जिण्णकं गतयोब्बनं ।
पहु सन्तो न भरति तं जञ्ञा वसलो इति ॥ ९ ॥
१२५ यो मातरं वा पितरं वा भातरं भगिनिं ससुं ।
हन्ति रोसेति वाचाय तं जञ्ञा वसलो इति ॥ १० ॥
१२६ यो अत्थं पुच्छितो सन्तो अनत्थमनुसासति ।
पटिच्छन्नेन मन्तेति तं जञ्ञा वसलो इति ॥ ११ ॥
१२७ यो कत्वा पापकं कम्मं मा मं जञ्ञा ति इच्छति ।
यो पटिच्छन्नकम्मन्तो तं जञ्ञा वसलो इति ॥ १२ ॥

---

१२२. जो मनुष्य आपणासाठीं, दुसऱ्यासाठीं किंवा पैशासाठीं प्रत्यक्ष विचारलें असताना खोटी साक्ष देतो, त्याला वृषल समजावें. (७)

१२३ जो जबरदस्तीनें किंवा प्रेमानें आपल्या आप्त-इष्टांच्या स्त्रियांशीं वाममार्गाचें आचरण करताना दिसतो, त्याला वृषल समजावें (८)

१२४ जो समर्थ असून आपल्या वयातीत वृद्ध आईचें किंवा बापाचें पालन-पोषण करीत नाहीं, त्याला वृषल समजावें (९)

१२५. आई-बाप, भाऊ-बहीण किंवा सासू यास जो मारतो किंवा वाणीनें चिडवितो त्याला वृषल समजावें. (१०)

१२६. फायद्याचा उपाय विचारला असता जो हानिकारक उपाय सांगतो, किंवा सन्दिग्ध बोलतो, त्याला वृषल समजावें. (११)

१२७. जो पापकर्म करून तें लोकांनीं जाणू नये अशी इच्छा करतो, ज्याचीं कृत्यें गुप्त रीतीनें चालतात, त्याला वृषल समजावें. (१२)

१२८ यो वे परकुल गन्त्वा भुत्वान सुचिभोजन ।
आगत न पटिपूजेति त जञ्ञा वसलो इति ॥ १३ ॥

१२९ यो ब्राह्मण वा समण वा अञ्ञ वाऽपि वनिब्बकं ।
मुसावादेन वञ्चेति त जञ्ञा वसलो इति ॥ १४ ॥

१३० यो ब्राह्मण वा समण वा भत्तकाले उपट्ठिते ।
रोसेति वाचा न च देति त जञ्ञा वसलो इति ॥ १५ ॥

१३१ असत[1] यो'ध पब्रूति मोहेन पलिगुण्ठितो[2] ।
किञ्चिक्ख निजिगिंसानो त जञ्ञा वसलो इति ॥ १६ ॥

१३२ यो चऽत्तान समुक्कंसे पर चमवजानति ।
निहीनो सेन मानेन त जञ्ञा वसलो इति ॥ १७ ॥

१ अ०—असन्त. २ म०—पलिकुण्ठितो.

१२८ जो परक्याच्या घरीं जाऊन चमचमीत भोजनाचा पाहुणचार घेतो, पण आपल्या घरीं आल्यावर त्या गृहस्थाचा आदरसत्कार करीत नाहीं, त्याला वृषल समजावें (१३)

१२९. जो ब्राह्मणाला, श्रमणाला किंवा दुसऱ्या एकाद्या गरीब माणसाला खोटें बोलून ठकवितो, त्याला वृषल समजावें (१४)

१३०. दुपारीं जेवणाच्या वेळीं दारीं आलेल्या श्रमणाला किंवा ब्राह्मणाला जो रागें भरतो, व काहीं देत नाहीं त्याला वृषल समजावें. (१५)

१३१ मोहानें वेढलेला, जो थोड्याबहुत फायद्याचा हव्यास धरून भलत्यासलत्या गोष्टी सांगतो, त्याला वृषल समजावें. (१६)

१३२. जो अहमन्यतेनें पतित होऊन आत्मस्तुति आणि लोकांचा तिरस्कार करतो, त्याला वृषल समजावें (१७)

१३३. रोसको कदरियो च पापिच्छो मच्छरी सठो।
अहिरिको अनोत्तप्पी तं जञ्ञा वसलो इति ॥ १८ ॥

१३४ यो बुद्धं परिभासति अथ वा तस्स सावकं।
परिब्बाजं गहट्ठं वा तं जञ्ञा वसलो इति ॥ १९ ॥

१३५ यो वे अनरहा सन्तो अरहं पटिजानाति।
चोरो सब्रह्मके लोके एस खो वसलाधमो।
एते खो वसला वुत्ता मया वो ये पकासिता ॥ २० ॥

१३६ न जच्चा वसलो होति न जच्चा होति ब्राह्मणो।
कम्मना वसलो होति कम्मना होति ब्राह्मणो ॥ २१ ॥

१३७ तदमिनाऽपि जानाथ यथा मे'दं निदस्सनं।
चण्डालपुत्तो सोपाको मातङ्गो इति विस्सुतो ॥ २२ ॥

---

१३३. जो दुसऱ्यावर रागावणारा, कृपण, असदिच्छ, मत्सरी, शठ, निर्लज्ज व लोकापवादभयरहित, त्याला वृषल समजावें. (१८)

१३४. जो बुद्धाला, त्याच्या श्रावकाला अथवा (इतर) परिव्राजकाला किंवा गृहस्थाला शिव्या देतो, त्याला वृषल समजावें. (१९)

१३५ जो अरहन्त नसून आपणास अरहन्त म्हणवितो तो सर्व जगांत चोर होय; तो वृषलाधम होय. हे वृषल आहेत, हें मीं तुम्हांस सांगून समजावून दिलें आहे. (२०)

१३६. जन्मानें वृषल होत नाहीं व जन्मानें ब्राह्मण होत नाहीं. कर्मानें वृषल होतो व कर्मानें ब्राह्मण होतो. (२१)

१३७. याला मी एक उदाहरण देतों. त्यानेंही ही गोष्ट समजून येण्याजोगी आहे. कुत्र्याचें मांस खाणारा चाण्डालपुत्र मातंग प्रसिद्ध होऊन गेला (२२)

१३८ सो यस परम पत्तो मातगो य सुदुल्लभं ।
आगच्छु तस्सुपट्ठान खत्तिया ब्राह्मणा बहू ॥ २३ ॥

१३९ सो देवयानमारुय्ह विरज सो महापथं ।
कामराग विराजेत्वा ब्रह्मलोकूपगो अहु ।
न न जाति निवारेसि ब्रह्मलोकूपपत्तिया ॥ २४ ॥

१४० अज्झायककुले जाता ब्राह्मणा मन्तबन्धुनो ।
ते च पापेसु कम्मेसु अभिण्हमुपदिस्सरे ॥ २५ ॥

१४१ दिट्ठे व धम्मे गारय्हा सपरायें च दुग्गतिं ।
न ते जाति निवारेति दुग्गच्चा गरहाय वा ॥ २६ ॥

१४२ न जच्चा वसलो होति न जच्चा होति ब्राह्मणो ।
कम्मुना वसलो होति कम्मुना होति ब्राह्मणो'ति ॥ २७ ॥

१ अ०— 'अज्झायका कुले जाता' ति पि पाठो.

१३८. त्या मातगाला अत्यत श्रेष्ठ आणि अत्यत दुर्लभ यश मिळालें, त्याच्या सेवेला पुष्कळ क्षत्रिय आणि ब्राह्मण हजर असत (२३)

१३९ निष्पाप व श्रेष्ठपथवर्ती देवयानात बसून व विषय-वास-नेचा क्षय करून तो ब्रह्मलोकास गेला ब्रह्मलोकीं जन्मण्याला त्याला त्याची जात आड आली नाही. (२४)

१४०. स्वाध्याय-सपन्न कुळात झालेले नामधारी वैदिक ब्राह्मण पुष्कळदा पापकर्मे आचरीत असलेले दिसून येतात (२५)

१४१ ते इहलोकीं निन्द्य होतात व परलोकीं दुर्गतीला जातात त्याचा जन्म दुर्गतीपासून किंवा निन्देपासून त्यांचे रक्षण करीत नाहीं (२६)

१४२. (म्हणून) जन्मानें वृषल होत नाहीं व जन्मानें ब्राह्मण होत नाहीं कर्मानें वृषल होतो, व कर्मानें ब्राह्मण होतो (२७)

एव वुत्ते अग्गिकभारद्वाजो ब्राह्मणो भगवन्त एतदवोच—अभिकन्त भो गोतम पे०. . धम्म च भिक्खुसघ च । उपासक म भव गोतमो धारेतु अज्जतग्गे पाणुपेत सरण गत ति ।

वसलसुत्त निट्ठितं ।

---

८

[ ८. मेत्तसुत्त ]

१४३ करणीयमत्थकुसलेन ॥ त सन्त पद अभिसमेच्च ।
सक्को उजू च सुजू च सुवचो चऽस्स मुदु अनतिमानी ॥ १ ॥

---

असें बोलल्यावर अग्गिक-भारद्वाज ब्राह्मण भगवन्ताला म्हणाला " धन्य धन्य, भो गोतमा, (इत्यादि) भिक्षुसघाला शरण जातों (येथपर्यंत)[1] आजपासून आमरण शरण गेलेला आहे, असें भगवान् गोतमानें समजावें "

वसलसुत्त समाप्त

---

८

[ ८. मेत्तसुत्त ]

१४३. शात पदाचें ज्ञान मिळवून तें पद प्राप्त करूं पाहणाऱ्या आत्महितदक्ष माणसाचें कर्तव्य हें कीं, ( त्यानें आपलें कर्तव्य पार पाडण्यास ) समर्थ, सरळांत सरळ, गोड बोलणारा, मृदु आणि निगर्वी व्हावें ( १ )

---

१. ' कसि भारद्वाज ' ( अनु॰ ४ ) सुत्ताच्या शेवटीं पहा

१४४ सन्तुस्सको च सुभरो च अप्पकिच्चो च सल्लहुकवुत्ति ।
सन्तिन्द्रियो च निपको च अप्पगब्भो कुलेसु अननुगिद्धो ॥२॥
१४५ न च खुद्द समाचरे किञ्चि येन विञ्ञू परे उपवदेय्युं ।
सुखिनो वा खेमिनो होन्तु सब्बे सत्ता भवन्तु सुखितऽत्ता॥३॥
१४६ ये केचि पाणभूतत्थि तसा वा थावरा वा अनवसेसा ।
दीघा वा ये महन्ता वा मज्झिमा रस्सकाऽणुकथूला ॥ ४ ॥
१४७ दिट्ठा वा ये'वे अदिट्ठा ये च दूरे वसन्ति अविदूरे ।
भूता वा सम्भवेसी वा सब्बे सत्ता भवन्तु सुखितऽत्ता ॥५॥
१४८ न परो परं निकुब्बेथ नातिमञ्ञेथ कत्थचि न कञ्चि ।
ब्यारोसना पटिघसञ्ञा नाञ्ञमञ्ञस्स दुक्खमिच्छेय्य ॥६॥

१ म०—ये च अदिट्ठा.

१४४. आणि (त्यानें) सन्तुष्ट, पोसण्यास सुलभ, उलाढाली न करणारा, साधेपणें वागणारा, शान्तेन्द्रिय, हुशार, अधृष्ट, व कुटुंबाविषयीं जास्त लोभ न बाळगणारा व्हावें (२)

१४५ जेणेंकरून सुज्ञ लोक इतरास दोष देतात, असें क्षुद्र आचरण करूं नये सर्व प्राणी सुखी, क्षेमी आणि आनंदित होवोत (अशी भावना करावी) (३)

१४६ जे कोणी चर किंवा स्थावर, लांब किंवा मोठे, मध्यम, ह्रस्व, अणुक आणि स्थूल ते सर्व प्राणी—( [redacted] )

१४७ दिसणारे अथवा न दिसणारे आणि जे दूर व जवळ राहतात, उत्पन्न झालेले किंवा उत्पन्न होतील ते—सर्व प्राणी आनंदित होवोत (५)

१४८ (त्यांपैकीं) एक दुसऱ्याला न ठकवो; कोठेंही एक दुसऱ्याची अवज्ञा न करो, रागावण्यानें व द्वेषबुद्धीनें एक दुसऱ्याला दुःख देण्याची इच्छा न धरो (६)

१४९ माता यथा नियं पुत्तं आयुसा एकपुत्तमनुरक्खे ।
एवंऽपि सब्बभूतेसु मानसं भावये अपरिमाणं ॥ ७॥
१५० मेत्तं च सब्बलोकस्मिं मानसं भावये अपरिमाणं ।
उद्धं अधो च तिरियं च असम्बाधं अवेरं असपत्तं ॥ ८ ॥
१५१ तिट्ठं चरं निसिन्नो वा सयानो वा यावतस्स विगतमिद्धो ।
एतं सतिं अधिट्ठेय्य ब्रह्ममेतं विहारं इधमाहु ॥ ९ ॥
१५२ दिट्ठिं च अनुपगम्म सीलवा दस्सनेन सम्पन्नो ।
कामेसु विनेय्य गेधं न हि जातु गब्भसेय्य पुनरेती ति ॥१०॥

मेत्तसुत्तं निट्ठितं ।

---

१ नि०, म०—विनय

१४९ आई जशी एकुलत्या एक औरस पुत्राचें आपलें आयुष्य खर्चूनही रक्षण करते, त्याचप्रमाणें सर्व प्राण्यांविषयीं अमर्याद प्रेम बाळगावें. (७)

१५० आणि सर्व लोकांविषयी वर, खालीं आणि चोहोंकडे, असंबाध, अवैर आणि असपत्न मैत्रीची अमर्याद भावना वाढवावी (८)

१५१. उभा असता, चालत असता, बसला असता, अथवा अंथरुणात असता, जोंपर्यंत निद्रा आली नाहीं तोंपर्यंत ही (मैत्री-भावनेची) स्मृति कायम ठेवावी हिलाच इहलोकीं ब्राह्मजीवन म्हणतात (९)

१५२. मिथ्यादृष्टीचा अवलंब न करता, शीलवान् आणि ज्ञान-संपन्न होऊन आणि विषयाचा लोभ सोडून दिल्यानें तो त्यानीनें पुनरपि गर्भवासाला येत नाहीं (१०)

मेत्तसुत्त समाप्त

## ९

## [ ९. हेमवतसुत्तं ]

१५३ अज्ज पण्णरसो उपोसथो (इति सातागिरो यक्खो) दिब्या रत्ति उपट्ठिता।
अनोमनाम सत्थार हन्द पस्साम गोतम ॥ १ ॥

१५४ कच्चि मनो सुपणिहितो ( इति हेमवतो यक्खो ) सब्ब-भूतेसु तादिनो।
कच्चि इट्ठे अनिट्ठे च सङ्कप्पस्स वसीकता ॥ २ ॥

१५५ मनो चऽस्स सुपणिहितो (इति सातागिरो यक्खो) सब्बभूतेसु तादिनो।
अथो इट्ठे अनिट्ठे च सङ्कप्पस्स वसीकता ॥ ३ ॥

---

## ९

## [ ९. हेमवतसुत्त ]

१५३. आज पौर्णिमेचा उपोसथ-असें सातागिर यक्ष म्हणाला—रात्र दिव्य आहे, चल, आपण नामांकित गुरूला—गोतमाला भेटूं ! ( १ )

१५४. त्याचें मन—असें हेमवत यक्ष म्हणाला—सर्व प्राणिमात्रा-विषयीं सुस्थिर आहे काय ? इष्ट आणि अनिष्ट वस्तूचे संकल्प त्याच्या स्वाधीन आहेत काय ? ( २ )

१५५ त्याचें मन—सातागिर यक्ष म्हणाला—सर्व प्राणिमात्रा-विषयीं सुस्थिर आहे, आणि इष्ट आणि अनिष्ट वस्तूचे संकल्प त्याच्या ताब्यात आहेत ( ३ )

१५६ कच्चि अदिन्नं नादियति (इति हेमवतो यक्खो) कच्चि पाणेसु सञ्ञतो।
कच्चि आरा पमादम्हा कच्चि झानं न रिञ्चति ॥ ४ ॥
१५७ न सो अदिन्नं आदियति (इति सातागिरो यक्खो) अथो पाणेसु सञ्ञतो।
अथो आरा पमादम्हा बुद्धो झानं न रिञ्चति ॥ ५ ॥
१५८ कच्चि मुसा न भणति (इति हेमवतो यक्खो) कच्चि न खीणव्यप्पथो[1]।
कच्चि वेभूतियं नाह कच्चि सम्फं न भासति ॥ ६ ॥
१५९ मुसा च सो न भणति (इति सातागिरो यक्खो) अथो न खीणव्यप्पथो।
अथो वेभूतियं नाह मन्ता अत्थं सो भासति ॥ ७ ॥

१ अ०- 'नाखीणव्यप्पथो'तिऽपि

१५६. तो चोरी करीत नाहीं ना ?—असें हेमवत यक्ष म्हणाला—प्राणघात करीत नाहीं ना ? प्रमादापासून दूर राहतो ना ? ध्यानसमाधींत दक्ष आहे ना ? (४)

१५७. तो चोरी करीत नाहीं—सातागिर यक्ष म्हणाला—प्राणघात करीत नाहीं, प्रमादापासून दूर राहतो आणि तो बुद्ध ध्यानसमाधींत दक्ष असतो. (५)

१५८. तो खोटें बोलत नाहीं ना ?—असें हेमवत यक्ष म्हणाला - कठोर वचन बोलत नाहीं ना ? चहाडी करीत नाहीं ना ? बडबड करीत नाहीं ना ? (६)

१५९. तो खोटें बोलत नाहीं—सातागिर यक्ष म्हणाला—कठोर वचन बोलत नाहीं, चहाडी करीत नाहीं व तो प्रज्ञेनें अर्थपूर्ण भाषण करतो. (७)

१६० कच्चि न रज्जति कामेसु (इति हेमवतो यक्खो) कच्चि चित्तं अनाविलं।
कच्चि मोहं अतिक्कन्तो कच्चि धम्मेसु चक्खुमा ॥ ८ ॥
१६१ न सो रज्जति कामेसु (इति सातागिरो यक्खो) अथो चित्तं अनाविलं।
सब्बं मोहं अतिक्कन्तो बुद्धो धम्मेसु चक्खुमा ॥ ९ ॥
१६२ कच्चि विज्जाय सम्पन्नो (इति हेमवतो यक्खो) कच्चि संसुद्धचारणो।
कच्चिऽस्स आसवा खीणा कच्चि नत्थि पुनब्भवो ॥ १० ॥
१६३ विज्जाय चेव सम्पन्नो (इति सातागिरो यक्खो) अथो संसुद्धचारणो।
सब्बस्स आसवा खीणा नत्थि तस्स पुनब्भवो ॥ ११ ॥

१-१ रो०-विज्जायमेव.

१६०. तो विषयात आसक्त होत नाहीं ना?—असें हेमवत यक्ष म्हणाला—त्याचें चित्त शान्त आहे काय? तो मोहाच्या पार गेला आहे काय? पदार्थांचें स्वरूप जाणण्यात तो डोळस आहे काय? (८)

१६१. तो विषयांत आसक्त नाहीं—सातागिर यक्ष म्हणाला—आणि त्याचें चित्त शान्त आहे; तो सर्व मोहाच्या पार गेला आहे, तो बुद्ध पदार्थांचें स्वरूप जाणण्यात डोळस आहे (९)

१६२. तो प्रज्ञासंपन्न आहे काय?—असें हेमवत यक्ष म्हणाला—आणि ह्याचें आचरण शुद्ध आहे काय? त्याचे आश्रव क्षीण झाले आहेत काय? त्याला पुनर्जन्म नाहीं ना? (१०)

१६३. तो प्रज्ञासम्पन्न आहे—सातागिर यक्ष म्हणाला—आणि त्याचें आचरण शुद्ध आहे; त्याचे सर्व आश्रव क्षीण झाले आहेत आणि त्याला पुनर्जन्म नाहीं. (११)

१६३ (अ) सपन्नं मुनिनो चित्तं कम्मना ब्यप्पथेन च ।
विज्जाचरणसपन्नं धम्मतो न पससति ॥ ११ (अ) ॥
१६३ (आ) सपन्नं मुनिनो चित्तं कम्मना ब्यप्पथेन च ।
विज्जाचरणसपन्नं धम्मतो अनुमोदसि ॥ ११ (आ) ॥
१६४ सपन्नं मुनिनो चित्तं कम्मना ब्यप्पथेन च ।
विज्जाचरणसपन्नं हन्द पस्साम गोतमं ॥ १२ ॥
१६५ एणिजघं किसं धीरं अप्पाहारं अलोलुपं ।
मुनिं वनस्मिं झायन्तं एहि पस्साम गोतमं ॥ १३ ॥
१६६ सीहं वेकचरं नागं कामेसु अनपेक्खिनं ।
उपसङ्कम्म पुच्छाम मच्चुपासा पमोचनं ॥ १४ ॥

---

१६३ (अ). (हेमवत–) त्या मुनीचें मन शारीरिक व वाचसिक सत्कर्मांनी सपन्न आहे—विद्याचरणसपन्न असलेल्याची तू धर्मानेही अनुसरूनच प्रशंसा करतोस. (११ अ)

१६३ (आ). (सातागिर–) त्या मुनीचें मन शारीरिक व वाचसिक सत्कर्मांनी सपन्न आहे विद्याचरणसपन्न असलेल्याचें तू धर्मास अनुसरूनच अभिनंदन करतोस (११ आ)

१६४. त्या मुनीचें मन शारीरिक सत्कर्मांनी सपन्न आहे चल, आपण त्या विद्याचरणसपन्न गोतमाला भेटू (१२)

१६५ (हेमवत–) मृगाच्या मांड्यांप्रमाणें ज्याच्या मांड्या आहेत, जो कृश, धैर्यवान्, मिताहारी, अलोलुप, वनात (एकांतात) ध्यान करणारा, असा मुनि गोतम–चल, त्याला आपण भेटू (१३)

१६६ सिंहाप्रमाणें एकाकी राहणाऱ्या व कामसुखात निरपेक्ष असलेल्या त्या नागोत्तमाजवळ जाऊन मृत्युपाशांतून मोक्ष कोणता हें विचारूं (१४)

---

१ नाग म्हणजे हत्ती किंवा ज्याचा पाप नाहीं तो; (न+आगृ पाप से)

१६७ अक्खातारं पवत्तारं सब्बधम्मान पारगुं ।
बुद्धं वेरभयातीतं मयं पुच्छाम गोतमं ॥ १५ ॥
१६८ किस्मिं लोको समुप्पन्नो ( इति हेमवतो यक्खो ) किस्मिं कुब्बति सन्थवं ।
किस्स लोको उपादाय किस्मिं लोको विहञ्ञति ॥ १६ ॥
१६९ छस्सु लोको समुप्पन्नो ( हेमवता ति भगवा ) छस्सु कुब्बति सन्थवं ।
छन्नमेव उपादाय छस्सु[1] लोको विहञ्ञति ॥ १७ ॥
१७० कतमं तं उपादानं यत्थ लोको विहञ्ञति ।
निय्यानं पुच्छितो ब्रूहि कथं दुक्खा पमुच्चति ॥ १८ ॥

१. म०–छसु.

१६७. आख्याता, प्रवक्ता, सर्व धर्मांच्या पार गेलेला, वैर आणि भय यांना ओलांडून गेलेला, असा जो बुद्ध त्याला आम्ही विचारतों. ( १५ )

१६८. कशामुळें लोक उत्पन्न होतो ?—असें हेमवत यक्ष म्हणाला—कशात तो ममत्व करतो ? त्याला लोक का म्हणतात व तो कां विघात पावतो ? (१६)

१६९. सहांमुळें[1] लोक उत्पन्न होतो—हे हेमवता, असें भगवान् म्हणाला—या सहांत तो ममत्व करतो. या सहांमुळें त्याला लोक म्हणतात; व या सहांमुळें तो विघात पावतो. ( १७ )

१७०. असें उपादान कोणतें कीं, ज्याच्यामुळें लोक विघात पावतो ? त्यापासून सुटका कशी होते, हें आम्ही विचारतों; दुःखापासून मुक्त कसा होतो, तें सांग. ( १८ )

१. सहांमुळें म्हणजे पंचेन्द्रियें व मन या सहांमुळें. या सहांना आध्यात्मिक आयतनें म्हणतात.

१७१ पञ्च कामगुणा लोके मनोछट्ठा पवेदिता ।
एत्थ छन्दं विराजेत्वा एवं दुक्खा पमुच्चति ॥ १९ ॥
१७२ एतं लोकस्स निय्यानं अक्खातं वो यथातथं ।
एतं वो अहमक्खामि एवं दुक्खा पमुच्चति ॥ २० ॥
१७३ को सूध तरति ओघं, कोध तरति अण्णवं ।
अप्पतिट्ठे अनालम्बे को गम्भीरे न सीदति ॥ २१ ॥
१७४ सब्बदा सीलसम्पन्नो पञ्ञवा सुसमाहितो ।
अज्झत्तचिन्ती सतिमा ओघं तरति दुत्तरं ॥ २२ ॥
१७५ विरतो कामसञ्ञाय सब्बसंयोजनातिगो ।
नन्दीभवपरिक्खीणो सो गम्भीरे न सीदति ॥ २३ ॥

१ सी०—पमोदिता. २ म०—अज्झत्तसञ्ञी. ३ म०—'विरतो' ति पि.

१७१ (भगवान्–) इहलोकीं पञ्चेन्द्रियांचे आणि मनाचे असे जे विषय सांगितले गेले आहेत, त्यांत आसक्ति सोडून दिली म्हणजे दुःखापासून मुक्त होतो (१९)

१७२ लोकापासून सुटण्याचा हा यथार्थ मार्ग सांगितला आहे, आणि हाच मी तुम्हांस सांगतों, यानेंच दुःखापासून मुक्त होतो (२०)

१७३ (हेमवत–) इहलोकीं ओघ कोण तरतो ? सागर कोण तरतो ? ज्यांत ठाव नाहीं व पकडण्याला काही नाहीं अशा या गंभीर सागरांत कोण बुडत नाहीं ? (२१)

१७४ (भगवान्–) सदोदित शीलसंपन्न, प्रज्ञावान्, समाधिसंपन्न, अध्यात्मचिन्तन करणारा व स्मृतिमान् (म्हणजे जागृत), असा मनुष्य दुस्तर ओघ तरून जातो (२२)

१७५ विषयांच्या कल्पनेपासून उपरत, सर्व संयोजनांच्या पलीकडे गेलेला व ज्याची तृष्णा आणि भवतृष्णा क्षीण झाली आहेत, असा मनुष्य या गंभीर सागरांत बुडत नाहीं. (२३)

१७६ गमीरपञ्ञ निपुणत्थदस्सि । अकिञ्चन कामभव असत्त ।
न पस्सथ सब्बधि विप्पमुत्त । दिब्बे पथे कममान महेसिं ॥२४॥

१७७ अनोमनाम निपुणत्थदस्सिं । पञ्ञाददं कामालये असत्त ।
त पस्सथ सब्बविदु सुमेध । अरिये पथे कममान महेसिं ॥२५॥

१७८ सुदिट्ठ वत नो अज्ज सुप्पभात सुहुट्ठित ।
य अद्दसाम सबुद्ध ओघतिण्णमनासव ॥ २६ ॥

१७९ इमे दससता यक्खा इद्धिमन्तो यसस्सिनो ।
सब्बे त सरण यन्ति त्व नो सत्था अनुत्तरो ॥ २७ ॥

१ म०—चकमन.

१७६ ( हेमवत—) गभीरप्रज्ञ, सूक्ष्मार्थदर्शी, निःस्पृह, कामाग्यात अनासक्त, अशा त्या सर्वतोपरी विमुक्त, दिव्य पथानें चालणाऱ्या महर्षीला पहा । ( २४ )

१७७ नामांकित, सूक्ष्मार्थदर्शी, प्रज्ञादायक, कामालयात अनासक्त, सर्वज्ञ आणि सुमेध अशा त्या आर्य पथानें चालणाऱ्या महर्षीला पहा । ( २५ )

१७८ आज आम्हाला चांगलें दर्शन घडलें, आजची पहाट शुभदायक झाली व आमचें ( सकाळचें ) उठणेंही शुभदायक झालें या कीं, आम्ही आज त्या ओघतीर्ण अनाश्रव संबुद्धाला पाहिलें (२६)

१७९ हे ऋद्धिमन्त आणि यशस्वी एक हजार यक्ष —ते सर्व तुला शरण जात आहेत तू आमचा अनुत्तर शास्ता हो ( २७ )

१ रागादिवर्म ज्याच्या ठिकाणीं नाहींत असा अकिञ्चन

१८० ते मय विचरिस्साम गामा गामं नगा नगं।
नमस्समाना सम्बुद्धं धम्मस्स च सुधम्मतं ति ॥ २८ ॥
हेमवतसुत्तं[1] निट्ठितं।

१०

[ १०. आळवकसुत्तं ]

एवं मे सुतं। एकं समयं भगवा आळवियं विहरति आळवकस्स यक्खस्स भवने। अथ खो आळवको यक्खो येन भगवा तेनुपसङ्कमि, उपसङ्कमित्वा भगवन्तं एतदवोच—निक्खम समणा ति। साधावुसो ति भगवा निक्खमि। पविस समणा ति। साधावुसो ति भगवा पाविसि। दुतियम्पि खो आळवको यक्खो भगवन्तं एतदवोच—निक्खम समणा

१ अ०—सातागिरिसुत्त ति एकच्चेहि।

१८० ते आम्ही सम्बुद्धाला आणि धर्माच्या सुधर्मतेला नमस्कार करीत गावोगावीं आणि पहाडोंपहाडीं फिरत राहू ! ( २८ )
हेमवतसुत्त समाप्त

१०

[ १०. आळवकसुत्त ]

असें मी ऐकलें आहे एके समयीं भगवान् आळवी येथें आळवक यक्षाच्या मंदिरात राहत होता त्या वेळीं आळवक यक्ष भगवन्ता पाशीं आला, व भगवन्ताला म्हणाला, " श्रमणा, बाहेर नीघ " " ठीक, आयुष्मन्, " असें म्हणून भगवान् बाहेर निघाला, " श्रमणा, आत ये " " ठीक, आयुष्मन् " असें म्हणून भगवान्

ति। साधावुसो'ति भगवा निक्खमि। पविस समणा ति। साधावुसो'ति भगवा पाविसि। ततियंऽपि खो आळवको यक्खो भगवन्तं एतदवोच—निक्खम समणा ति। साधावुसो'ति भगवा निक्खमि। पविस समणा ति। साधावुसो'ति भगवा पाविसि। चतुत्थंऽपि खो आळवको यक्खो भगवन्तं एतदवोच—निक्खम समणा ति। न ख्वाहं तं[1] आवुसो निक्खमिस्सामि, यं ते करणीयं तं करोही ति। पञ्हं तं समण पुच्छिस्सामि, सचे मे न व्याकरिस्ससि[2] चित्तं वा ते खिपिस्सामि, हदयं वा ते फालेस्सामि, पादेसु वा गहेत्वा पारगङ्गाय खिपिस्सामी ति। न ख्वाहं तं आवुसो पस्सामि सदेवके लोके समारके सब्रह्मके सस्समणब्राह्मणिया पजाय सदेवमनुस्साय यो मे चित्तं वा खिपेय्य,

१ अ०—तं'ति दैतुवचनं. २ अ०—व्याकरिस्ससि.

आत गेला. दुसऱ्यांदाही आळवक यक्ष भगवन्ताला म्हणाला, "श्रमणा, बाहेर नीघ." "ठीक, आयुष्मन्" असें म्हणून भगवान् बाहेर निघाला. "श्रमणा, आत ये" "ठीक, आयुष्मन्" असें म्हणून भगवान् आत गेला. तिसऱ्यांदाही आळवक यक्ष भगवन्ताला म्हणाला, "श्रमणा, बाहेर नीघ." "ठीक, आयुष्मन्" असें म्हणून भगवान् बाहेर निघाला. "श्रमणा, आत ये" "ठीक, आयुष्मन्" असें म्हणून भगवान् आत गेला. चौथ्यांदाही आळवक यक्ष भगवन्ताला म्हणाला, "श्रमणा, बाहेर नीघ" "आयुष्मन्, मी आता बाहेर निघणार नाहीं तूं जें काहीं करावयाचें असेल तें कर." "हे श्रमणा, मी तुला प्रश्न विचारतों; त्याचें जर तूं बरोबर उत्तर दिलें नाहींस तर तुला मी वेड लावीन, किंवा तुझें हृदय फाडून टाकीन, अथवा तुझ्या पायाला धरून तुला गंगेच्या पार फेकीन."

"आयुष्मन्, या सदेवक, समारक, सब्रह्मक लोकांत, श्रमण-

हदय वा फालेय्य, पादेसु वा गहेत्वा पारगगाय खिपेय्य, अपि च त्व आवुसो पुच्छ यदाकखसी ति। अय खो आळवको यक्खो भगवन्त गाथाय अज्झभासि--

१८१ किं सूध वित्त पुरिसस्स सेट्ठ। किं सु सुचिण्ण सुखमावहाति।
किं सु हवे सादुतर रसान। कथजीविं जीवितमाहु सेट्ठ ॥१॥

१८२ सद्धीध वित्त पुरिसस्स सेट्ठ। धम्मो सुचिण्णो सुखमावहाति।
सच्च हवे सादुतर[1] रसान। पञ्ञाजीविं जीवितमाहु सेट्ठ॥२॥

१८३ कथ सु तरती[2] ओघ कथ सु तरति अण्णव।
कथ सु दुक्ख अच्चेति कथ सु परिसुज्झति ॥ ३ ॥

१ अ०--साधुतर. २ म०--तरति

ब्राम्हणात अथवा देवमनुष्यात असा कोणीही मला दिसत नाहीं कीं, जो मला वेड लावील, किंवा माझें हृदय फाडील, अथवा माझ्या पायाला धरून मला गंगेच्या पार फेकील तथापि आयुष्मन्, तुझ्या इच्छे प्रमाणें प्रश्न विचार '' तेव्हा आळवक यक्ष भगवन्ताला गाथेनें म्हणाला

१८१ इहलोकीं मनुष्याला श्रेष्ठ धन कोणतें? कोणचें सञ्चय केलें असता सुखकारक होतें? स्वादु पदार्थांत उत्तम कोणता? कोण या रीतीनें वागलें असता त्याच्या जीवनाला श्रेष्ठ मानतात? ( १ )

१८२. ( भगवान्-- ) मनुष्याचें इहलोकीं श्रेष्ठ धन श्रद्धा होय सद्धर्म सपादन केला असता सुखकारक होतो सत्य हा स्वादुतम पदार्थ होय प्रज्ञापूर्वक वागणाराचें जीवन श्रेष्ठ मानलें जातें ( २ )

१८३. ( मनुष्य ) ओघ कसा तरतो? अर्णव कसा तरतो? दुःखाच्या पार कसा जातो? परिशुद्ध कसा होतो? ( ३ )

१८९ इह्व अञ्ञेऽपि पुच्छस्सु पुथू समणब्राह्मणे ।
　　यदि सच्चा दमा[1] चागा[2] खन्त्या भिय्यो[3] ध विज्जति ॥ ९ ॥
१९० कथं नु दानि पुच्छेय्य पुथू समणब्राह्मणे ।
　　सोऽहं अज्ज पजानामि यो[4] चऽत्थो सम्परायिको ॥ १० ॥
१९१ अत्थाय वत मे बुद्धो वासायाळविमागमा ।
　　सोऽहं अज्ज पजानामि यत्थ दिन्नं महप्फलं ॥ ११ ॥
१९२ सो अहं विचरिस्सामि गामा गामं पुरा पुरं ।
　　नमस्समानो सम्बुद्धं धम्मस्स च सुधम्मतं ति ॥ १२ ॥

१ म०–धम्म　२ म०–चागो　३ म०–भीयो　४ रो०–अत्थो

१८९ पाहिजे तर निरनिराळ्या श्रमणब्राह्मणांना सत्य, दम[1], त्याग आणि क्षान्ति यांच्यापेक्षा श्रेष्ठ इहलोकीं काहीं आहे काय हें विचार (९)

१९० (आळवक–) आता मी निरनिराळ्या श्रमण-ब्राह्मणांना कशाला विचारूं ? कां कीं, आज मला पारलौकिक लाभ म्हणून जो आहे तो समजला (१०)

१९१ खरोखर माझ्या लाभासाठीं बुद्ध आळवीला राहावयास आला. त्या मला आज दान कोणाला दिलें असता विशेष लाभदायक होतें हें समजलें (११)

१९२ तो मी सम्बुद्धाला आणि धर्माच्या सुधर्मतेला नमस्कार करीत व गांवोगांवीं व शहरोंशहरीं फिरत राहीन (१२)

१ 'धर्म' असाही पाठ कांहीं पुस्तकांतून आहे

एवं वुत्ते आळवको यक्खो भगवन्त एतदवोच–अभिक्कन्त भो गोतम . .पे० भिक्खुसघ च । उपासक म भव गोतमो धारेतु अज्जतग्गे पाणुपेत सरण गत'ति' ।

आळवकसुत्त निट्ठित ।

## ११

## [ ११. विजयसुत्तं ]

१९३ चर वा यदि तिट्ठ निसिन्नो उद वा सय ।
सम्मिञ्जेति पसारेति एसा कायस्स इञ्जना ॥ १ ॥
१९४ अट्ठिनहारुसयुत्तो तचमसावलेपनो ।
छविया कायो पटिच्छन्नो यथाभूत न दिस्सति ॥ २ ॥

१–१ मशी व रोमन आवृत्तींत नाहीं.

त्यावर आळवक यक्ष भगवताला म्हणाला, "धन्य धन्य, भो गोतम इत्यादिक." आजपासून आमरण शरण गेलेला मी उपासक आहें असें भवान् गोतमानें समजावें.

आळवकसुत्त समाप्त

## ११

## [ ११. विजयसुत्त ]

१९३. चालताना, उभा असता, बसला असता किंवा निद्रा-यात पडला असता, हा देह सकोच पावतो अथवा पसरतो. ही शरिराची हालचाल. ( १ )

१९४. हाडें आणि स्नायु ह्यानीं युक्त व मासानें आणि त्वचेनें लेपलेला हा काय छवीनें आच्छादल्यामुळें यथार्थतया दिसत नाहीं (२)

१९५ अन्तपूरो उदरपूरो यकपेळस्स वत्थिनो।
हदयस्स पप्फासस्स वक्कस्स पिहकस्स च ॥ ३ ॥
१९६ सिंघाणिकाय खेळस्स सेदस्स च मेदस्स च।
लोहितस्स लसिकाय पित्तस्स च वसाय च ॥ ४ ॥
१९७ अथऽस्स नवहि सोतेहि असुचि सवति सब्बदा।
अक्खिम्हा अक्खिगूथको कण्णम्हा कण्णगूथको ॥ ५ ॥
१९८ सिंघाणिका च नासातो मुखेन वमतेकदा।
पित्तं सेम्हं च वमति कायम्हा सेदजल्लिका ॥ ६ ॥
१९९ अथऽस्स सुसिरं सीसं मत्थलुङ्गस्स पूरितं।
सुभतो नं मञ्ञती[1] बालो अविज्जाय पुरक्खतो ॥ ७ ॥

१ म०-वमति एकदा. २ म० मञ्ञति

१९५. आतड्यानें, कोठ्यातील पदार्थांनीं, यकृत्-पिंडानीं, मूत्राशयानें, हृदयानें, फुप्फुसानें, वृक्कानें आणि प्लीहेनें, (३)

१९६. शेंबडानें, थुंकीनें, घामानें, मेदानें, रक्तानें, लसिकेनें[1], पित्तानें आणि वसेनें हा काय भरलेला आहे. (४)

१९७. आणि याच्या नवद्वारांतून सदोदित अशुचि पदार्थ निघत असतात. डोळ्यांतून डोळ्यांचा मळ, कानांतून कानाचा मळ, (५)

१९८ *आणि नाकांतून शेंबूड निघतो, आणि मुखांतून एकादे वेळीं ओकतो;* पित्त आणि कफ ओकतो शरीरांतून घाम निघतो. (६)

१९९ आणि याचें पोकळ डोकें मेंदूनें भरलें आहे. अविद्येनें पुरस्कृत असा मूर्ख माणूस हा देहाला सुन्दर समजतो (७)

१. हाडाच्या सांध्यांत वंगणासारखा उपयोगी पडणारा द्रव पदार्थ.

२०० यदा च सो मतो सेति उद्धुमातो विनीलको।
अपविद्धो सुसानस्मिं अनपेक्खा होन्ति ञातयो ॥ ८ ॥

२०१ खादन्ति नं सुवाना[1] च सिगाला च वका किमी।
काका गिज्झा च खादन्ति ये चञ्ञे सन्ति पाणिनो[2] ॥ ९ ॥

२०२ सुत्वान बुद्धवचनं भिक्खु पञ्ञाणवा इध।
सो खो नं परिजानाति यथाभूतं हि पस्सति ॥ १० ॥

२०३ यथा इदं तथा एतं यथा एतं तथा इदं।
अज्झत्तं च बहिद्धा च काये छन्दं विराजये ॥ ११ ॥

२०४ छन्दरागविरत्तो सो भिक्खु पञ्ञाणवा इध।
अज्झगा अमतं सन्तिं निब्बाणपदमच्चुतं[3] ॥ १२ ॥

---

१ सी०-सुवाणा, रो०-सुवाणा. २ अ०, रो०, सी०- पाणयो.
३ म०-निब्बाणं पदमच्चुतं.

---

२००. आणि जेव्हां तो देह मृत होऊन फुगलेला, निळा झालेला, स्मशानांत टाकलेला पडून राहतो, तेव्हां सगेसोयरे त्याची उपेक्षा करतात. ( ८ )

२०१. त्याला कोल्हे, कुत्रे, लांडगे आणि किडे खातात; कावळे आणि गिधाडें खातात, किंवा तसेच इतर प्राणी खातात. ( ९ )

२०२. इहलोकीं बुद्धोपदेश ऐकून ज्ञानवान् भिक्षु अशा त्या देहाला पूर्णपणें जाणतो; कारण तो यथार्थतया पाहतो. ( १० )

२०३. जसें हें ( माझें शरीर ), तसें तें ( मृत शरीर ); जसें तें, तसें हें; ( असें जाणून ) आपल्या आणि परक्याच्या शरिराचा लोभ सोडून द्यावा. ( ११ )

२०४. स्नेहलोभापासून विरक्त झालेला तो ज्ञानवान् भिक्षु अमृत-शान्तिरूप अढळ निर्वाणपद पावलेलाच आहे. ( १२ )

२०५ दिपादकोऽयं[1] असुचि दुग्गन्धो परिहीरति।
नानाकुणपपरिपूरो विस्सवन्तो ततो ततो ॥१३॥
२०६ एतादिसेन कायेन यो मञ्ञे उण्णमेतवे।
परं वा अवजानेय्य किमञ्ञत्र अदस्सना ति ॥१४॥

विजयसुत्तं[2] निट्ठितं।

---

१२

## [ १२. मुनिसुत्त ]

२०७ सन्थवातो[3] भयं जातं निकेता जायते रजो।
अनिकेतमसन्थवं एतं वे मुनिदस्सनं ॥ १ ॥

---

१ म०—द्विपादकोऽयं २ रो०— 'कायविच्छन्दनिकसुत्तं' तिऽपि
३ म० सन्थवतो

---

२०५ हा दोन पायाचा, अशुचि, दुर्गन्ध व अनेक घाणेरड्या पदार्थांनीं भरलेला व त्या त्या (अवयवांतून) पाझरणारा (पुष्पगन्धादींनीं नटवून) जगविला जातो (१३)

२०६ अशा देहानें जो गर्विष्ठ होणें योग्य मानील, किंवा दुसऱ्याची अवहेलना करील, त्याच्या अज्ञानावाचून दुसरें कारण कोणतें? (१४)

विजयसुत्त समाप्त

१२

## [ १२. मुनिसुत्त ]

२०७ स्नेहापासून भय उत्पन्न होतें आणि घरापासून मळ उत्पन्न होतो, म्हणून अनागार आणि निःस्नेहता हेंच मुनीचें तत्त्वज्ञान होय (१)

उच्छिद्य
२०८ यो जातमुच्छिज्ज न रोपयेय्य । जाय तमस्स नानुप्पवेच्छे ।[1]
तमाहु एक मुनिन चरन्त । अद्दक्खि सो सन्तिपद महेसि ॥२॥
२०९ सखाय वत्थूनि पहाय बीज । सिनेहमस्स नानुप्पवेच्छे ।
स वे मुनी जातिखय तदस्सी । तक्क पहाय न उपेति सख ॥३॥
२१० अञ्ञाय सब्बानि निवेसनानि । अनिकामय अञ्ञतरऽपि तेस ।
स वे मुनी वीतगेधो अगिद्धो । नायूहति पारगतो हि होति ॥४॥
२११ सब्बाभिभु सब्बविदु सुमेध । सब्बेसु धम्मेसु अनूपलित्त ।
सब्बजह तण्हक्खये विमुत्त । त वाऽपि धीरा मुनि वेदयन्ति ॥५॥

१ म०, सी०– अदक्खि २ म०–महेसिं ३ रो०,अ०– पमाय, म०– समाय ४ म०– मुनि

२०८ जो उद्भवलेल्या ( मनोदोषाचा ) उच्छेद करून त्याला पुन वाढू देत नाहीं व उद्भवणाऱ्यालाही कोणत्याही तऱ्हेनें उत्तेजन देत नाहीं, त्या एकाकी राहणाऱ्याला मुनि म्हणतात, त्या महर्षीनें शांतिपद पाहिलें आहे ( २ )

२०९ पदार्थ जाणून व त्याच्या बीजाचा त्याग करून जो त्याना स्नेह ( ओलावा ) देत नाहीं, तो खरोखर ज मक्षयातदर्शी मुनि होय तो तर्क सोडून देऊन पुन नामाभिधान ( जन्म ) पावत नाहीं ( ३ )

२१० जो सर्व प्रकारचे भव जाणतो व त्यापैकीं एकाचीही इच्छा करीत नाहीं, तो वीततृष्ण निर्लोभी मुनि भवोत्पादक कर्म करीत नाहीं, कारण तो पार जातो ( ४ )

२११ जो सर्व जिंकणारा, सर्व जाणणारा, सुबुद्धि, सर्व पदार्थांपासून अलिप्त राहणारा, सर्वांचा त्याग करणारा व तृष्णा-क्षयानें मुक्त झालेला—त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात ( ५ )

१ कामभवादि सर्व भव, ज्यात मनुष्य प्रवेश करू शकतो

२१२ पञ्ञाबलं सीलवतूपपन्नं । समाहितं झानरतं सतीमं ।
सङ्गा पमुत्तं अखिलं अनासवं । तं वाऽपि धीरा मुनिं वेदयन्ति ॥ ६ ॥

२१३ एकं चरन्तं मुनिं अप्पमत्तं । निन्दापसंसासु अवेधमानं ।
सीहं'व सद्देसु असन्तसन्तं । वातं'व जालम्हि असज्जमानं ।
पदुमं'व तोयेन अलिप्पमानं । नेतारमञ्ञेसमनञ्ञनेय्यं ।
तं वाऽपि धीरा मुनिं वेदयन्ति ॥ ७ ॥

२१४ यो ओग्गहने थम्भोरिवाभिजायति । यस्मिं परे वाचापरियन्तं वदन्ति ।
तं वीतरागं सुसमाहितिन्द्रियं । तं वाऽपि धीरा मुनिं वेदयन्ति ॥ ८ ॥

१ सी०-सलिलं. २ अ०, रो०, म०-ओगहणे; सी०-याहणे. ३ म०-वाचं.

२१२. प्रज्ञा हें ज्याचें बळ, जो शीलव्रतानें संपन्न, समाहित (चित्त समतोल ठेवणारा), ध्यानरत, स्मृतिमान्, संगापासून मुक्त, अकाठिनें व अनाश्रव—त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. (६)

२१३. एकाकी राहणारा, अप्रमत्त मुनि, निन्देनें व स्तुतीनें न गडबडणारा, सिंहाप्रमाणें शब्दांना न घाबरणारा, वाऱ्याप्रमाणें जाळ्यांत न अडकणारा, कमलाप्रमाणें पाण्यांत अलिप्त राहणारा, इतरांचा नेता पण ज्याला नेता नाहीं असा—त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. (७)

२१४. ज्याच्याविषयीं लोक वाटेल तें बोलतात, तरी जो घाटावरील स्तम्भाप्रमाणें स्थिर राहतो, जो वीतराग व सुसमाहितेन्द्रिय—त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. (८)

१. १९ व्या गाथेवरील टीप पहा. २. घाटावर चौकोनी अथवा अष्टकोनी खांब बांधीत असत व त्यावर सर्व जातींचे लोक पाठ घाशीत असत.

२१५ यो वे ठितत्तो तसरं व उज्जु। जिगुच्छति कम्मेहि पापकेहि।
वीमंसमानो विसमं समं च। तं वाऽपि धीरा मुनिं वेदयन्ति ॥ ९ ॥

२१६ यो सञ्ञतत्तो न करोति पापं। दहरो च मज्झो च मुनी यतत्तो।
अरोसनेय्यो सो न रोसेति कञ्चि। तं वाऽपि धीरा मुनिं वेदयन्ति १०

२१७ यदग्गतो मज्झतो सेसतो वा। पिण्डं लभेथ परदत्तूपजीवी।
नालं थुतुं नोऽपि निपच्चवादी। तं वाऽपि धीरा मुनिं वेदयन्ति ११

२१८ मुनिं चरन्तं विरतं मेथुनस्मा। यो योब्बने न उपनिबज्झते क्वचि।
मदप्पमादा विरतं विप्पमुत्तं। तं वाऽपि धीरा मुनिं वेदयन्ति १२

---

२१५. जो सरळ धोट्याप्रमाणें स्थिरात्मा, जो पापकर्मांचा तिरस्कार करतो, आणि विषम आणि सम यांची पारख करतो— त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. (९)

२१६. लहान असो वा मध्यम वयाचा असो, जो संयतात्मा, यतात्मा मुनि पाप करीत नाही, रागावत नाही, दुसऱ्या कोणालाही राग आणीत नाही—त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. (१०)

२१७. जो इतरांनी दिलेल्या अन्नावर उपजीविका करणारा, अन्न शिजविलेल्या भांड्यातून वरच्या, मधल्या अथवा तळच्या अन्नाची भिक्षा मिळाली असतां स्तुति किंवा निंदा करीत नाही— त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. (११)

२१८. जो मुनि स्त्रीसंगापासून विरत होऊन हिंडतो, जो यौवनांत कोठेंही बद्ध होत नाही, जो मदप्रमादापासून विरत व मुक्त— त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. (१२)

२१९ अञ्ञाय लोकं परमत्थदस्सिं । ओघं समुद्दं अतितरिय तादिं ।
तं छिन्नगन्थं असितं अनासवं । तं वा'पि धीरा मुनिं वेदयन्ति १३
२२० असमा उभो[1] दूरविहारवुत्तिनो । गिहि दारपोसी अममो च सुब्बतो ।
परपाणरोधाय गिही[2] असञ्ञतो । निच्चं मुनी[3] रक्खति पाणिनो यतो १४
२२१ सिखी यथा नीलगीवो विहङ्गमो । हंसस्स नोपेति जवं कुदाचनं ।
एवं गिही नानुकरोति भिक्खुनो । मुनिनो विवित्तस्स वनम्हि
झायतो'ति ॥ १५ ॥

मुनिसुत्तं निट्ठितं ।

उरगवग्गो पठमो ।

---

१ सी०—उभो. २ म०—गिहि. ३ म०—मुनि.

---

२१९. इहलोक जाणून ज्यानें परमार्थ पाहिला, जो ओघ आणि समुद्र तरून तादृग्भाव पावला, जो छिन्नग्रंथि, अनाश्रित आणि अनाश्रव—त्याला सुज्ञ लोक मुनि म्हणतात. ( १३ )

२२०. बायकोला पोसणारा गृहस्थ व निर्मम, सु-व्रती संन्यासी, हे सारखे नाहींत. या दोघांची राहणी व वृत्ति फार भिन्न आहे. कारण परप्राणघात न व्हावा याविषयीं गृहस्थ संयम बाळगीत नाहीं व मुनि संयत होत्साता सदोदित प्राण्यांचें रक्षण करतो. ( १४ )

२२१. जसा आकाशांत उडणारा नीलग्रीव मोर कधींहि हंसाच्या वेगानें जाऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें गृहस्थ एकान्तीं वनांत ध्यान करणाऱ्या भिक्षूचें—मुनीचें अनुकरण करूं शकत नाहीं. ( १५ )

मुनिसुत्त समाप्त

उरगवग्ग, पहिला समाप्त

तस्सुद्दानं—

(उरगो धनियो चेव विसाण च तथा कसि ।
चुन्दो पराभवो चेव वसलो मेत्तभावना ॥
सातागिरो आळवको विजयो च तथा मुनि ।
द्वादसेतानि सुत्तानि उरगवग्गो'ति वुच्चति ॥

---

# [ चूळवग्गो दुतियो ]

## १३

### [ १. रतनसुत्तं ]

२२२ यानीध भूतानि समागतानि । भुम्मानि वा यानि'व अन्तलिक्खे ।
सब्बे च भूता सुमना भवन्तु । अथो च सक्कच्च सुणन्तु भासितं १

---

त्यातील सुत्ते—उरग, धनिय आणि खग्गविसाण, कसिभारद्वाज, चुन्द, पराभव आणि वसल, मेत्ताभावना, सातागिर, आळवक, विजय आणि मुनि—हीं बारा सुत्तें मिळून उरगवर्ग होतो.

---

# [ चूळवग्ग दुसरा ]

## १३

### [ १. रतनसुत्त ]

२२२. भूमिगत किंवा अन्तरिक्षांतील जीं भूतें येथें जमलीं असतील तीं सर्व भूतें आनंदित होवोत, आणि हें सुभाषित आदरपूर्वक ऐकोत. ( १ )

२२३ तस्मा हि भूता निसामेथ सब्बे । मेत्त करोथ मानुसिया पजाय ।
दिवा च रत्तो च हरन्ति ये बलिं । तस्मा हि ने रक्खथ अप्पमत्ता
२२४ यं किञ्चि वित्त इध वा हुरं वा । सग्गेसु वा य रतन पणीत ।
न नो सम अत्थि तथागतेन । इदऽपि बुद्धे रतन पणीत ।
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥ ३ ॥
२२५ खय विराग अमत पणीत । यदज्झगा सक्यमुनी समाहितो ।
न तेन धम्मेन समत्थि किञ्चि । इदऽपि धम्मे रतन पणीत ।
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥ ४ ॥
२२६ य बुद्धसेट्ठो परिवण्णयी सुचिं । समाधिमानन्तरिकञ्ञमाहु ।
समाधिना तेन समो न विज्जति । इदऽपि धम्मे रतन पणीत ।
एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥ ५ ॥

---

२२३. म्हणून हे सर्व भूतांनो, हें ऐका मनुष्यजातीवर प्रेम करा रात्रंदिवस मनुष्य तुम्हांला नैवेद्य देतात म्हणून त्यांचें तुम्ही सावधानपणें रक्षण करा. (२)

२२४. इह किंवा परलोकीं जें वित्त असेल, किंवा स्वर्गांत जें उत्तम रत्न असेल, तें आमच्या तथागताच्या तोडीचें असणार नाहीं बुद्धाचें ठायीं वसणारें हें उत्तम रत्न आहे या सत्यानें स्वस्ति होवो (३)

२२५ समाहित शाक्यमुनीनें तृष्णाक्षयमय, विरागमय, अमर असा जो उत्तम धर्म जाणला, त्याच्यासारखा दुसरा नाहीं. धर्माचें ठायीं वसणारें हें उत्तम रत्न आहे या सत्यानें स्वस्ति होवो. (४)

२२६. ज्या शुद्ध समाधीची बुद्धश्रेष्ठानें प्रशंसा केली, जिला तात्काळ फळ देणारी म्हणतात, त्या समाधीसारखी दुसरी नाहीं धर्माचें ठायीं वसणारें हें उत्तम रत्न आहे या सत्यानें स्वस्ति होवो. (५)

२२७ ये पुग्गला अट्ठ सतं पसत्था । चत्तारि एतानि युगानि होन्ति
ते दक्खिणेय्या सुगतस्स सावका एतेसु दिन्नानि महप्फलानि ।
इदऽपि संघे रतनं पणीतं । एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥ ६ ॥

२२८ ये सुप्पयुत्ता मनसा दळ्हेन । निक्कामिनो गोतमसासनम्हि ।
ते पत्तिपत्ता अमतं विगय्ह । लद्धा मुधा निब्बुतिं भुञ्जमाना ।
इदऽपि संघे रतनं पणीतं । एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥ ७ ॥

२२९ यथिन्दखीलो पठविं सितो सिया । चतुब्भि वातेहि असम्पकम्पियो ।
तथूपमं सप्पुरिसं वदामि । यो अरियसच्चानि अवेच्च पस्सति ।
इदऽपि संघे रतनं पणीतं । एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥ ८ ॥

---

२२७. सज्जनांना पसंत ज्या आठ[1] व्यक्ति, ज्यांच्या चार जोड्या होतात, ते सुगताचे श्रावक पूजनीय होत, त्यांना दिलेलें दान महत्फळदायक होतें, संघाचें ठायीं वसणारें हें उत्तम रत्न आहे. ह्या सत्यानें स्वस्ति होवो. ( ६ )

२२८. जे सर्वस्वाचा त्याग करून दृढ मनानें गोतमाच्या पंथात प्रवेश करतात, ते प्राप्तव्य प्राप्त करून आणि अमृताचें अवगाहन करून अनायासें मिळविलेल्या शांतीचा उपभोग घेतात. संघाचे ठायीं वसणारें हें उत्तम रत्न आहे ह्या सत्यानें स्वस्ति होवो ( ७ )

२२९ नगरद्वारासमोर पृथ्वींत ( खोल रोवून ) उभारलेला स्तम्भ जसा चारही बाजूंच्या वाऱ्यांनीं हालत नाहीं, तसा जो चार आर्यसत्यें विचारपूर्वक जाणतो तो सत्पुरुष आहे, असें मी म्हणतों संघाचें ठायीं वसणारें हें उत्तम रत्न आहे ह्या सत्यानें स्वस्ति होवो. ( ८ )

---

१ आठ व्यक्तींसाठीं ' समाधिमार्ग ' ( पृष्ठ ७२ ) संघानुस्मृति पहा.

२३० ये अरियसच्चानि विभावयन्ति। गंभीरपञ्ञेन सुदेसितानि।
किञ्चापि ते होन्ति भुसप्पमत्ता। न ते भवं अट्ठमं आदियन्ति।
इदऽपि संघे रतनं पणीतं। एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥ ९ ॥

२३१ सहावऽस्स दस्सनसम्पदाय। तयस्सु धम्मा जहिता भवन्ति।
सक्कायदिट्ठि विचिकिच्छितं च। सीलब्बतं वाऽपि यदत्थि किञ्चि।
चतूहपायेहि च विप्पमुत्तो। छ चाभिठानानि अभब्बो कातुं।
इदऽपि संघे रतनं पणीतं। एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥ १० ॥

---

२३० जे गभीर-प्रज्ञानें (बुद्धानें) उत्तम रीतीनें उपदेशिलेल्या चार आर्यसत्याची भावना करतात, ते जरी कितीहि बेसावधपणें वागले तरी आठवा जन्म घेत नाहींत. संघाचे ठायीं वसणारें हें उत्तम रत्न आहे. ह्या सत्यानें स्वस्ति होवो.[1] (९)

२३१ सम्यक् दृष्टि प्राप्त झाल्याबरोबर तो (वरच्यापैकीं एक) देहात्मदृष्टि, कुशंका व व्रतउपासनांवरल्या एकाद्या गोष्टीवर असलेला विश्वास, या तीन गोष्टी सोडून देतो, चार दुर्गतींपासून[2] मुक्त होतो व सहा गोष्टी त्याच्या हातून घडणें असंभवनीय होतें. संघाचें ठायीं वसणारें हें उत्तम रत्न आहे. ह्या सत्यानें स्वस्ति होवो. (१०)

---

१ ही व ह्याच्या खालच्या दोन गाथा सोतापन्नाला उद्देशून आहेत 'समाधिमार्ग' पृष्ठ १०६ पाहा.

२ चार दुर्गति किंवा अपाय = नरक, तिर्यग्योनि, प्रेतविषय आणि असुरलोक. सहा गोष्टी = मातृघात, पितृघात, अर्हद्वध, तथागताला जखम करणें, संघभेद व बुद्धेतर गुरूला भजणें

२३२ किञ्चापि सो कम्म करोति पापक। कायेन वाचा उद चेतसा वा।
अभब्बो सो तस्स पटिच्छदाय। अभब्बता दिट्ठपदस्स वुत्ता।
इदऽपि सघे रतन पणीत। एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥११॥
२३३ वनप्पगुम्बे यथा फुस्सितग्गे। गिम्हान मासे पठमस्मिं गिम्हे।
तथूपम धम्मवर अदेसयि। निब्बाणगामिं परम हिताय।
इदऽपि बुद्धे रतन पणीत। एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥१२॥
२३४ वरो वरञ्ञू वरदो वराहरो। अनुत्तरो धम्मवर अदेसयि।
इदऽपि बुद्धे रतन पणीत। एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥१३॥

---

२३२. जर त्याच्याकडून कायेनें, वाचेनें किंवा मनानें काहीं पाप घडेल, तर तें तो कदापि झाकून ठेवणार नाहीं. असलें कृत्य (निर्वाण-) पद ज्यानें पाहिलें आहे अशाच्या हातून होणें शक्य नाहीं संघाचे ठायीं असलेलें हें उत्तम रत्न आहे ह्या सत्यानें स्वस्ति होवो. (११)

२३३. उन्हाळ्याच्या पहिल्या[1] महिन्यात जसा एखादा वनगुल्म मात्र प्रफुल्लित व्हावा, तद्वत् बुद्धानें निर्वाणगामी परमश्रेष्ठ धर्म लोकहितार्थ उपदेशिला बुद्धाचें ठायीं असलेलें हें उत्तम रत्न आहे ह्या सत्यानें स्वस्ति होवो (१२)

२३४ श्रेष्ठ, श्रेष्ठज्ञ, श्रेष्ठद, श्रेष्ठ आणणारा, अनुत्तर अशा बुद्धानें श्रेष्ठ धर्म उपदेशिला आहे बुद्धाचे ठायीं असलेलें हें उत्तम रत्न आहे. ह्या सत्यानें स्वस्ति होवो (१३)

---

१ अ०--चैत्रमासात ज्याला 'बालवसन्त' असेंहि म्हणतात.

२३५ खीणं पुराणं नवं नत्थि सम्भवं । विरत्तचित्ता आयतिके भवस्मिं ।
ते खीणबीजा अविरूळ्हिछन्दा । निब्बन्ति धीरा यथाऽयं पदीपो ।
इदंऽपि संघे रतनं पणीतं । एतेन सच्चेन सुवत्थि होतु ॥ १४॥
२३६ यानीध भूतानि समागतानि । भुम्मानि वा यानि'व अन्तळिक्खे ।
तथागतं देवमनुस्सपूजितं । बुद्धं नमस्साम सुवत्थि होतु ॥ १५॥
२३७ यानीध भूतानि समागतानि । भुम्मानि वा यानि'व अन्तळिक्खे ।
तथागतं देवमनुस्सपूजितं । धम्मं नमस्साम सुवत्थि होतु ॥ १६॥
२३८ यानीध भूतानि समागतानि । भुम्मानि वा यानि'व अन्तळिक्खे ।
तथागतं देवमनुस्सपूजितं । संघं नमस्साम सुवत्थि होतू ति ॥ १७॥

रतनसुत्तं निट्ठितं ।

---

२३५. ज्यांचें जुनें कर्म क्षीण झालें आहे व नवें उत्पन्न होत नाहीं, जे भावी जन्माविषयीं निरपेक्ष, ते क्षीणबीज आणि उत्पत्तिच्छन्दविरहित धीर पुरुष ह्या प्रदीपाप्रमाणें निर्वाण पावतात. संघाचें ठायीं असलेलें हें उत्तम रत्न आहे. ह्या सत्यानें स्वस्ति होवो. ( १४ )

२३६. जीं भूमिगत किंवा अन्तरिक्षांतील भूतें जमलीं असतील ( त्यांना म्हणतों कीं, ) आम्ही देवमनुष्यपूजित तथागत बुद्धाला नमस्कार करूं; येणेंकरून स्वस्ति होवो. (१५)

२३७. जीं भूमिगत किंवा अन्तरिक्षांतील भूतें येथें जमलीं असतील ( त्यांना म्हणतों कीं ) देवमनुष्यपूजित तथागत धर्माला नमस्कार करूं; येणेंकरून स्वस्ति होवो. (१६)

२३८. जीं भूमिगत किंवा अन्तरिक्षांतील भूतें येथें जमलीं असतील, ( त्यांना म्हणतों कीं, ) देवमनुष्यपूजित तथागत संघाला नमस्कार करूं; येणेंकरून स्वस्ति होवो. ( १७ )

रतनसुत्त समाप्त

## १४

### [ २. आमगन्धसुत्त ]

२३९ सामाकचिंगूलकचीनकानि[1] । पत्तप्फलं मूलफलं गविप्फलं ।
धम्मेन लद्धं सतमस्समाना[3] । न कामकामा अलिकं भणन्ति ॥१॥

२४० यदस्नमानो[4] सुकतं सुनिट्ठितं । परेहि दिन्नं पयतं पणीतं ।
सालीनमन्नं परिभुञ्जमानो । सो भुञ्जसि[5] कस्सप आमगन्धं ॥२॥

१ रो० चिंगुलक, २ म० चीनकानि च, ३ रो०-सतमस्हमाना. सी०-सतमसमाना. ४ रो०, सी०-यदस्हमानो ५ रो० भुञ्जती, म० भुञ्जति

---

## १४

### [ २. आमगन्धसुत्त ]

२३९. ( तिष्य तापस— ) श्यामाक, चिंगूलक[1], चीनक झाडाचीं पानें, कन्दमूळ आणि फळें योग्य मार्गानें मिळवून त्याजवर निर्वाह करणारे कामानें प्रेरित होऊन खोटें बोलत नसतात ( १ )

२४० हे काश्यपा, परक्यांनीं दिलेलें निवडक व चांगल्या रीतीनें शिजविलेलें तांदुळाचें सुरस व उत्तम अन्न स्वीकारणारा तू आमगंध[2] ( अभेध्य पदार्थ ) खातोस । ( २ )

१ चिंगूलक = कण्हेराच्या फुलाच्या आकाराचें अरण्य धान्य चीनक = जंगली मूग

२ मूळ अर्थ—दुर्गंधी कच्चें मांस

२४१ न आमगन्धो मम कप्पती ति । इच्चेव त्वं भाससि ब्रह्मबन्धु[1] ।
सालीनमन्नं परिभुञ्जमानो । सकुन्तमंसेहि सुसङ्खतेहि ।
पुच्छामि तं कस्सप एतमत्थं । कथप्पकारो तव आमगन्धो ॥३॥

२४२ पाणातिपातो वध-छेद-बन्धनं । थेय्यं मुसावादो निकतिवञ्चनानि ।
अज्झेनकुत्तं[2] परदारसेवना । एसामगन्धो न हि मंसभोजनं ॥४॥

२४३ ये इध कामेसु असञ्ञता जना । रसेसु गिद्धा असुचीकमिस्सिता[3] ।
नत्थीकदिट्ठि[4] विसमा दुरन्नया । एसामगन्धो न हि मंसभोजनं ॥५॥

२४४ ये लूखसा दारुणा पिट्ठिमंसिका । मित्तद्दुनो निक्करुणातिमानिनो ।
अदानसीला न च देन्ति कस्सचि । एसामगन्धो न हि मंसभोजनं ६

१ सी० ब्रह्मबन्धु. २ सी० अञ्ञेनकुत्तं, म०—अज्झेनकुज्जं. ३ म०—असुचिभावमिस्सिता. ४ रो०,अ० नत्थिकदिट्ठि, म०—नत्थि कुदिट्ठि.

२४१ हे ब्रह्मबन्धु, पक्ष्यांच्या मासानें सुमिश्रित असें तांदुळाचें अन्न खात असता, तू 'आपणाला आमगंध योग्य नाहीं' असेंच म्हणतोस, तेव्हा हे काश्यपा, मी ही गोष्ट तुला विचारतों कीं, तुझा आमगंध कशा प्रकारचा आहे ? (३)

२४२ (काश्यप बुद्ध—) प्राणघात, वध, छेद, बन्धन, चोरी, खोटें भाषण, ठकविणें, नाडणें, जारणमारणादिकांचा अभ्यास आणि परस्त्रीगमन—हा आमगंध होय, मांसभोजन हा नव्हे (४)

२४३ ज्यांना स्त्रियांच्या बाबतींत संयम नाहीं, जे जिह्वालोलुप, अशुचि कर्ममिश्रित नास्तिक विषम आणि दुर्विनीत (अशांचें कर्म)—हा आमगंध होय, मांसभोजन हा नव्हे. (५)

२४४ जे रुक्ष, दारुण, पाठीमागें निंदा करणारे, मित्रद्रोही, निर्दय, अभिमानी, कृपण, कोणाला काहींही देत नाहींत (अशांचें कर्म)—हा आमगंध होय, मांसभोजन हा नव्हे (६)

२४५ कोधो मदो थम्भो पच्चुट्ठापना च। माया उसूया[1] भस्ससमुस्सयो च।
मानातिमानो च असब्भि सन्थवो। एसामगन्धो न हि मंसभोजनं ७
२४६ ये पापसीला इणघातसूचका। वोहारकूटा इध पाटिरूपिका।
नराधमा येऽध करोन्ति किब्बिसं। एसामगन्धो न हि मंसभोजनं ८
२४७ ये इध पाणेसु असञ्ञता जना। परेसमादाय विहेसमुय्युता।
दुस्सीललुद्दा फरुसा अनादरा। एसामगन्धो न हि न मंसभोजनं ९
२४८ एतेसु गिद्धा विरुद्धातिपातिनो। निच्चुय्युता पेच्च तमं वजन्ति ये।
पतन्ति सत्ता निरयं अवंसिरा। एसामगन्धो न हि मंसभोजनं १०

---

१ रो०, म०—उसुया.

---

२४५. क्रोध, मद, कठोरता, विरोध, माया, ईर्ष्या, वृथा बडबड, मानातिमान, आणि खलांची संगति—हा आमगंध होय; मांसभोजन हा नव्हे. (७)

२४६ जे पापी, ऋण बुडविणारे, सूचकशब्दांनीं कुचेष्टा करणारे, बाहेरून सभ्याचा आव आणणारे पण (लांच खाण्यासारखा) खोटा व्यवहार करणारे (अधिकारी), जे नराधम इहलोकीं किल्मिष उत्पन्न करतात, (अशांचें कर्म)—हा आमगन्ध होय; मांसभोजन हा नव्हे. (८)

२४७ ज्यांना प्राण्यांविषयीं दया नाहीं, जे इतरांना लुटून उपद्रव देतात, दुःशील, भेसूर, शिवीगाळ देणारे व अनादर करणारे, (अशांचें कर्म)—हा आमगन्ध होय, मांसभोजन हा नव्हे. (९)

२४८ अशा कर्मांत आसक्त झालेले, विरोध करणारे, घात करणारे, सदोदित अशा कर्मांत गुन्तलेले, जे परलोकीं अन्धकारात शिरतात व वर पाय खालीं डोकें होऊन नरकात पडतात, (अशांचें कर्म)—हा आमगन्ध होय; मांसभोजन हा नव्हे. (१०)

२४९ न मच्छमंसाननासकत्तं[1] ।
न नग्गियं ( मुण्डियं जटा ) जल्लं खराजिनानि वा ।
नाग्गिहुत्तस्सुपसेवना[2] वा । ये वाऽपि लोके अमरा बहू तपा ।
मन्ताहुती[3] यञ्ञमुतूपसेवना । सोधेन्ति मच्चं अवितिण्णकंखं ११
२५० सोतेसु गुत्तो विदितिन्द्रियो[4] चरे । धम्मे ठितो अज्जवमद्दवे रतो ।
संगातिगो सब्बदुक्खप्पहीनो । न लिप्पती[5] दिट्ठसुतेसु धीरो १२
२५१ इच्चेतमत्थं भगवा पुनप्पुन । अक्खासि तं[6] वेदयि मन्तपारगू ।
चित्राहि गाथाहि मुनिप्पकासयि । निरामगन्धो असितो दुरन्नयो १३

१ रो०—न मच्छमसं ननासकत्तं; सी०—न मच्छमंसं नानासकत्तं. २ म०—अग्गिहुत्तस्सुपसेवना. ३ म०—मन्ताहुति. ४ रो०—विजितिन्द्रियो. ५ म०—लिम्पति. ६ म०—नं

२४९ मत्स्यमांसाचा आहार वर्ज्य करणें, नागवेपणा, मुंडन, जटा, राख फासणें, खरखरीत अजिनचर्म, अग्निहोत्राची उपासना किंवा इहलोकींच्या अमरादि विविध तपश्चर्या, मन्त्राहुति, यज्ञ आणि शीतोष्णसेवनानें तप करणें—ह्या गोष्टी कुशंकांच्या पार न गेलेल्या मर्त्यांना पावन करूं शकत नाहींत. ( ११ )

२५०. इन्द्रियांना संयम ठेवून व इन्द्रियें जाणून वागणारा, धर्मस्थित, आर्जव व मार्दव यांत संतोष मानणारा, संगातीत व ज्याचें सर्व दुःख नाश पावलें असा जो धीर पुरुष तो 'दृष्टे' आणि 'श्रुतें' अशा संबंधींच्या (मिथ्या-) दृष्टीमध्यें बद्ध होत नाहीं.(१२)

२५१. हा अर्थ भगवन्तानें पुनःपुनः प्रकाशित केला आणि त्या मन्त्रपारगानें (ब्राह्मण तापसानें) तो जाणला. हा अर्थ त्या निरामगन्ध, अनासक्त आणि दुरन्वय अशा मुनीनें रम्य गाथांनीं प्रकाशित केला.(१३)

१ एकप्रकारचें तप. २ पुढें ७७८, ८१२-८१३ आदि गाथा पहा. ३ अट्ठकथाकाराच्या मतें अन्य सांप्रदायिकांकडून 'दुर्नेय.'

२५२ सुत्वान बुद्धस्स सुभासित पद । निरामगन्ध सब्बदुक्खप्पनूदन ।
नीचमनो वन्दि तथागतस्स । तत्थेव पब्बज्जमरोचयित्था ति ॥ १४

आमगन्धसुत्तं निट्ठितं ।

१५

## [ ३. हिरिसुत्तं ]

२५३ हिरिं तरन्त विजिगुच्छमानं । सखाऽहमस्मि इति भासमान ।
सय्हानि कम्मानि अनादियन्त । नेसो मम ति इति नं विजञ्ञा ॥ १ ॥
२५४ अनन्वय[1] पियं वाच यो मित्तेसु पकुब्बति ।
अकरोन्त भासमान परिजानन्ति पण्डिता ॥ २ ॥

१ म० अनत्थन्वय.

२५२ निरामगन्ध आणि सर्व दुःखाचा नाश करणारें असें बुद्धाचें सुभाषित वचन ऐकून तो ( ब्राह्मण ) नम्रपणें तथागताच्या पाया पडला आणि त्यानें तेथल्या तेथेंच प्रव्रज्या घेण्याची आपली उत्सुकता प्रकट केली. ( १४ )

आमगन्धसुत्त समाप्त

१५

## [ ३. हिरिसुत्त ]

२५३. निर्लज्ज, उबग आणणारा, ' मी तुझा मित्र आहे ' असें म्हणतो, पण मित्राचीं शक्य असलेलीं कर्तव्यें करीत नाहीं—असा माणूस आपला नव्हे असें समजावें. ( १ )

२५४. जो मित्राशीं गोड बोलतो पण त्याप्रमाणें वागत नाहीं, अशा बोलण्याप्रमाणें न वागणाऱ्याला सुज्ञ ओळखतात. ( २ )

२५५ न सो मित्तो यो सदा अप्पमत्तो। भेदासङ्की रंधमेवानुपस्सी।
यस्मिं च सेति उरसीव पुत्तो। स वे मित्तो यो परेहि अभेज्जो ॥ ३ ॥

२५६ पामुज्जकरणं ठानं पसंसावहनं सुखं।
फलानिसंसो भावेति वहन्तो पोरिसं धुरं ॥ ४ ॥

२५७ पविवेकरसं पीत्वा रसं उपसमस्स च।
निद्दरो होति निप्पापो धम्मपीतिरसं पिवं ति ॥ ५ ॥

हिरिसुत्तं निट्ठितं।

---

२५५. जो रन्ध्रच शोधीत असतो व मैत्री तुटेल या शंकेनें सावधानपणें वागतो, तो मित्र नव्हे. [१] आईच्या वक्षस्थलावर मुलगा जसा विश्वस्तपणें निजतो, तशा रीतीनें ज्याच्याशीं विश्वस्तपणानें वागता येतें असा, व परके ज्याला भेदूं शकत नाहींत असा जो, तोच खरा मित्र होय. ( ३ )

२५६. तो पुरुषास साजेल अशा तऱ्हेची धुरा वाहणारा, शुद्ध फळाच्या लाभासाठीं आनंददायक, प्रशंसावह व सुखकारक अशाच ( पराक्रमाची ) अभिवृद्धि करतो. ( ४ )

२५७ तो एकान्तवासरसाचा आणि शान्तिरसाचा आस्वाद घेऊन धर्मप्रीतिरस पिणारा निर्भय आणि निष्पाप होतो. ( ५ )

हिरिसुत्तं समाप्त

---

१ या सुत्ताच्या पांच गाथा निरनिराळ्या चार प्रश्नांच्या उत्तरादाखल आहेत, असें टीकाकाराचें म्हणणें; पण त्या खोट्या आणि खऱ्या मित्रासंबंधीच असाव्यात असें वाटतें व तसाच अर्थ धरून त्यांचें भाषांतर केलें आहे.

## १६

## [ ४. महामंगलसुत्तं ]

एवं मे सुतं। एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे। अथ खो अञ्ञतरा देवता अभिक्कन्ताय रत्तिया अभिक्कन्तवण्णा केवलकप्पं जेतवनं ओभासेत्वा येन भगवा तेनुपसङ्कमि, उपसङ्कमित्वा भगवन्तं अभिवादेत्वा एकमन्तं अट्ठासि। एकमन्तं ठिता खो सा देवता भगवन्तं गाथाय अज्झभासि—

२५८ बहू देवा मनुस्सा च मंगलानि अचिन्तयुं।
आकङ्खमाना सोत्थानं ब्रूहि मंगलमुत्तमं ॥ १ ॥

२५९ असेवना च बालानं पण्डितानं च सेवना।
पूजा च पूजनीयानं एतं मंगलमुत्तमं ॥ २ ॥

---

## १६

## [ ४. महामंगलसुत्त ]

असें मी ऐकलें आहे एके समयीं भगवान् श्रावस्ती येथें जेतवनात अनाथपिंडिकाच्या आरामात राहत होता. तेव्हां रात्र सपत आली असतां एक अत्यंत सुन्दर देवता सर्व जेतवन प्रकाशित करून भगवन्तापाशीं आली येऊन भगवन्ताला नमस्कार करून एका बाजूला उभी राहिली. एका बाजूस उभी राहून ती देवता भगवन्ताला गाथेनें बोलली :—

२५८. अनेक देवांनीं आणि मनुष्यांनीं ' आपणास सुख मिळावें ' या उद्देशानें मंगलाची कल्पना अमलात आणली आहे. त्यांत उत्तम मंगल कोणतें तें सांग. ( १ )

२५९. (भगवान्—) मूर्खांच्या सहवासापासून दूर राहणें, सुज्ञांची संगति धरणें व पूज्य जनांची पूजा करणें, हें उत्तम मंगल होय. (२)

२६० पतिरूपदेसवासो च पुब्बे च कतपुञ्ञता[1]
अत्तसम्मापणिधि च एतं मंगलमुत्तमं ॥ ३ ॥
२६१ बाहुसच्चं च सिप्पं च विनयो च सुसिक्खितो ।
सुभासिता च या वाचा एतं मंगलमुत्तमं ॥ ४ ॥
२६२ मातापितु-उपट्ठानं पुत्तदारस्स सगहो ।
अनाकुला च कम्मन्ता एतं मंगलमुत्तमं ॥ ५ ॥
२६३ दानं च धम्मचरिया च ञातकानं च सगहो ।
अनवज्जानि कम्मानि एतं मंगलमुत्तमं ॥ ६ ॥
२६४ आरति विरति पापा मज्जपाना च सयमो ।
अप्पमादो च धम्मेसु एतं मंगलमुत्तमं ॥ ७ ॥
२६५ गारवो च निवातो च सन्तुट्ठि च कतञ्ञुता ।
कालेन धम्मसवणं एतं मंगलमुत्तमं ॥ ८ ॥

१ रो०—सतुट्ठी

२६० अनुकूल प्रदेशांत वास्तव्य, पदरीं पुण्याचा साठा आणि सन्मार्गांत मनाला गुतवणें, हें उत्तम मंगल होय (३)

२६१ विद्यासंपादन, कलासंपादन, सद्वर्तनाची सवय व चांगलें भाषण, हें उत्तम मंगल होय (४)

२६२ आईबापाची सेवा, बायकोमुलांचा संभाळ आणि व्यवस्थितपणें केलेलीं कर्में, हें उत्तम मंगल होय (५)

२६३ दान-धर्म, धार्मिक आचरण, नातलगांना मदत व प्रशस्त कर्में, हें उत्तम मंगल होय, (६)

२६४ पापापासून पूर्ण निवृत्ति, मद्यपानापासून संयम, आणि धार्मिक कृत्यांत दक्षता, हें उत्तम मंगल होय, (७)

२६५ आदर, नम्रता, सन्तुष्टि, कृतज्ञता आणि वेळोंवेळीं सद्धर्मश्रवण करणें, हें उत्तम मंगल होय (८)

२६६ खन्ति च सोवचस्सता समणान च दस्सन ।
कालेन धम्मसाकच्छा एतं मंगलमुत्तमं ॥ ९ ॥
२६७ तपो च ब्रह्मचरियं च अरियसच्चान दस्सन ।
निब्बाणसच्छिकिरिया च एत मंगलमुत्तमं ॥१० ॥
२६८ फुट्ठस्स लोकधम्मेहि चित्त यस्स न कम्पति ।
असोकं विरजं खेमं एत मगलमुत्तमं ॥ ११ ॥
२६९ एतादिसानि कत्वान सब्बत्थमपराजिता ।
सब्बत्थ सोत्थिं गच्छन्ति तं तेसं मंगलमुत्तमं ति ॥ १२ ॥

महामंगलसुत्तं निट्ठितं ।

१ रो०–खन्ती. २ सी०, रो०–ब्रह्मचरिया.

२६६. क्षान्ति, गोड भाषण, श्रमणाचें दर्शन, व वेळोवेळीं धर्मचर्चा, हें उत्तम मगल होय. ( ९ )

२६७ तप, ब्रह्मचर्य, आर्यसत्याचें ज्ञान, आणि निर्वाणाचा साक्षात्कार, हें उत्तम मगल होय. (१०)

२६८. लोकस्वभावांशीं[1] प्रसग असतां ज्याचें चित्त अस्थिर होत नाहीं, पण शोकरहित, निर्मळ व सुखरूप राहतें, हें (त्याचें) उत्तम मंगल होय. (११)

२६९. असा मंगलाचें आचरण करून कोठेंही पराभव न पावतां जे स्वस्तिसुख मिळवतात, तें त्यांचें उत्तम मगल होय. (१२)

महामंगलसुत्त समाप्त

१ लाभ आणि हानि, यश आणि अपयश, निंदा आणि स्तुति, सुख आणि दुःख, हे आठ लोकस्वभाव ( लोकधर्म ) जाणावेत.

## १७

## [५. सूचिलोमसुत्तं]

एवं मे सुतं। एकं समयं भगवा गयायं विहरति टङ्कितमञ्चे सूचिलोमस्स यक्खस्स भवने। तेन खो पन समयेन खरो च यक्खो सूचिलोमो च यक्खो भगवतो अविदूरे अतिक्कमन्ति। अथ खो खरो यक्खो सूचिलोमं यक्खं एतदवोच—एसो समणो'ति। नेसो समणो, समणको एसो; याव जानामि यदि वा सो समणो, यदि वा समणको'ति। अथ खो सूचिलोमो यक्खो येन भगवा तेनुपसङ्कमि उपसङ्कमित्वा भगवतो कायं उपनामेसि। अथ खो भगवा कायं अपनामेसि। अथ खो सूचिलोमो यक्खो भगवन्तं एतदवोच—भायसि मं समणा'ति। न ख्वाहं तं आवुसो भायामि, अपि च ते सम्फस्सो पापको'ति। पञ्हं तं समण पुच्छिस्सामि,

---

## १७

## [५. सूचिलोमसुत्त]

असें मी ऐकलें आहे. एके समयीं भगवान् गया येथें टङ्कित-मञ्चकावर सूचिलोम यक्षाच्या भवनात राहत होता. त्या वेळीं खर यक्ष व सूचिलोम यक्ष भगवन्तापासून थोड्या अंतरावर फिरत होते. तेव्हा खर यक्ष सूचिलोम यक्षास म्हणाला, "हा श्रमण आहे" "हा श्रमण नव्हे, हा श्रमणक आहे. हा श्रमण आहे कीं श्रमणक आहे हें मी पाहतों," असें म्हणून सूचिलोम यक्ष भगवन्तापाशीं गेला, व जवळ जाऊन आपल्या शरिरानें भगवन्ताला धक्का देण्याचा प्रयत्न करूं लागला. तेव्हा भगवान् त्याच्यापासून दूर झाला. त्यावर सूचिलोम यक्ष भगवन्ताला म्हणाला "श्रमणा, मला भितोस काय?"

सचे मे न ब्याकरिस्ससि, चित्तं वा ते खिपिस्सामि, हदयं वा ते फालेस्सामि, पादेसु वा गहेत्वा पारगङ्गाय खिपिस्सामी ति । न ख्वाहं तं आवुसो पस्सामि सदेवके लोके समारके सब्रह्मके सस्समणब्राह्मणिया पजाय सदेवमनुस्साय यो मे चित्तं वा खिपेय्य, हदयं वा फालेय्य, पादेसु वा गहेत्वा पारगङ्गाय खिपेय्य । अपि च त्वं आवुसो पुच्छ यदाकङ्खसी ति । अथ खो सूचिलोमो यक्खो भगवन्तं गाथाय अज्झभासि—

२७० रागो च दोसो च कुतोनिदाना । अरती रती लोमहंसो कुतोजा ।
कुतो समुट्ठाय मनोवितक्का । कुमारका धङ्कमिवोस्सजन्ति ॥१॥[1]

---

"आयुष्मन्, मी तुला भीत नाहीं, पण तुझा सपर्क अपवित्र आहे." "श्रमणा, मी तुला प्रश्न विचारतों, त्याचें जर तू बरोबर उत्तर दिलें नाहींस, तर तुला मी वेड लावीन, किंवा तुझें हृदय फाडीन, अथवा तुझ्या पायाला धरून तुला गंगेच्या पार फेकीन." "आयुष्मन्, या सदेवक, सब्रह्मक, समारक लोकीं श्रमणब्राह्मणांत अथवा देव-मनुष्यांत असा कोणी मला दिसत नाहीं की, जो मला वेड लावील किंवा माझें हृदय फाडील, अथवा माझ्या पायाला धरून मला गंगेच्या पार फेकील. तथापि, आयुष्मन् तुझ्या इच्छेप्रमाणें प्रश्न विचार. तेव्हां सूचिलोम यक्ष भगवन्ताला गाथेनें म्हणाला—

२७०. काम आणि क्रोध कोठून उत्पन्न होतात ? अरति, रति आणि रोमहर्ष ( भय ) कोठून होतात ? कोठून उत्पन्न होऊन हे वितर्क, द्वाड मुलगे जसे कावळ्याला ( दोरीला बांधून ) उडवितात, तसें मनाला उडवितात ? ( १ )

---

१ रो०–धंक.

२७१ रागो च दोसो च इतो निदाना। अरती रती लोमहंसो इतोजा।
इतो समुट्ठाय मनोवितक्का। कुमारका धङ्कमिवोस्सजन्ति ॥ २ ॥
२७२ स्नेहजा अत्तसम्भूता निग्रोधस्सेव खन्धजा।
पुथु विसत्ता कामेसु मालुवा वितता वने ॥ ३ ॥
२७३ ये नं पजानन्ति यतो निदानं ते नं विनोदेन्ति सुणोहि यक्ख।
ते दुत्तरं ओघमिमं तरन्ति। अतिण्णपुब्बं अपुनब्भवाया ति ॥ ४ ॥

सूचिलोमसुत्तं निट्ठितं।

---

२७१ काम आणि क्रोध येथून होतात, अरति आणि रति आणि रोमहर्ष येथून होतात. हे वितर्क येथून उत्पन्न होऊन, द्वाड मुलें कावळ्याला (दोरीला बांधून) उडवितात, तसें मनाला उडवितात (२)

२७२ ते स्नेहापासून होतात, वडाच्या पारंब्याप्रमाणें आपल्याच अन्तःकरणांत उत्पन्न होऊन मालुवा-लतेप्रमाणें[1] उपभोग्य वस्तूंमध्यें पसरतात (३)

२७३ हे यक्षा, माझें ऐक. येथून हे (वितर्क) उत्पन्न होतात, हें जे जाणतात ते त्याचा त्याग करतात व हा दुस्तर अतीर्णपूर्व ओघ तरून पुनर्जन्म घेत नाहींत. (४)

सूचिलोमसुत्त समाप्त

---

१ मालुवा-लता हिमालयाच्या अरण्यांत होते. ती ज्या वृक्षावर चढते त्यावर पसरून त्याचा समूळ नाश करते.

१८

## [ ६. धम्मचरियसुत्तं ]

२७४ धम्मचरियं ब्रह्मचरियं एतदाहु वसुत्तमं ।
पब्बजितोऽपि चे होति अगारस्माऽनगारियं ॥ १ ॥
२७५ सो चे मुखरजातिको विहेसाऽभिरतो मगो ।
जीवितं तस्स पापियो रजं वड्ढेति अत्तनो ॥ २ ॥
२७६ कलहाभिरतो भिक्खु मोहधम्मेन आवुटो ।
अक्खातऽपि न जानाति धम्मं बुद्धेन देसितं ॥ ३ ॥
२७७ विहेसं भावितऽत्तानं अविज्जाय पुरक्खतो ।
संकिलेसं न जानाति मग्गं निरयगामिनं ॥ ४ ॥

१ म०–अगाराऽनगारियं. २ म०-आवुतो.

१८

## [ ६. धम्मचरियसुत्त ]

२७४. धर्मचर्या आणि ब्रह्मचर्य हें उत्तम धन होय. गृहत्याग करून अनागारिक परिव्राजक झाला तरी, ( १ )

२७५. तो जर वाचाळ इतरांना त्रास देण्यांत सुख मानणारा, व जनावरासारखा वागणारा असला, तर त्याचें जीवन हीन होय; तो स्वतःचा मळ वाढवितो. ( २ )

२७६ कलहाभिरत व मोहानें परिवेष्टित असा भिक्षु, बुद्धानें उपदेशिलेल्या धर्माचें स्पष्टीकरण केलें असताही, तें जाणत नाहीं. (३)

२७७. भावितात्म्याला (अरहन्ताला) त्रास देणारा, अविद्येनें पछाडलेला (भिक्षु) हा नरकगामी संक्लिष्ट मार्ग आहे हें जाणत नाहीं. ( ४ )

२७८ विनिपातं समापन्नो गब्भा गब्भं तमा तमं ।
स वे तादिसको भिक्खु पेच्च दुक्खं निगच्छति ॥ ५ ॥
२७९ गूथकूपो यथा अस्स सम्पुण्णो गणवस्सिको ।
[1]यो एवरूपो अस्स दुब्बिसोधो हि स[2]ङ्गणो ॥ ६ ॥
२८० यं एवरूपं जानाथ भिक्खवो गेहनिस्सितं ।
पापिच्छं पापसङ्कप्पं पापआचारगोचरं ॥ ७ ॥
२८१ सब्बे समग्गा हुत्वान अभिनिब्बिज्जे[3] याथ नं ।
कारण्डवं निद्धमथ कसम्बुं अपकस्सथ[4] ॥ ८ ॥
२८२ ततो पलापे वाहेथ अस्समणे समणमानिने ।
निद्धमित्वान पापिच्छे पापआचारगोचरे ॥ ९ ॥

---

१ सी०, म०-यो च. २ म० अगणो ३-३ म०-अभिनिब्बजियाथ, रो०-अभिनिब्बिजयाथ, अ०-अभिनिब्बिजियाथ. ४ म०-अपकस्सथ.

---

२७८ तो अशा तऱ्हेचा अधोगतीला गेलेला भिक्षु, गर्भशय्येपासून गर्भशय्येला व तमापासून तमाला जाऊन, परलोकीं दुःख भोगतो. ( ५ )

२७९. जसा अनेक वर्षांचा भरलेला शौचकूप, तशाप्रमाणें जो दुर्गंधी आहे, अशा पापी पुरुषाची शुद्धि होणें मोठें कठीण. ( ६ )

२८०. भिक्षूनो, असा गृहासक्त, पापेच्छ, पाप-संकल्पी आणि पापी आचारगोचर असलेला तुम्हास आढळला, ( ७ )

२८१ तर सगळे एकवटून त्याच्यावर बहिष्कार घाला, तो कचरा फेकून टाका; तो सडलेला भाग काढून काढा ( ८ )

२८२. तदनतर श्रमण नसून स्वतःला श्रमण मानणारे अशा फोल भिक्षूना बाहेर काढा. तशा पापेच्छ व पापी आचारगोचर असलेल्याना घालवून देऊन, ( ९ )

एतदवोचु—संदिस्सन्ति नु खो भो गोतम एतरहि ब्राह्मणा पोराणानं ब्राह्मणानं ब्राह्मणधम्मे ति । न खो ब्राह्मणा सन्दिस्सन्ति एतरहि ब्राह्मणा पोराणानं ब्राह्मणानं ब्राह्मणधम्मे ति । साधु नो भवं गोतमो पोराणानं ब्राह्मणानं ब्राह्मणधम्मं भासतु, सचे भोतो गोतमस्स अगरू[1] ति । तेन हि ब्राह्मणा सुणाथ, साधुकं मनसिकरोथ, भासिस्सामी ति । एवं भो ति खो ते ब्राह्मणमहासाला भगवतो पच्चस्सोसुं । भगवा एतदवोच—

२८४ इसयो पुब्बका आसु सञ्ञतत्ता तपस्सिनो ।
पञ्च कामगुणे हित्वा अत्तदत्थमचारिसुं[1] ॥ १ ॥
२८५ न पसू ब्राह्मणानासुं न हिरञ्ञं न धानियं ।
सज्झायधनधञ्ञा'सु ब्रह्म निधिमपालयुं ॥ २ ॥

१ म०-अत्तदत्थमचारयुं. सी०-अत्तदत्थमकारिसुं.

कुलीन ब्राह्मण भगवन्ताला म्हणाले कीं, "भो गोतमा, आजकालचे ब्राह्मण जुन्या ब्राह्मणाच्या ब्राह्मणधर्माप्रमाणें चालणारे असे दिसून येतात काय?" "ब्राह्मणांनो, आजकालचे ब्राह्मण जुन्या ब्राह्मणांच्या ब्राह्मणधर्माप्रमाणें चालणारे दिसत नाहींत." "जर भगवान् गोतमाला जड वाटत नसेल, तर भगवान् गोतम आम्हांला जुना ब्राह्मणधर्म कोणता ते सांगो." "असें आहे तर, हे ब्राह्मणांनो, ऐका व लक्ष द्या; मी सांगतों." "ठीक आहे." असें त्या कुलीन ब्राह्मणांनीं भगवन्ताला उत्तर दिलें. भगवान् म्हणालाः—

२८४. प्राचीन ऋषी संयतात्मा आणि तपस्वी होते. ते पञ्चेन्द्रियांच्या विषयांचा त्याग करून आत्मार्थचिन्तन करीत असत. (१)

२८५. त्यां ब्राह्मणांपाशीं पशू नव्हते, धन नव्हतें, धान्य नव्हतें. स्वाध्याय हेंच त्यांचें धनधान्य होतें व ते ब्राह्मनिधीचें पालन करीत. (२)

१ अ-गरु— अडचणीचें वाटत नसेल, किंवा संकट वाटत नसेल.

२८६ य नेसं पकत आसि द्वारभत्त उपट्ठित ।
सद्धापकतमेसान दातवे तदमञ्ञिसु ॥ ३ ॥

२८७ नानारत्तेहि वत्थेहि सयनेहावसथेहि च ।
फीता जनपदा रट्ठा ते नमस्सिसु ब्राह्मणे ॥ ४ ॥

२८८ अवज्झा ब्राह्मणा आसु अजेय्या धम्मरक्खिता ।
न ते कोचि निवारेसि कुलद्वारेसु सब्बसो ॥ ५ ॥

२८९ अट्ठचत्तारीस[1] वस्सानि ( कोमार– ) ब्रह्मचरिय चरिंसु ते ।
विज्जाचरणपरियेट्ठिं अचरु ब्राह्मणा पुरे ॥ ६ ॥

२९० न ब्राह्मणा अञ्ञमगमु नऽपि भरिय किणिसु ते ।
सम्पियेनेव सवास सगन्त्वा समरोचयु ॥ ७ ॥

१ म०-अट्ठचत्ताळीस वस्सानि.

२८६. लोक त्यांच्यासाठीं श्रद्धापूर्वक भोजन तयार करून दारात तयार ठेवीत व ते त्याना देणें योग्य समजत. ( ३ )

२८७. निरनिराळ्या रंगाच्या वस्त्रानी, बिछाइतींनी आणि इमारतींनी सपन्न असे प्रदेश आणि राष्ट्रे अशा ब्राह्मणाना पूजीत असत. ( ४ )

२८८. ते ब्राह्मण अवध्य असत, व धर्मरक्षित असल्याकारणानें अजिंक्य होते कोणत्याही कुटुंबात त्याना बिल्कुल मज्जाव नसे. ( ५ )

२८९. ते प्राचीन ब्राह्मण अट्ठेचाळीस वर्षे कौमार-ब्रह्मचर्य पाळीत असत, आणि प्रज्ञा व शील सपादन करीत. ( ६ )

२९०. ते ब्राह्मण परदारगमन करीत नसत किंवा बायको विकत घेत नसत खऱ्या प्रेमानें घडलेला स्त्री-सहवासच त्याना मान्य असे. ( ७ )

२९१ अञ्ञत्र तम्हा समया उतुवेरमणिं पति ।
अन्तरा मेथुनं धम्मं नास्सु गच्छन्ति ब्राह्मणा ॥ ८ ॥

२९२ ब्रह्मचरियं च सीलं च अज्जवं मद्दवं तपं ।
सोरच्चं अविहिंसं च खन्तिं चापि अवण्णयुं ॥ ९ ॥

२९३ यो नेसं परमो आसि ब्रह्मा दळ्हपरक्कमो ।
स वापि मेथुनं धम्मं सुपिनन्तेन नागमा ॥ १० ॥

२९४ तस्सवत्तमनुसिक्खन्ता इधेके विञ्ञुजातिका ।
ब्रह्मचरियं च सीलं च खन्तिं चापि अवण्णयुं ॥ ११ ॥

२९५ तण्डुलं सयनं वत्थं सप्पितेलं च याचिय ।
धम्मेन समुदानेत्वा ततो यञ्ञमकप्पयुं ।
उपट्ठितस्मिं यञ्ञस्मिं नास्सु गावो हनिंसु ते ॥ १२ ॥

२ म० सोरज्जं ३ सी० चापि ४ म०, अ० समाधानेत्वा

२९१ ऋतुकालाशिवाय अन्य समयीं, मध्येंच, ते ब्राह्मण स्त्रीसंग करीत नसत (८)

२९२ ब्रह्मचर्य, शील, आर्जव, मार्दव, तप, समाधान, अहिंसा आणि क्षान्ति याची ते स्तुति करीत (९)

२९३ ब्रह्मा म्हणून जो त्याचा दृढपराक्रमी पुढारी होता, त्यानें स्वप्नांत देखील स्त्रीसंग केला नाहीं (१०)

२९४ त्याचें व्रत पालन करणारे कांहीं सुज्ञ (ब्राह्मण) हल्लींहि ब्रह्मचर्य, शील व क्षान्ति याची स्तुति करतात (११)

२९५. ते (प्राचीन ब्राह्मण) तांदूळ, बिछाईत, वस्त्र, तूप, तेल हे पदार्थ मागून घेऊन व न्याय्य मार्गानें गोळा करून यज्ञ करीत असत आणि यज्ञ चालू झाला असतांना त्या यज्ञांत ते गाई मारीत नसत (१२)

२९६ यथा माता पिता भाता अञ्ञे वाऽपि च ञातका ।
गावो नो परमा मित्ता यासु जायन्ति ओसधा ॥१३॥
२९७ अन्नदा बलदा चेता वण्णदा सुखदा तथा ।
एतमत्थवसं ञत्वा नास्सु गावो हनिंसु ते ॥१४॥
२९८ सुखुमाला महाकाया वण्णवन्तो यसस्सिनो ।
ब्राह्मणा सेहि धम्मेहि किच्चाकिच्चेसु उस्सुका ।
याव लोके अवत्तिंसु सुखमेधित्थऽयं पजा ॥१५॥
२९९ तेस आसि विपल्लासो दिस्वान अणुतो अणुं ।
राजिनो च वियाकारं नारियो समलङ्कता ॥१६॥
३०० रथे चाजञ्ञसंयुत्ते सुकते चित्तसिब्बने ।
निवेसने निवेसे च विभत्ते भागसो मिते ॥१७॥

---

२९६. जसे आईबाप, भाऊ किंवा इतर सगेसोयरे, तशा गाई आम्च्या परम मित्र होत! कारण (पंच गोरसादि) औषधें त्यांच्यापासूनच उत्पन्न होतात. (१३)

२९७ त्या अन्न देणाऱ्या, बल देणाऱ्या, कान्ति देणाऱ्या, आणि सुख देणाऱ्या आहेत; हें तत्त्व जाणून ते (प्राचीन ब्राह्मण) गाई मारीत नसत. (१५)

२९८. सुकुमार, उंच बांध्याचे, तेजस्वी आणि यशस्वी असे ते ब्राह्मण स्वकीय धर्मानुसार कृत्याकृत्याविषयीं दक्ष राहत असत, व जोंपर्यंत ते तसे होते तोंपर्यंत लोक सुखी झाले. (१५)

२९९. परन्तु राजाची संपत्ति आणि अलंकृत स्त्रिया—अशा-सारख्या अत्यंत क्षुद्र गोष्टी पाहून त्यांची बुद्धि पालटली. (१६)

३००. उत्तम घोडे जोडलेले व उत्तम रीतीनें तयार केलेले व आच्छादन घातलेले रथ, नीट रीतीनें विभाग पाडून बांधलेलीं घरें व इमारती, (१७)

३०१ गोमण्डलपरिब्बूळ्हं नारीवरगणायुत ।
उळार मानुसं भोग अभिज्झायिंसु ब्राह्मणा ॥१८॥

३०२ ते तत्थ मन्ते गन्थेत्वा ओक्काक तदुपागमु ।
पहूतधनधञ्ञोऽसि ( यजस्सु बहु ते वित्त ) यजस्सु
बहु ते धन ॥१९॥

३०३ ततो च राजा सञ्ञत्तो ब्राह्मणेहि रथेसभो ।
अस्समेध पुरिसमेधं ( सम्मापास ) वाजपेय्य निरग्गळ ।
एते यागे यजित्वान ब्राह्मणान अदा धन ॥२०॥

३०४ गावो सयन च वत्थ च नारियो समलङ्कता ।
रथे चाजञ्ञसयुत्ते सुकते चित्तसिब्बने ॥२१॥

१ रो०-वाचपेय्य २ रो० नारियो च.

३०१. गाईंचीं खिल्लारें आणि सुन्दर स्त्रियांचे समुदाय, अशा समृद्ध मानवी उपभोगाचा ब्राह्मणांना लोभ सुटला ( १८ )

३०२ तेव्हा त्यासाठी मन्त्र रचून ते इक्ष्वाकूपाशीं गेले आणि म्हणाले, "तुजपाशीं पुष्कळ धनधान्य आहे, तू यज्ञ कर, तुझ्याजवळ संपत्ति फार आहे, तू यज्ञ कर " ( १९ )

३०३ अशी ब्राम्हणांनीं समजूत घातली तेव्हा त्या रथर्षभ राजानें अश्वमेध, पुरुषमेध, शम्या प्रास (ज्यात शम्या फेकली जाते), वाजपेय आणि निरर्गड असे यज्ञ करून ब्राह्मणांना धन दिलें ( २० )

३०४ गाई, बिछाईत, वस्त्र आणि अलंकृत स्त्रिया, उत्तम घोडे जोडलेले आणि उत्तम रीतीनें तयार केलेले व आच्छादन घातलेले रथ, ( २१ )

१ सविस्तर स्पष्टीकरणार्थ Poona Uni Journal I 78 88 (1953) & B O R I Annals XXXII (1951) 53 55 पहा

३०५ निवेसनानि रम्मानि सुविभत्तानि भागसो ।
नानाधञ्ञस्स पूरेत्वा ब्राह्मणानं अदा धनं ॥२२॥

३०६ ते च तत्थ धनं लद्धा सन्निधिं समरोचयुं ।
तेसं इच्छाऽवतिण्णानं भिय्यो तण्हा पवड्ढथ ।
ते तत्थ मन्ते गन्थेत्वा ओक्काकं पुनमुपागमुं[1] ॥२३॥

३०७ यथा आपो च पठवी हिरञ्ञं धनधानियं ।
एवं गावो मनुस्सानं परिक्खारो सो हि पाणिनं ।
यजस्सु बहु ते वित्तं यजस्सु बहु ते धनं ॥२४॥

३०८ ततो च राजा सञ्ञत्तो ब्राह्मणेहि रथेसभो ।
नेकसतसहस्सियो[2] गावो यञ्ञे अघातयि ॥ २५ ॥

१ सी०-पुनुपागमुं. २ रो०—नेका सतसहस्सियो; म०—अनेक-सतसहस्सियो.

३०५. आणि नीट रीतीनें बांधलेलीं रम्य घरें, अनेक धान्यांनीं भरलीं व हीं व (इतर) संपत्ति त्यानें ब्राह्मणांना दिली. (२२)

३०६. त्या यज्ञांत धनसंपत्ति मिळवून ब्राह्मण तिचा संचय करते झाले. अशा रीतीनें आशाळभूत झालेल्यांची तृष्णा आणखीही वाढली. त्यासाठीं पुनरपि मन्त्र रचून ते इक्ष्वाकूपाशीं गेले, (२३)

३०७. आणि म्हणाले, "जसें पाणी, जमीन, हिरण्य किंवा धनधान्य, तशाच गाई मनुष्यप्राण्यांच्या उपभोग्य वस्तु होत. तुजपाशीं पुष्कळ वित्त आहे, तू यज्ञ कर, तुजपाशीं पुष्कळ धन आहे, यज्ञ कर!" (२४)

३०८. अशी त्या ब्राह्मणांनीं समजूत घातली; तेव्हां त्या रथर्षभ राजानें यज्ञांत अनेक लक्ष गाई मारल्या. (२५)

३०९ न पादा न विसाणेन नास्सु हिंसन्ति केन चि ।
गावो एळकसमाना सोरता कुम्भदूहना ।
ता विसाणे गहेत्वान राजा सत्थेन घातयि ॥ २६ ॥
३१० ततो च देवा पितरो इन्दो असुररक्खसा ।
अधम्मो इति पक्कन्दु यं सत्थं निपती गवे ॥ २७ ॥
३११ तयो रोगा पुरे आसुं इच्छा अनसनं जरा ।
पसूनं च समारम्भा अट्ठानवुतिमागमुं ॥ २८ ॥
३१२ एसो अधम्मो दण्डानं ओक्कन्तो पुराणो अहु ।
अदूसिकायो हञ्ञन्ति धम्मा धंसेन्ति[1] याजका ॥ २९ ॥
३१३ एवमेसो अणुधम्मो पोराणो विञ्ञुगरहितो ।
यत्थ एदिसकं पस्सति याजकं गरहती जनो ॥ ३० ॥

---

१ म०, अ० ( रो० )-'धंसन्ति', चवन्ति, परिहायन्ति.

---

३०९. पायानें, शिंगानें किंवा दुसऱ्या कोणत्याही अवयवानें त्या गाई हिंसा करीत नव्हत्या ज्या मेंढरासारख्या शान्त असून घडाभर दूध देत, अशा त्या गाई शिंगाला धरून राजानें शस्त्रानें मारल्या. ( २६ )

३१०. तेव्हा देव, पितर, इन्द्र, असुर आणि राक्षस, 'गाईवर शस्त्र पडलें, हा मोठा अधर्म झाला' असें म्हणून हाहाकार करूं लागले. (२७)

३११. त्यापूर्वी इच्छा, भूक आणि जरा हे तीनच रोग होते, पशुघाताला सुरवात झाल्यावर ते अठ्याण्णव झाले. ( २८ )

३१२. दंडामध्यें हा एक जुना अधर्म उत्पन्न झाला, ज्यायोगें याजक निर्दोषी गाईंना मारतात व धर्मापासून च्युत होतात. ( २९ )

३१३. याप्रमाणें ही हीन पुरातन चाल सुज्ञानीं निन्दिली आहे, आणि म्हणूनच असला याजक दिसला असता लोक त्याची निंदा करतात.(३०)

३१४ एव धम्मे वियापन्ने विभिन्ना सुद्दवेस्सिका।
पुथु विभिन्ना खत्तिया पतिं भरिया अवमञ्ञथ ॥ ३१ ॥

३१५ खत्तिया ब्रह्मबन्धू च ये चऽञ्ञे गोत्तरक्खिता।
जातिवादं निरंकत्वा कामानं वसमागमुं'ति ॥ ३२ ॥

एव वुत्ते ते ब्राह्मणमहासाला भगवन्तं एतदवोचुं—अभिक्कन्तं भो गोतम....पे०....धम्मो पकासितो, एते मयं भवन्तं गोतम सरणं गच्छाम, धम्मं च भिक्खुसंघं च। उपासके नो भवं गोतमो धारेतु अज्जतग्गे पाणुपेते सरणं गते'ति।

ब्राह्मणधम्मिकसुत्तं निट्ठितं।

---

३१४. याप्रमाणें धर्म विपन्नावस्थेला गेला असता शूद्र आणि वैश्य निराळे पडले, क्षत्रियांत पुष्कळ भेद झाले आणि पतीला पत्नी मानेनाशी झाली. ( ३१ )

३१५. क्षत्रिय, ब्राह्मण व चांगल्या गोत्रांतील इतर लोक जाति ( जन्म ) प्रवादांस सोडून चैनीला वश झाले. ( ३२ )

असें म्हटल्यावर ते कुलीन ब्राह्मण भगवन्ताला म्हणाले, " धन्य ! धन्य ! भो गोतमा.... इत्यादिक ( कसिभारद्वाजसुत्ताच्या शेवटीं ).... ते आम्ही भगवान् गोतमाला शरण जातों, धर्माला शरण जातों आणि भिक्षुसंघाला शरण जातों. आजपासून आमरण शरण गेलेले आम्ही उपासक आहोंत असें भवान् गोतमानें समजावें. "

ब्राह्मणधम्मिकसुत्त समाप्त

२०

## [ ८. नावासुत्त ]

३१६ यस्मा हि धम्मं पुरिसो विजञ्ञा । इन्दं व नं देवता पूजयेय्य ।
सो पूजितो तस्मिं पसन्नचित्तो । बहुस्सुतो पातुकरोति धम्मं ॥१॥

३१७ तदट्ठिकत्वान निसम्म धीरो । धम्मानुधम्मं पटिपज्जमानो ।
विञ्ञू विभावी निपुणो च होति । यो तादिसं भजति अप्पमत्तो ॥२॥

३१८ खुद्दं च बालं उपसेवमानो । अनागतऽत्थं च उसूयकं च ।
इधेव धम्मं अविभावयित्वा । अवितिण्णकङ्खो मरणं उपेति ॥३॥

---

२०

## [ ८. नावासुत्त ]

३१६ ज्याच्यापासून आपण धर्म शिकतों त्याची मनुष्यानें, देव जशी इन्द्राची पूजा करतात, तशी पूजा करावी तशी पूजा केली असता त्या मनुष्यावर प्रसन्न होऊन तो बहुश्रुत ( पुरुष ) धर्म प्रकाशित करतो ( २ )

३१७ जो बुद्धिमान् सावधपणें तशा पुरुषाची उपासना करतो, तो त्यानें उपदेशिलेला धर्म श्रद्धायुक्त ( अन्तःकरणानें ) ऐकून व त्याप्रमाणें चालून सुज्ञ, प्रभावशाली आणि निपुण होतो ( २ )

३१८ पण क्षुद्र, मूर्ख, अनभिज्ञ, आणि ईर्षाळू अशाची उपासना करणारा, येथें धर्मज्ञान न मिळवताच व शंकेचें समाधान न करताच, मरण पावतो ( ३ )

३१९ यथा नरो आपगं ओतरित्वा । महोदिकं सलिलं सीघसोतं ।
सो वुय्हमानो अनुसोतगामी । किं सो परे सक्खति तारयेतुं ॥४॥

३२० तथेव धम्मं अविभावयित्वा । बहुस्सुतानं अनिसामयत्थं ।
सयं अजानं अवितिण्णकङ्खो । किं सो परे सक्खति निज्झपेतुं ॥५॥

३२१ यथाऽपि नावं दळ्हमारुहित्वा । पियेनऽरित्तेन समङ्गिभूतो ।
सो तारये तत्थ बहूऽपि अञ्ञे । तत्रूपयञ्ञू कुसलो मुतीमा ॥६॥

३२२ एवऽपि यो वेदगु भावितत्तो । बहुस्सुतो होति अवेधधम्मो ।
सो खो परे निज्झपये पजानं । सोतावधानूपनिसूपपन्नो ॥७॥

१ अ०, म०–पियेन. २ अ०, म०–तत्रूपायञ्ञू ३ म०–मतीमा.

३१९. ज्याप्रमाणें एकादा मनुष्य पाण्यानें भरलेल्या जोरानें वाहणाऱ्या नदींत उतरून प्रवाहाबरोबर वाहत जातो—तो इतराला कसा तारू शकेल? —( ४ )

३२० त्याप्रमाणेंच जो धर्मज्ञान न संपादतां आणि बहुश्रुतांचें अर्थपूर्ण वचन न ऐकतां स्वत अज्ञान, साशंक, तो इतरांचें समाधान कसें करील? ( ५ )

३२१. जसा एकादा नौका चालविण्यांत कुशल बुद्धिमान् माणूस वल्ही, सुकाणू असलेल्या बळकट नौकेंत बसून तिच्या आधारानें पुष्कळांना तारू शकेल, ( ६ )

३२२ तसाच विद्वान्, भावितात्मा, बहुश्रुत, अप्रकम्प्य आणि श्रोतावधानानें ज्यानें निर्वाणज्ञान संपादिलें आहे असा ज्ञानी — तोच लोकांचें समाधान करू शकेल. ( ७

३२३ तस्मा हवे सप्पुरिसं भजेथ । मेधाविनं चेव बहुस्सुतं च ।
अञ्ञाय अत्थं पटिपज्जमानो । विञ्ञातधम्मो सो सुखं लभेथा ति ॥८॥
नावासुत्तं निट्ठितं ।

२१
[ ९. किंसीलसुत्तं ]

३२४ किं-सीलो किं-समाचारो कानि कम्मानि ब्रूहयं ।
नरो सम्मा निविट्ठस्स उत्तमत्थं च पापुणे ॥ १ ॥

१ अ०—धम्मसुत्त, नावासुत्तं'तिऽपि.

३२३. म्हणून मेधावी आणि बहुश्रुत अशा सत्पुरुषाची उपासना करावी. त्याच्या बोलण्याचा अर्थ समजून त्याप्रमाणें चालणारा धर्म जाणून सुख मिळवील. ( ८ )

नावासुत्त समाप्त

२१
[ ९. किंसीलसुत्त ]

३२४ कोणत्या शीलानें, कोणत्या आचारानें आणि कोणत्या कर्मांच्या अभ्यासानें माणूस सन्मार्गानें चालूं शकेल व परमार्थ प्राप्त करून घेईल ? ( १ )

३२५ वद्धापचायी अनुसुय्यको सिया । कालञ्ञू चऽस्स गरूनं दस्सनाय
धम्मिं कथं एरयितं खणञ्ञू । सुणेय्य सक्कच्च सुभासितानि ॥२॥
३२६ कालेन गच्छे गरूनं सकासं । थंभं निरंकत्वा निवातवुत्ति ।
अत्थं धम्मं संयमं ब्रह्मचरियं । अनुस्सरे चेव समाचरे च ॥३॥
३२७ धम्मारामो धम्मरतो । धम्मे ठितो धम्मविनिच्छयञ्ञू ।
नेवाचरे धम्मसन्दोसवादं । तच्छेहि नीयेथ सुभासितेहि ॥४॥
३२८ हस्सं जप्पं परिदेवं पदोसं । मायाकतं कुहनं गिद्धिमानं ।
सारम्भ-कक्कस्स कसाव-मुच्छं । हित्वा चरे वीतमदो ठितत्तो ॥५॥

१ म०—वुद्धापचायी. २ रो०, सी०—गरुनं.

३२५. त्यानें वडील माणसांना मान द्यावा, आणि ईर्ष्याविरहित व्हावें. गुरूंच्या भेटीची वेळ जाणावी, आणि सन्धि न दवडतां आदरपूर्वक ( गुरूंच्या मुखांतून ) बाहेर पडलेलें धार्मिक संभाषण व सुभाषितें ऐकावीत ( २ )

३२६. गर्व दूर सारून व नम्र होऊन योग्य वेळीं गुरूपाशीं जावें; सदर्थ, धर्म, संयम व ब्रह्मचर्य यांचें स्मरण ठेवावें व तीं आचरणांत आणावीत. ( ३ )

३२७. धर्माराम, धर्मरत, धर्मस्थित व धर्मन्यायज्ञ होऊन धर्माला दोष लागेल अशा वादांत पडूं नये; यथातथ्य सुभाषिताचीच कास धरून ( वादाचा निकाल लावावा )[1]. ( ४ )

३२८. हास्य, वडबड, शोक, प्रद्वेष, माया, दंभ, अतिलोभ, अहंकार, विरोधप्रियता[2], कर्कशता, अपवित्रता आणि हांव सोडून वीतमद आणि स्थितात्मा व्हावें. ( ५ )

१. या गाथेचा टीकाकारानें निराळाच अर्थ केला आहे. समाधि-विपश्यनादि पारिभाषिक शब्दांशीं अर्थ जोडला आहे.

२ अ०— पच्चनीकसातता......

३२९ विञ्ञातसारानि सुभासितानि । सुत च विञ्ञात समाधिसार ।
न तस्स पञ्ञा च सुत च वड्ढति । यो साहसो होति नरो पमत्तो । ६

३३० धम्मे च ये अरियप्पवेदिते रता ।
अनुत्तरा ते वचसा मनसा कम्मना च ।
ते सन्ति-सोरच्च-समाधि-सण्ठिता ।
सुतस्स पञ्ञाय च सारमज्झगू ति ॥ ७ ॥

किंसीलसुत्त निट्ठित ।

२२

[ १०. उट्ठानसुत्तं ]

३३१ उट्ठहथ निसीदथ को अत्थो सुपितेन वो ।
आतुरान हि का निद्दा सल्लविद्धान रुप्पत ॥ १ ॥

३२९. सुभाषितांचें ध्येय ज्ञान, श्रुतांचें आणि ज्ञानाचें ध्येय समाधि होय जो मनुष्य आळशी आणि प्रमादी होतो, त्याची प्रज्ञा व विद्या वाढत नाहीं. ( ६ )

३३०. आर्यप्रवेदित धर्मांत जे रत होतात, ते कायेनें, वाचेनें आणि कर्मानें श्रेष्ठ होत ते शान्तीनें, समाधानानें आणि समाधियुक्त राहणारे असून त्यांनीं विद्येचें आणि प्रज्ञेचें सार जाणलेलेंच आहे. (७)

किंसीलसुत्त समाप्त

२२

[ १०. उट्ठानसुत्त ]

३३१. उठा ! ( जागे व्हा ! ) बसा ! झोंपेपासून तुम्हास काय फायदा होणार आहे ? बाणाचें शल्य तुमच्या शरिरांत शिरल्यामुळें दु ख भोगणाऱ्या तुम्हा पीडित जनाना निद्रा कशी येते ? ( १ )

३३२ उट्ठहथ निसीदथ दळ्ह सिक्खथ सन्तिया ।
मा वो पमत्ते विञ्ञाय ( मच्चुराजा ) अमोहयित्थ वसानुगे ॥२॥

३३३ याय देवा मनुस्सा च सिता तिट्ठन्ति अत्थिका ।
तरथेत विसत्तिक खणो वे मा उपच्चगा ।
खणातीता हि सोचन्ति निरयम्हि समप्पिता ॥ ३ ॥

३३४ पमादो रजो पमादो पमादानुपतितो रजो ।
अप्पमादेन विज्जाय अब्बहे सल्लमत्तनो ति ॥ ४ ॥

उट्ठानसुत्त निट्ठित ।

---

१ सी०—पमादा.

३३२ उठा ! ( जागे व्हा ! ) बसा ! निश्चयानें शांतीचा अभ्यास करा. तुम्हास बेसावध झालेले पाहून आपल्या कबजात घेऊन मृत्युराजा ( मार ) तुम्हास मोह न पाडो ! ( २ )

३३३ जिच्यामुळें देव आणि मनुष्य आशाळभूत होऊन राहतात, त्या तृष्णेचें उल्लंघन करा. हा क्षण वाया दवडू नका ! कारण क्षण वाया दवडणारे नरकात पडून शोक करतात. ( ३ )

३३४. प्रमाद हा मळ होय; प्रमादापासून मळ उत्पन्न होतो. अप्रमादानें आणि प्रज्ञेनें आपल्या शरिरातील शल्य काढावें. ( ४ )

उट्ठानसुत्त समाप्त

## २३

### [ ११. राहुलसुत्तं ]

३३५ कच्चि अभिण्हसवासा नावजानासि पण्डित ।
उक्काधारो मनुस्सान कच्चि अपचितो तया ॥ १ ॥[1]

३३६ नाहं अभिण्हसवासा अवजानामि पण्डित ।
उक्काधारो मनुस्सान निच्च अपचितो मया ॥ २ ॥

वत्थुगाथा ।

३३७ पचकामगुणे हित्वा पियरूपे मनोरमे ।
सद्धाय घरा निक्खम्म दुक्खस्सऽन्तकरो भव ॥ ३ ॥

१ म०– (न दिस्सति)

## २३

### [ ११. राहुलसुत्त ]

३३५. ( भगवान् — ) अतिपरिचयामुळें तू त्या सुज्ञाची ( शारिपुत्राची ) अवज्ञा करीत नाहींस ना ? मनुष्यासाठीं ज्ञानाची मशाल पाजळणाऱ्या त्याचा तू आदर ठेवतोस ना ? ( १ )

३३६. (*राहुल—) अतिपरिचयामुळें त्या सुज्ञाची मी अवज्ञा करीत* नाहीं. मनुष्यासाठीं ज्ञानाची मशाल पाजळणाऱ्या त्याचा मी सतत आदर ठेवतों. ( २ )

[ ( वरील ) गाथा प्रास्ताविक आहेत. ]

३३७. मनाला आवडणारे व उल्लसित करणारे पंचेन्द्रियाचे विषय सोडून श्रद्धापूर्वक घरातून नीघ व दु खाचा अन्त कर. ( ३ )

३३८ मित्ते भजस्सु कल्याणे पन्तं च सयनासनं ।
विवित्तं अप्पनिग्घोसं मत्तञ्ञू होहि भोजने ॥ ४ ॥
३३९ चीवरे पिण्डपाते च पच्चये सयनासने ।
एतेसु तण्हं माऽकासि मा लोकं पुनरागमि ॥ ५ ॥
३४० संवुतो पातिमोक्खस्मिं इन्द्रियेसु च पचसु ।
सति कायगता त्यत्थु निब्बिदाबहुलो भव ॥ ६ ॥
३४१ निमित्तं परिवज्जेहि सुभं रागूपसंहितं ।
असुभाय चित्तं भावेहि एकग्गं सुसमाहितं ॥ ७ ॥

---

१ सी०— पत्थ, म०— पन्थ.

---

३३८. कल्याणमित्राची संगति धर. तुझी बसण्या-उठण्याची जागा जेथें गडबड नसेल अशा एकान्त स्थळीं असू दे व तू भोजनाचे बाबतींत मिताहारी हो. (४)

३३९. चीवर (भिक्षुवस्त्र), अन्न, (आजारांत) उपयोगी पडणारें औषध, आणि आश्रयस्थान यांच्यात आसक्ति धरू नकोस, इहलोकीं पुनर्जन्म घेऊं नकोस. (५)

३४० प्रातिमोक्षाच्या नियमाप्रमाणें संवृत राहून पञ्चेन्द्रियांत संयम ठेव, कायगतास्मृतीची भावना कर व वैराग्याकडे ओढा ठेव. (६).

३४१. कामविकार उत्पन्न होईल, असें शुभनिमित्त वर्ज्य कर, व जेणेंकरून चित्त एकाग्र व समाधियुक्त होईल अशा (शरिराच्या) अशुभभावाचें चिन्तन कर. (७)

to keep in heart
३४२ अनिमित्तं च भावेहि मानानुसयमुज्जह ।
ततो मानाभिसमया उपसन्तो चरिस्ससी ति ॥ ८ ॥

इत्थं सुदं भगवा आयस्मन्तं राहुलं इमाहि गाथाहि अभिण्हं ओवदती ति ।

राहुलसुत्तं निट्ठितं ।

२४

[ १२. वंगीससुत्तं ]

एवं मे सुतं। एकं समयं भगवा आळवियं विहरति अग्गाळवे चेतिये। तेन खो पन समयेन आयस्मतो वंगीसस्स उपज्झायो निग्रोधकप्पो नाम थेरो अग्गाळवे चेतिये अचिरपरिनिब्बुतो होति । अथ खो आयस्मतो

३४२. आणि अनिमित्त जें निर्वाण त्याचें चिन्तन कर व अहंकाराची वासना सोड, अहंकाराचा त्याग केल्यास म्हणजे तू शान्त होशील. (८)

याप्रमाणें भगवान् आयुष्मान् राहुलाला या गाथांनीं वारवार उपदेश करी.

राहुलसुत्त समाप्त

२४

[ १२. वंगीससुत्त ]

असें मीं ऐकलें आहे एके समयीं भगवान् आळवी येथें अग्गाळव चैत्यांत राहत होता. त्या समयीं आयुष्मान् वंगीसाचा उपाध्याय निग्रोधकप्प नावाचा स्थविर अग्गाळव चैत्यांत नुकताच परिनिर्वाण

वगीसस्स रहोगतस्स पटिसल्लीनस्स एव चेतसो परिवितक्को उदपादि– परिनिब्बुतो नु खो मे उपज्झायो उदाहु नो परिनिब्बुतो'ति । अथ खो आयस्मा वगीसो सायण्हसमय पटिसल्लाना वुट्ठितो येन भगवा तेनुपसङ्कमि, उपसङ्कमित्वा भगवन्त अभिवादेत्वा एकमन्त निसीदि । एकमन्त निसिन्नो खो आयस्मा वगीसो भगवन्त एतदवोच–इध मय्ह " भन्ते रहोगतस्स पटिसल्लीनस्स एव चेतसो परिवितक्को उदपादि– परिनिब्बुतो नु खो मे उपज्झायो, उदाहु नो परिनिब्बुतो'ति । अथ खो आयस्मा वगीसो उट्ठायासना एकस चीवर कत्वा येन भगवा तेनऽञ्जलिं पणामेत्वा भगवन्त गाथाहि अज्झभासि—

---

पावला होता. तेव्हा एकान्तात विश्रांति घेत असता आयुष्मान् वगीसाच्या मनात असा विचार आला कीं, माझा उपाध्याय (मरणोत्तर) परिनिर्वाण पावला, की परिनिर्वाण पावला नाहीं ? तेव्हा सायंकाळी आयुष्मान् वगीस आपल्या विश्रांतिस्थानापासून निघाला आणि भगवतापाशीं आला, येऊन भगवन्ताला नमस्कार करून एका बाजूस बसला.

एका बाजूस बसून वगीस भगवन्ताला म्हणाला, " भदन्त, मी एकांतात विश्रांतिस्थानीं असता माझ्या मनात असा विचार आला कीं माझा उपाध्याय परिनिर्वाण पावला, कीं परिनिर्वाण पावला नाहीं?" तेव्हा आयुष्मान् वगीस आसनावरून उठला व एका खांद्यावर चीवर करून भगवन्तासमोर हात जोडून भगवन्ताला गाथांनीं म्हणाला—

३४३ पुच्छाम सत्थार अनोमपञ्ञं। दिट्ठेव धम्मे यो विचिकिच्छान छेत्ता।
अग्गाळवे कालमकासि भिक्खु। ञातो यसस्सी अभिनिब्बुतत्तो॥१

३४४ निग्रोधकप्पो इति तस्स नाम। तया कतं भगवा ब्राह्मणस्स।
सो तं नमस्सं अचरि मुत्यपेक्खो। आरद्धविरियो दळ्हधम्मदस्सी॥२

३४५ तं सावकं सक्क मयऽपि सब्बे। अञ्ञातुमिच्छाम समन्तचक्खु।
समवट्ठिता नो सवणाय सोता। तुवं नो सत्था त्वं अनुत्तरोऽसि॥३

३४६ छिन्देव नो विचिकिच्छं ब्रूहि मे तं। परिनिब्बुतं वेदय भूरिपञ्ञ।
मज्झे व नो भास समन्तचक्खु। सक्को व देवान सहस्सनेत्तो॥४॥

१ ३४३–३५८ = थेरगाथा १२६३–१२७८. २ म०–छेत्वा ३ सी०–अचरी.

३४३ इहलोकींच आमच्या शंकांचें जो समाधान करतो, त्या श्रेष्ठप्रज्ञ शास्त्याला आम्ही विचारतों कीं, अग्गाळव येथें जो प्रसिद्ध यशस्वी आणि शांतचित्त भिक्षु मरण पावला, (१)

३४४. त्या ब्राह्मणाला, हे भगवन्, निग्रोधकप्प हें तूं नाव दिलें आहेस तो प्रयत्नशील, निर्वाण जाणणारा, मुक्तिलाभासाठीं तुझी पूजा करून राहत असे (२)

३४५ हे शाक्य, हे समंतचक्षु, त्या श्रावकाची (गति) काय झाली, हें जाणण्याची आम्हा सर्वांची इच्छा आहे तें ऐकण्याला आमचे कान टवकारलेले आहेत तू आमचा शास्ता व लोकोत्तर असा आहेस (३)

३४६ हे विपुलप्रज्ञ, आमच्या या शंकेचें समाधन कर, तो परिनिर्वाण पावला कीं काय हें सांग. हे समंतचक्षु, सहस्रनेत्र शक्र जसा देवांच्यामध्यें बसून बोलतो, तसा तू आमच्यामध्यें बसून आम्हांशीं बोल (४)

३४७ ये केचि गन्था इध मोहमग्गा। अञ्ञाणपक्खा विचिकिच्छठाना।
तथागत पत्वा न ते भवन्ति। चक्खु हि एत परम नरान ॥५॥
३४८ नो चे हि जातु पुरिसो किलेसे। वातो यथा अब्भघन विहाने।
तमो वऽस्स निवुतो सब्बलोको। न जोतिमन्तोऽपि नरा तपेय्यु॥६
३४९ धीरो चे पज्जोतकरा भवन्ति। त त अह धीर तथेव मञ्ञे।
विपस्सिनं जानमुपागमम्ह। परिसासु नो आविकरोहि कप्प॥७
३५० खिप्प गिर एरय वग्गु वग्गु। हसो व पग्गह सणि निकूजं।
बिन्दुस्सरेन सुविकप्पितेन। सब्बे व ते उज्जुगता सुणोम ॥८॥

१-१ सी०, म०—धीरा य २ म०—य. ३ अ०, म०—वीर ४ सी०—ञानमुपागमम्ह ५ रो०—हसा य. ६ म०—सणिक निकूजि

३४७ इहलोकीं मोहाप्रत नेणाऱ्या अज्ञान पक्षाला चिकटणाऱ्या सशयस्थानरूपी ज्या ग्रथी असतात, त्या तथागताकडे येणाऱ्याच्या बाबतींत नाहींशा होतात. कारण तो मनुष्याचे बाबतींत श्रेष्ठ डोळ्यासारखाच आहे (५)

३४८. वारा जसा मेघपटल उडवून देतो, तद्वत् तुझ्यासारख्या पुरुषानें जर लोकाचे क्लेश दूर केले नाहींत, तर हा लोक (अज्ञानानें) झाकला जाऊन अधकारमय होईल, व द्युतिमन्त मनुष्यही प्रकाशणार नाहींत (६)

३४९ बुद्धिवान् पुरुष प्रकाश देणारे होतात. हे धीर, तूही तसाच आहेस असें मी समजतों तू दिव्यदृष्टि आहेस असें जाणून आम्ही तुजपाशीं आलों (निग्रोध) कप्पाची काय गति झाली, हें या सभेंत आम्हास साग. (७)

३५० हस जसा सुदर आणि स्पष्ट स्वरानें, मान उच करून, सावकाश गान करतो, तसा तू विलब न लावता गोड गोड वचन बोल आम्ही सर्व सरळ (पनानें) तुझें भाषण ऐकतों (८)

३५१ पहीनजातिमरणं असेसं । निग्गय्ह धोनं वदेस्सामि धम्मं ।
न कामकारो हि पुथुज्जनानं । सङ्खेय्यकारो च तथागतानं ॥९॥

३५२ संपन्नवेय्याकरणं तवेदं । समुज्जुपञ्ञस्स समुग्गहीतं ।
अयमञ्जली पच्छिमो सुप्पणामितो । मा मोहयी जानमनोमपञ्ञ ॥ १० ॥

३५३ परोवरं अरियधम्मं विदित्वा । मा मोहयी जानमनोमविरिय ।
वारिं यथा घम्मनि घम्मतत्तो । वाचाऽभिकङ्खामि सुतं पवस्स ॥ ११ ॥

१ म०—पहीनं. २ म०—समुज्जपञ्ञस्स. ३ म०—परोवरं. ४ सी०—सुतस्स वस्स; अ०—सुतस्स वस्सा 'ति वा.

३५१. ज्याचें अशेष जन्ममरण नष्ट झालेलें आहे व जो धूतपाप आहे अशा तुला मी आग्रहपूर्वक धर्म बोलण्यास विनवितों. कारण कीं, सामान्य जन इच्छिलेल्या (प्रश्नाचें उत्तर देण्यासारख्या) गोष्टी करूं शकत नाहीं, पण तथागत अशा गोष्टी प्रज्ञापूर्वक करू शकतात. (९)

३५२. अत्यंत सरळ प्रज्ञा ज्याची आहे अशा त्वां दिलेलें प्रश्नाचें उत्तर उत्तम असें समजलें जातें. हे उत्तमप्रज्ञ, हा मी तुला (पुनः) हात जोडून शेवटचा प्रणाम करतों. तूं जाणत आहेस, तेव्हां आम्हांस मोहांत ठेवूं नकोस. (१०)

३५३. हे महावीरा, लहानमोठा आर्यधर्म तूं जाणत आहेस; तेव्हां आम्हास मोहांत ठेवूं नकोस. उन्हाळ्यात उन्हानें श्रांत झालेला पाण्याची इच्छा करतो, तसा मी तुझ्या वचनाची इच्छा करतों. आमच्या (कर्णेन्द्रियावर) शब्दांचा वर्षाव कर. (११)

३५४ यदत्थिकं ब्रह्मचरियं अचारि । कप्पायनो कच्चिऽस्स तं अमोघं ।
निब्बायि सो अनुपादिसेसो[1] । यथा विमुत्तो अहु तं सुणोम १२

३५५ अच्छेच्छि तण्हं इध नामरूपे ( इति भगवा ) कण्हस्स सोतं ।
दीघरत्तानुसयितं ।
अतारि जातिमरणं असेसं । इच्चब्रवी[2] भगवा पंचसेट्ठो ॥ १३ ॥

३५६ एस सुत्वा पसीदामि वचो ते इसिसत्तम ।
अमोघं किर मे पुट्ठं न मं वञ्चेसि ब्राह्मणो ॥ १४ ॥

१ रो०, सी०– सउपादिसेसो. २ म०–इच्चब्रवि ।

३५४. (निग्रोध-) कप्पानें ज्यासाठीं ब्रह्मचर्याचें आचरण केलें, तें त्याला मिळालें काय ? तो अनुपादिशेष निर्वाणाला पावला काय ? तो कसा विमुक्त झाला ? —हें आम्ही ऐकूं इच्छितों. (१२)

३५५ " नामरूपांविषयीं तृष्णा—हा तृष्णाचा (माराचा) चिरकाल चाललेला गुप्त प्रवाह त्यानें इहलोकीं तोडून टाकला आणि ता निःशेष जन्ममरण तरून गेला." असें पंचवर्गीय भिक्षूंत श्रेष्ठ असा जो भगवान् तो बोलता झाला. (१३)

३५६. (वंगीस-) हे ऋषिसत्तम, हा मी तुझ्या वचनानें आनंदित होत आहें. माझी पृच्छा सफळ झाली. ब्राह्मणानें ( बुद्धानें[1] ) मला फसविलें नाहीं. (१४)

१ दुसराही अर्थ संभवनीय आहे. ब्राह्मणानें म्हणजे निग्रोधकप्पानें मला फसविलें नाहीं, म्हणजे त्याच्या संबंधीच्या अपेक्षा फोल ठरल्या नाहींत. कारण तो मुक्ति पावला आहे.

३५७ यथावादी तथाकारी अहु बुद्धस्स सावको।
अच्छिदा मच्चुनो जालं ततं मायाविनो दळ्हं ॥ १५ ॥
३५८ अद्दसे भगवा आदिं उपादानस्स कप्पियो।
अच्चगा वत कप्पायनो मच्चुधेय्यं सुदुत्तरं ति ॥ १६ ॥
वंगीससुत्तं निट्ठितं।

---

## २५

## [ १३. सम्मापरिब्बाजनियसुत्तं ]

३५९ पुच्छाम मुनिं पहूतपञ्ञं। तिण्णं पारगतं परिनिब्बुतं ठितत्तं।
निक्खम्म घरा पनुज्ज कामे। कथं ( भिक्खु ) सम्मा सो लोके
परिब्बजेय्य ॥१॥

१ बु०—तथा, म०—तं तं २ म०—अद्दसा. ३ म०—आदि. ४ अ०—'निग्रोधकप्पसुत्तं' तिऽपि.

३५७. तो (कप्प), बुद्धाचा श्रावक, बोलल्याप्रमाणें चालणारा होता. सर्वत्र पसरलेलें मायावी मृत्यूचें बळकट जाळें त्यानें तोडून टाकलें. (१५)

३५८. हे भगवन्, (निग्रोध-) कप्पानें उपादानाचें (संसाराचें) मूळ पाहिलें. हे दुस्तर मृत्युध्येय कप्पायन खरोखरच तरून गेला. (१६)

वंगीससुत्त समाप्त

---

## २५

## [ १३. सम्मापरिब्बाजनियसुत्त ]

३५९. प्रभूतप्रज्ञ, तरून पार गेलेला, परिनिर्वृत व स्थितात्मा अशा मुनीला मी विचारतों कीं, घरातून बाहेर पडून व चैनीचे पदार्थ सोडून भिक्षु बनलेल्याला या जगात सम्यक्-परिव्राजक कसें होता येईल ? ( १ )

३६० यस्स मंगला समूहता (इति भगवा) । उप्पादा सुपिना च लक्खणा च ।
सो मंगलदोसविप्पहीनो[1] । सम्मा सो लोके परिब्बजेय्य ॥२॥
३६१ राग विनयेथ मानुसेसु । दिब्बेसु कामेसु चापि भिक्खु ।
अतिक्कम्म भव समेच्च धम्म । सम्मा सो लोके परिब्बजेय्य ॥३॥
३६२ विपिट्ठिकत्वा[2] पेसुनानि । कोध कदरियं जहेय्य भिक्खु ।
अनुरोध-विरोध-विप्पहीनो । सम्मा सो लोके परिब्बजेय्य ॥४॥
३६३ हित्वा पियं च अप्पियं च । अनुपादाय अनिस्सितो कुहिञ्चि ।
संयोजनियेहि विप्पमुत्तो । सम्मा सो लोके परिब्बजेय्य॥५॥

१ सी०—स मंगलदोसविप्पहीनो (भिक्खु). रो०—स मंगलदोसविप्पहीनो। भिक्खु सम्मा... २ म०—विपीठिं कत्वान

३६० उत्सव, उल्कापातादिकांचीं आणि स्वप्नाचीं फळें व स्त्रीपुरुषादिकांचीं लक्षणें यांच्यावरचा ज्याचा समूळ विश्वास उडाला आहे, जो उत्सवाच्या दोषापासून मुक्त आहे, तो या जगात सम्यक्-परिव्राजक होईल (२)

३६१. लौकिक किंवा दिव्य कामसुखात जो भिक्षु आसक्त होत नाहीं, तो संसाराचें अतिक्रमण करून व धर्म जाणून या जगात सम्यक्-परिव्राजक होईल (३)

३६२ जो भिक्षु चहाड्या टाकून देऊन क्रोध आणि कृपणता सोडतो, तो अनुरोध-विरोधापासून मुक्त झाला की या जगात सम्यक् परिव्राजक होईल. (४)

३६३. प्रिय आणि अप्रिय सोडून देऊन सर्वत्र अनासक्त व अनाश्रित आणि संयोजनापासून मुक्त असा जो, तोच या जगात सम्यक्-परिव्राजक होईल (५)

३६४ न सो उपधीसु सारमेति । आदानेसु विनेय्य छन्दरागं ।
सो अनिस्सितो अनञ्ञनेय्यो । सम्मा सो लोके परिब्बजेय्य ॥६॥

३६५ वचसा मनसा च कम्मना च । अविरुद्धो सम्मा विदित्वा धम्मं ।
निब्बाणपदाभिपत्थयानो । सम्मा सो लोके परिब्बजेय्य ॥७॥

३६६ यो वन्दति मं ति न उण्णमेय्य । अक्कुट्ठोऽपि न सन्धियेथ भिक्खु ।
लद्धा परभोजनं न मज्जे । सम्मा सो लोके परिब्बजेय्य ॥८॥

३६७ लोभं च भवं च विप्पहाय । विरतो छेदनबन्धना च भिक्खु ।
सो तिण्णकथंकथो विसल्लो । सम्मा सो लोके परिब्बजेय्य ॥९॥

१ रो०- छेदनबन्धनातो, अ०-छेदनबन्धनतो.

३६४. उपाधींत जो सार मानीत नाहीं, ग्रहण करण्याजोग्या वस्तुंविषयीं छंदरागाचें ( लोभाचें ) जो निरसन करतो, तो अनिश्रित, अनन्यनेय असा होऊन, या जगात सम्यक्-परिव्राजक होईल. ( ६ )

३६५. चांगल्या रीतीनें धर्म जाणून, जो वाचेनें, मनानें आणि कर्मानें इतरांशीं अविरुद्ध, जो निर्वाणपदाचीच इच्छा बाळगणारा, तो या जगात सम्यक्-परिव्राजक होईल. ( ७ )

३६६. लोक आपणांस वंदन करतात म्हणून उन्नत होणार नाहीं, व शिवीगाळ दिली असतां सूड उगविण्याची बुद्धि धरणार नाहीं, आणि इतरांनीं दिलेलें अन्न मिळालें असतां बेसावधपणें वागणार नाहीं असा जो भिक्षु, तो या जगात सम्यक्-परिव्राजक होईल. (८)

३६७. लोभ आणि संसार सोडून छेदन-बंधनापासून विरत झालेला, शंका तरून गेलेला, तृष्णाशल्यविरहित असा जो भिक्षु, तो या जगांत सम्यक्-परिव्राजक होईल. (९)

३६८ सारुप्पमत्तनो विदित्वा । न च भिक्खु हिंसेय्य कञ्चि[1] लोके ।
यथातथियं विदित्वा धम्मं । सम्मा सो लोके परिब्बजेय्य ॥ १० ॥

३६९ यस्सानुसया न सन्ति केचि । मूला अकुसला समूहतासे ।
सो निरासयो अनासयानो[2] । सम्मा सो लोके परिब्बजेय्य ॥ ११ ॥

३७० आसवखीणो पहीनमानो । सब्बं रागपथं उपातिवत्तो ।
दन्तो परिनिब्बुतो ठितऽत्तो । सम्मा सो लोके परिब्बजेय्य ॥ १२ ॥

३७१ सद्धो सुतवा नियामदस्सी । वग्गगतेसु न वग्गसारि धीरो ।
लोभं दोसं विनेय्य पटिघं । सम्मा सो लोके परिब्बजेय्य ॥ १३ ॥

१ म०–किंचि २रो०–अनासयानो, म०–निरासो अनासिसानो

३६८ आपलें उचित (कर्तव्य) काय आहे हें जाणून कोणाचीही या जगात हिंसा करणार नाहीं असा जो भिक्षु, तो यथातथ्य धर्म जाणून या जगात सम्यक्-परिव्राजक होईल (१०)

३६९ ज्याच्या अन्तःकरणात पापानुशय राहिले नाहींत, ज्यानें अकुशलाचीं मुळें खणून काढलीं, तो निस्तृष्ण आणि निःस्पृह असा होऊन या जगात सम्यक् परिव्राजक होईल (११)

३७० ज्याचे आश्रव क्षीण झाले व अहंकार नष्ट झाला, जो कामसुखाचा सर्व मार्ग सोडून पलीकडे गेला, जो दान्त, परिनिर्वृत व स्थितात्मा, तो या जगात सम्यक्-परिव्राजक होईल (१२)

३७१ जो श्रद्धावान्, श्रुतसंपन्न, सम्यग्मार्गदर्शी पक्षपाती लोकात पक्षपातानें वागत नाहीं, तो धीर पुरुष लोभ, द्वेष आणि क्रोध सोडून या जगात सम्यक्-परिव्राजक होईल. (१३)

३७२ सुद्धज्जिनो विवत्तच्छद्दो। धम्मेसु वसी पारगू अनेजो।
संखारनिरोधञाणकुसलो। सम्मा सो लोके परिब्बजेय्य ॥१४॥
३७३ अतीतेसु अनागतेसु चापि। कप्पातीतो अतिच्च सुद्धिपञ्ञो।
सब्बायतनेहि विप्पमुत्तो। सम्मा सो लोके परिब्बजेय्य ॥१५॥
३७४ अञ्ञाय पद समेच्च धम्म। विवट दिस्वान पहानमासवान।
सब्बूपधीनं परिक्खयानो। सम्मा सो लोके परिब्बजेय्य ॥१६॥
३७५ अद्धा हि भगवा तथेव एत। यो सो एव विहारि दन्तो भिक्खु।
सब्बसयोजनियेच वीतिवत्तो। सम्मा सो लोके परिब्बजेय्या ति १७

सम्मापरिब्बाजनियसुत्तं निट्ठितं।

१ म०—विवटच्छदो. २ रो०—परिक्खया. ३ अ०—महासमयसुत्तं'तिऽपि

३७२ शुद्ध मार्गाने क्लेशांना जिंकणारा, (लोभ, द्वेष आणि मोह यांच्या) आवरणानें विरहित, धर्मांत प्रवीण, संसारपारग, अप्रकम्प व संस्कारनिरोधाच्या ज्ञानांत कुशल असा जो, तो या जगात सम्यक्-परिव्राजक होईल (१४)

३७३ अतीत आणि अनागत कालांतीलही अहंकाराच्या कल्पनांच्या पार गेलेला, अत्यंत शुद्ध प्रज्ञा असलेला, व सर्व आयतनांपासून मुक्त असा जो, तो या जगात सम्यक् परिव्राजक होईल (१५)

३७४ आर्यसत्यें जाणून व धर्माचा बोध करून घेऊन व आश्रवांचा नाश स्पष्टपणें पाहून जो सर्व उपाधींचा क्षय करतो, तो या जगात सम्यक्-परिव्राजक होईल (१६)

३७५. हे भगवन्, हें तुझें म्हणणें बरोबर आहे जो भिक्षु याप्रमाणें दान्त व सर्व संयोजनांपासून मुक्त होऊन राहतो, तो या जगात सम्यक्-परिव्राजक होईल (१७)

सम्मापरिब्बाजनियसुत्त समाप्त

१ टीकाकाराच्या मताप्रमाणें हा अर्थ आहे.

# २६

## [ १४. धम्मिकसुत्तं ]

एवं मे सुतं । एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे । अथ खो धम्मिको उपासको पंचहि उपासकसतेहि सद्धिं येन भगवा तेनुपसंकमि, उपसंकमित्वा भगवन्तं अभिवादेत्वा एकमन्तं निसीदि । एकमन्तं निसिन्नो खो धम्मिको उपासको भगवन्तं गाथाहि अज्झभासि—

३७६ पुच्छामि तं गोतम भूरिपञ्ञ । कथंकरो सावको साधु होति ।
यो वा अगारा अनगारमेति । अगारिनो वा पनुपासकासे ॥ १ ॥
३७७ तुवं हि लोकस्स सदेवकस्स । गतिं पजानासि परायणं[1] च ।
न चऽत्थि तुल्यो निपुणत्थदस्सी । तुवं हि बुद्धं पवरं वदन्ति ॥२॥

---

# २६

## [ १४. धम्मिकसुत्त ]

असें मी ऐकलें आहे. एके समयीं भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिण्डिकाच्या आरामांत राहत होता. तेव्हां धम्मिक उपासक पांचशें उपासकांना बरोबर घेऊन भगवन्तापाशीं आला, येऊन भगवन्ताला नमस्कार करून एका बाजूस बसला. एका बाजूस बसून धम्मिक उपासक भगवन्ताला गाथांनी म्हणाला—

३७६. हे विपुलप्रज्ञ गोतमा, तुला मी विचारतों कीं, गृहत्याग करून अनागारिक बनलेला आणि गृहस्थाश्रमांत राहणारा उपासक, या श्रावकांपैकीं कोणता श्रावक चांगला ? (१)

३७७. कारण तू देवांसह सर्व जगाची गति आणि कर्मफळें जाणतोस. तुझ्यासारखा सूक्ष्मार्थदर्शी दुसरा नाहीं, आणि म्हणूनच तुला बुद्धश्रेष्ठ म्हणतात. (२)

---

१ अ०—परायणं ति निप्पत्ति.

३७८ सब्बं तुवं ञाणमवेच्च धम्मं । पकासेसि सत्ते अनुकम्पमानो ।
विवत्तच्छद्दोऽसि[1] समन्तचक्खु । विरोचसि विमलो सब्बलोके ॥३॥

३७९ आगञ्छि[2] ते सन्तिके नागराजा । एरावणो नाम जिनो ति सुत्वा ।
सोऽपि तया मन्तयित्वा अज्झगमा । साधू ति सुत्वान पतीतरूपो ॥४॥

३८० राजाऽपि तं वेस्सवणो कुवेरो । उपेति धम्मं परिपुच्छमानो ।
तस्सापि त्वं पुच्छितो ब्रूसि धीर । सो चापि सुत्वान पतीतरूपो ॥५॥

३८१ ये केचिमे तित्थिया वादसीला । आजीविका वा यदि वा निगण्ठा ।
पञ्ञाय तं नातितरन्ति सब्बे । ठितो वजन्तं विय सीघगामिं ॥६॥

१ म०—विवत्तच्छदोऽसि  २ सी०—आगञ्छि

३७८. तू सर्व ज्ञानाचा बोध करून घेऊन प्राण्यांवरील दयेमुळें धर्म प्रकाशित करतोस. (लोभ, द्वेष आणि मोह यांचें) आवरण तू दूर सारलें आहेस. समन्तचक्षु, तू सर्व लोकांत निर्मळपणें प्रकाशतोस. (३)

३७९. तू जिन आहेस हें ऐकून ऐरावण नागराजा तुजपाशीं आला व तो देखील तुझ्याशीं सल्लामसलत करून प्रसन्न चित्तानें तुला धन्यवाद देऊन जाता झाला. (४)

३८०. वैश्रवण कुबेर राजा देखील धर्म विचारण्यासाठीं तुजप्रत येतो. हे धीर, त्यालाही तू विचारल्यावरून योग्य उत्तर देतोस, आणि तोही तुझें भाषण ऐकून प्रसन्नचित्त होतो. (५)

३८१. उभा राहणारा जसा धावणाराचा पाठलाग करूं शकत नाहीं, तसे आजीवक, निर्ग्रंथ इत्यादिक वादशील तीर्थिक श्रावक प्रज्ञेच्या बाबतींत तुला मागें टाकूं शकत नाहींत. (६)

३८२ ये केचि'मे ब्राह्मणा वादसीला । वुद्धा चापि ब्राह्मणा सन्ति केचि ।
सब्बे तयि अत्थबद्धा भवन्ति । ये वाऽपि चऽञ्ञे वादिनो मञ्ञमाना ॥७॥
३८३ अयं हि धम्मो निपुणो सुखो च । योऽयं तया भगवा सुप्पवुत्तो ।
तमेव सब्बे सुस्सूसमाना । त्वं नो वद पुच्छितो बुद्धसेट्ठ ॥८॥
३८४ सब्बेऽपि'मे भिक्खवो संनिसिन्ना । उपासका चापि तथेव सोतुं ।
सुणन्तु धम्मं विमलेनानुबुद्धं । सुभासितं वासवस्सेव देवा ॥९॥
सुणाथ मे भिक्खवो सावयामि वो । धम्मं धुतं तं च धराथ सब्बे ।
इरियापथं पब्बजितानुलोमिकं । सेवेथ नं अत्थदस्सी मुतीमो ॥१०

१ सी०, म०—सुद्धाऽव. २ रा०—सब्बे चिमे. ३ म०—तथेव. ४ म०—साव-यिस्सामि. ५ म०—धरथ. ६ म—अत्थदस्सो मतिमा. अ०—अत्थदस्सो मुतीमा.

३८२. जे कोणी वादशील तरुण किंवा वृद्ध ब्राह्मण, अथवा दुसरे कोणी आपणांस वादप्रवीण समजणारे, ते देखील तुजपासून अर्थज्ञान मिळवूं पाहतात. (७)

३८३. हे भगवन्, हा जो सूक्ष्म आणि सुखावह धर्म तूं उत्तम रीतीनें सांगितलास, तोच ऐकण्याच्या इच्छेनें आम्ही सर्व आलों आहोंत. हे बुद्धश्रेष्ठा, तो तुला विचारला असतां आम्हांस सांग. (८)

३८४. हे सर्व भिक्षू तसेच सर्व उपासक, तुझें भाषण ऐकण्या-साठीं येथें बसले आहेत. इन्द्राचें सुभाषित वचन जसें देव ऐकतात, तसें निर्मळ असलेल्या बुद्धानें जो धर्म जाणलेला आहे, तो ते ऐकोत. (९)

३८५. (भगवान् —) भिक्षूंनो, माझें ऐका. धूतपाप असा धर्म तुम्हांस सांगतों, तो तुम्ही सर्व धारण करा. अर्थदर्शी मतिमान् भिक्षूनें परिव्राजकाला अनरूप अशी हालचाल स्वीकारावी. (१०)

३८६ न वे[1] विकाले विचरेय्य भिक्खु। गामं च पिण्डाय चरेय्य काले।
अकालचारिं हि सजन्ति सङ्गा। तस्मा विकाले न चरन्ति बुद्धा॥ ११॥
३८७ रूपा च सद्दा च रसा च गन्धा। फस्सा च ये सम्मदयन्ति[2] सत्ते।
एतेसु धम्मेसु विनेय्य छन्दं। कालेन सो पविसे[3] पातरासं॥ १२॥
३८८ पिण्डं च भिक्खु समयेन लद्धा। एको पटिक्कम्म रहो निसीदे।
अज्झत्तचिन्ती न मनो बहिद्धा। निच्छारये सङ्गहितऽत्तभावो[4]॥ १३॥
३८९ सचेऽपि सो सल्लपे सावकेन। अञ्ञेन वा केनचि भिक्खुना वा।
धम्मं पणीतं तमुदाहरेय्य। न पेसुणं[5] नोऽपि परूपवादं॥ १४॥

१ म०—नो चे, अ०—नो वे. २ म०—सदमयन्ति (?) म०—पाविसे. ४ रो०, अ०—सङ्गहीत° ५ सी०—पेसुनं.

३८६. भिक्षूनें अकालीं भिक्षेला जाऊं नये त्यानें गावांत वेळींच भिक्षेला जावें; कारण अकालीं भिक्षेला जाणाऱ्याला संसर्ग उत्पन्न होतात. म्हणूनच बुद्ध (ज्ञान प्राप्त झालेले) अकालीं भिक्षेला जात नसतात. (११)

३८७. रूप, शब्द, रस, गन्ध आणि स्पर्श, हे जे प्राण्यांना मोहांत पाडतात—अशा विषयांत आसक्ति सोडून त्यानें जेवणासाठीं वेळींच गांवांत जावें. (१२)

३८८ वेळेवर मिळालेली भिक्षा ग्रहण करून तेथून निघून त्यानें एकान्तांत बसावें, अध्यात्मचिन्तन करणारा व एकाग्रचित्त होऊन त्यानें आपल्या मनाला बाहेर जाऊं देऊं नये (१३)

३८९. तो जर श्रावकाबरोबर अथवा दुसऱ्या भिक्षूबरोबर बोलूं लागला, तर त्यानें उत्तम धर्म तेवढा बोलावा, चहाड्या करूं नये किंवा दुसऱ्याला दोष देऊं नये (१४)

१. भिक्षूनें मध्याह्नीच्या आधीं जेवण करावें असा नियम आहे म्हणून ह्या जेवणास प्रातराश असें संबोधिलें आहे जो जेथें मिळतो त्या गावाराही हेंच नांव दिलें आहे

३९० वादं हि एके पटिसेनियन्ति । न ते पससाम परित्तपञ्ञे ।
ततो ततो ने पसजन्ति सगा । चित्त हि ते तत्थ गमेन्ति दूरे ॥ १५

३९१ पिण्डं विहार संयनासन च । आप च सघाटिरजूपवाहन ।
सुत्वान धम्म सुगतेन देसित । सखाय सेवे वरपञ्ञसावको ॥ १६॥

३९२ तस्मा हि पिण्डे सयनासने च । आपे च सघाटिरजूपवाहने ।
एतेसु धम्मेसु अनूपलित्तो । भिक्खु यथा पोक्खरे वारिबिन्दु ॥ १७

३९३ गहट्ठवत्त पन वो वदामि । यथाकरो सावको साधु होति ।
न हेसो लब्भा सपरिग्गहेन । फस्सेतु यो केवलो भिक्खुधम्मो ॥ १८

---

३९०. वाद उत्पन्न झाला असता कित्येक त्यांत भाग घेऊन इतरांचा पराजय करूं पाहतात त्या अल्पबुद्धी लोकांची आम्ही प्रशंसा करीत नाहीं, कारण, त्या त्या विषयांत त्यांना आसक्ति होते व आपलें चित्त कर्तव्यापासून ते दूर दवडावतात (१५)

३९१ वरप्रज्ञाच्या (बुद्धाच्या) श्रावकानें, सुगतानें उपदेशिलेला धर्म ऐकून, भिक्षा, विहार, राहण्याची जागा, पाणी आणि चीवरें धुणें—यांचें मोठ्या विचारानें सेवन करावें (१६)

३९२. म्हणून भिक्षा, राहण्याची जागा, पाणी आणि चीवरें धुणें—या गोष्टींत अनुपलिप्त होऊन भिक्षूनें कमलावरील जलबिन्दू-प्रमाणें राहावें (१७)

३९३ आतां ज्या रीतीनें वागणारा श्रावक सज्जन होतो, तें गृहस्थाचें व्रत मी सांगतों. सपरिग्रह गृहस्थाला संपूर्ण भिक्षुधर्मा प्रमाणें वागणें शक्य नाहीं. (१८)

३९४ पाणं न हाने न च घातयेय्य । न चानुजञ्ञा हननं परेसं ।
सब्बेसु भूतेसु निधाय दण्डं । ये थावरा ये च तसन्ति लोके ॥१९

३९५ ततो अदिन्नं परिवज्जयेय्य । किंचि क्वचि सावको बुज्झमानो ।
न हारये हरतं नानुजञ्ञा । सब्बं अदिन्नं परिवज्जयेय्य ॥२०॥

३९६ अब्रह्मचरियं परिवज्जयेय्य । अंगारकासुं जलितं व विञ्ञू ।
असम्भुणन्तो पन ब्रह्मचरियं । परस्स दारं नातिक्कमेय्य ॥२१॥

३९७ सभग्गतो वा परिसग्गतो वा । एकस्स वेको न मुसा भणेय्य ।
न भासये भणतं नानुजञ्ञा । सब्बं अभूतं परिवज्जयेय्य ॥२२॥

१ सी०-वेको.

३९४ त्यानें प्राणहानि करूं नये, करवूं नये, किंवा तसें करणाऱ्याला समति देऊं नये; सर्व भूतमात्राविषयीं, मग ते स्थिर असोत वा चर असोत, दण्डबुद्धि सोडून वर्तावें (१९)

३९५ जाणत्या श्रावकानें त्यानंतर कोठेंही कसलीही चोरी सोडून द्यावी, दुसऱ्याकडून चोरी करवूं नये व चोरी करणाऱ्याला समति देऊं नये, या प्रमाणें सर्व अदत्तादान वर्ज्य करावें. (२०)

३९६ सुज्ञ ज्याप्रमाणें धगधगीत जळणाऱ्या कोळशाची खाई वर्ज्य करतो, त्याप्रमाणें त्यानें अब्रह्मचर्य वर्ज्य करावें. पण जर ब्रह्मचर्य पाळणं शक्य नसेल, तर निदान परदारगमन करूं नये. (२१)

३९७. सभेंत असता किंवा परिषदेंत असतां, अथवा एकटाच दुसऱ्याशीं बोलत असता खोटें बोलूं नये, दुसऱ्याकडून बोलवूं नये, आणि खोटें बोलणाऱ्याला समति देऊं नये. याप्रमाणें सर्व असत्य वर्ज्य करावें (२२)

३९८ मज्जं च पानं न समाचरेय्य। धम्मं इमं रोचये यो गहट्ठो।
न पायये पिवंतं[1] नानुजञ्ञा। उम्मादनं तं इति नं विदित्वा॥२३

३९९ मदा हि पापानि करोन्ति बाला। कारेन्ति चऽञ्ञेऽपि जने पमत्ते।
एतं अपुञ्ञायतनं विवज्जये। उम्मादनं मोहनं बालकन्तं॥२४॥

४०० पाणं न हाने न चादिन्नमादिये। मुसा न भासे न च मज्जपो सिया।
अब्रह्मचरिया विरमेय्य मेथुना। रत्तिं न भुञ्जेय्य विकालभोजनं॥२५

१ रो०—पिवतं, म०—पिवत.

३९८. जो गृहस्थ हा (बुद्ध-) धर्म[1] पाळतो त्यानें मद्यपान करूं नये, दुसऱ्याला मद्य देऊं नये, व पिणाऱ्याला समति देऊं नये; तें उन्मादक आहे, असें जाणून वर्तावें. (२३)

३९९. कारण, दारूच्या गुणीनें मूर्ख लोक पापाचरण करतात. व प्रमत्त लोकांचेकडूनही पापाचरण करवतात. पापाचें आयतन, उन्मादकारक, मोहकारक व मूर्खप्रिय असें हें कृत्य वर्ज्य करावें. (२४)

४००. प्राणघात करूं नये, चोरी करूं नये, खोटें बोलूं नये, मद्यपी होऊं नये, अब्रह्मचर्यापासून म्हणजे स्त्रीसंगापासून विरक्त व्हावें आणि अकाळीं म्हणजे रात्रीं जेवूं नये. (२५)

१ टीकाकार जरा वेगळा अर्थ देतो—'ज्याला मद्यपान न करण्याचा धर्म आवडत असेल, त्यानें दुसऱ्याला मद्य देऊं नये...वगैरे.'

४०१ मालं न धारे[1] न च गन्धमाचरे । मञ्चे छमायं[2] व सयेथ सन्थते ।
एतं हि अट्ठङ्गिकमाहु पोसथं । बुद्धेन दुक्खन्तगुना पकासितं ॥२६॥

४०२ ततो च पक्खस्सुपवस्सुपोसथं । चातुद्दसिं पञ्चदसिं च अट्ठमिं ।
पाटिहारियपक्खं[1] च पसन्नमानसो । अट्ठङ्गुपेतं सुसमत्तरूपं ॥२७॥

४०३ ततो च पातो उपवुत्थुपोसथो । अन्नेन पानेन च भिक्खुसङ्घं ।
पसन्नचित्तो अनुमोदमानो । यथारहं संविभजेथ विञ्ञू ॥२८॥

१ रो०—धारये २ रो०—व

४०१ माळा धारण करू नये, सुगंधी द्रव्यें लावू नयेत, साध्या खाटेवर किंवा जमिनीवर काहीं हाथरून निजावें दुःखाच्या पार गेलेल्या बुद्धानें प्रकाशित केलेला असा हा अष्टांग उपोसथ आहे असें म्हणतात (२६)

४०२ आणि हा अष्टांगोपेत, सुसंपन्न उपोसथ दरपंधर-वड्याला, चतुर्दशी, पंचदशी आणि अष्टमी या तीन दिवशीं व प्रातिहार्य-पक्षांत प्रसन्न मनानें पाळावा (२७)

४०३ तदनंतर उपोसथ पाळल्यावर दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्या सुज्ञानें प्रसन्न चित्तानें भिक्षुसंघाला संतुष्ट करून भिक्षूंना यथायोग्य अन्न आणि पान वाटावें (२८)

१ ह्या शब्दाचे टीकाकारानें तीन अर्थ दिले आहेत —(१) आषाढ मास, वर्षाकालातील तीन महिने व कार्तिक मास असे पांच महिने (२) आषाढ, कार्तिक व फाल्गुन हे तीन महिने (३) वर सांगितलेल्या तीन उपवासाच्या दिवसांच्या आधींचे व नंतरचे दिवस, म्हणजे त्रयोदशी व प्रतिपदा आणि सप्तमी व नवमी असे चार दिवस

४०४ धम्मेन मातापितरो भरेय्य ! पयोजये धम्मिकं सो वणिज्जं ।
एतं गिही वत्तयं अप्पमत्तो । सयंपभे नाम उपेति देवे ति ॥२९॥

धम्मिकसुत्तं निट्ठितं ।

## चूळवग्गो दुतियो ।
## तस्स वग्गस्स उद्दानं—

रतनं आमगन्धं च हिरि[2] मंगलमुत्तमं । सूचिलोमो धम्मचरिया पुन ब्राह्मणधम्मिकं ।
नावा च सुत्तं किंसील-उट्ठानं अथ राहुलो । कप्पो च परिब्बाजो[3] धम्मिको च पुनापरं ।
चुद्दसेतानि सुत्तानि चूळवग्गो ति वुच्चति ।

१ म०—सयपभा (?) २ रो०—हिरि च ३ सी०—परिब्बाजं च.

४०४. धर्ममार्गानें आईबापाचें पालन करावें, व धार्मिकपणें व्यापार करावा अशा रीतीनें जर गृहस्थ सावधपणें वागला तर तो स्वयंप्रभ नावाच्या देवलोकीं जन्म पावतो (२९)

धम्मिकसुत्त समाप्त

## चूळवग्ग दुसरा समाप्त

त्याची अनुक्रमणिका—रत्न, आमगन्ध, हिरि, मंगल, सूचिलोम, धम्मचरिया, ब्राह्मण-धम्मिक, नावा, किंसील, उट्ठान, राहुल, कप्प, परिब्बाजक, आणि धम्मिक—हीं चौदा सुत्तें मिळून चूळवग्ग होतो.

# [ महावग्गो ततियो

२७

## [ १. पब्बज्जासुत्तं ]

४०५ पब्बज्जं कित्तयिस्सामि यथा पब्बजि चक्खुमा ।
यथा वीमंसमानो सो पब्बज्जं समरोचयि ॥ १ ॥

४०६ सम्बाधोऽयं घरावासो रजस्सायतनं इति ।
अब्भोकासो च पब्बज्जा इति दिस्वान पब्बजि ॥ २ ॥

४०७ पब्बजित्वान कायेन पापकम्मं विवज्जयि ।
वचीदुच्चरितं हित्वा आजीवं परिसोधयि ॥ ३ ॥

१ म ०—घरावाय

# महावग्ग, तिसरा

२७

## [ १. पब्बज्जासुत्त ]

४०५. त्या चक्षुष्मन्तानें प्रव्रज्या कशी घेतली, व कोणत्या विचारानें त्याला प्रव्रज्या आवडली, हें सांगून त्याच्या प्रव्रज्येचें मी वर्णन करतों. (१)

४०६. गृहवसति म्हणजे गर्दी व घाणीचें आगर आणि प्रव्रज्या म्हणजे मोकळी हवा, असें पाहून त्यानें प्रव्रज्या घेतली. (२)

४०७. प्रव्रज्या घेऊन त्यानें कायेनें पापकर्म वर्ज्य केलें, आणि वाचसिक पाप सोडून आपली उपजीविका शुद्ध ठेविली (३)

४०८ अगमा राजगहं बुद्धो मगधानं गिरिब्बजं ।
पिण्डाय अभिहारेसि आकिण्णवरलक्खणो ॥ ४ ॥
४०९ तमद्दसा बिम्बिसारो पासादस्मिं पतिट्ठितो ।
दिस्वा लक्खणसंपन्नं इममत्थं अभासथ ॥ ५ ॥
४१० इमं भोन्तो निसामेथ अभिरूपो ब्रहो[१] सुचि ।
चरणेन चेव संपन्नो युगमत्तं च पेक्खति ॥ ६ ॥
४११ ओक्खित्तचक्खु सतिमा नायं नीचकुलामिव ।
राजदूता विधावन्तु[२] कुहिं भिक्खु गमिस्सति ॥ ७ ॥

१ म० -ब्रहा. २ म०- राजदूताऽभिधावन्तु.

४०८. बुद्ध मगधाच्या गिरिव्रजाला–राजगृहाला–गेला, आणि ज्याच्या शरिरावर उत्तम लक्षणें फैलावलीं आहेत, असा तो भिक्षेसाठीं फिरू लागला. (४)

४०९. आपल्या प्रासादावर बसलेल्या बिंबिसार राजानें त्याला पाहिलें, व त्या लक्षणसंपन्नाला पाहून तो राजा याप्रमाणें बोलला - (५)

४१०. भो, हा पहा कोणीतरी सुन्दर, भव्य पवित्र, वागणुकीनें चांगला केवळ काम्न्याइतक्या[१] अंतरावरच खालीं दृष्टि ठेवून चालत आहे. (६)

४११. ज्याची दृष्टि खालीं आहे व जो स्मृतिमान्, तो हा नीच कुळांतील्सा दिसत नाहीं हा भिक्षु कोठें जातो हें पाहण्यासाठीं राजदूतांना दवडू या. (७)

१ युगमात्र—गाडीला किंवा नांगराला जुंपलेल्या बैलाच्या मानेवरील जुंवाइतक्याच अंतरावर.

४१२ ते पेसिता राजदूता पिट्ठितो अनुबन्धिसु ।
कुहिं गमिस्सति भिक्खु कत्थ वासो भविस्सति ॥ ८ ॥

४१३ सपदानं चरमानो गुत्तद्वारो सुसंवुतो ।
खिप्पं पत्तं अपूरेसि सम्पजानो पतिस्सतो ॥ ९ ॥

४१४ स पिण्डचारं चरित्वा निक्खम्म नगरा मुनि ।
पण्डवं अभिहारेसि एत्थ वासो भविस्सति ॥ १० ॥

४१५ दिस्वान वासूपगतं ततो दूता उपाविसुं ।
एको च दूतो आगन्त्वा राजिनो पटिवेदयि ॥ ११ ॥

४१६ एस भिक्खु महाराज पण्डवस्स पुरक्खतो ।
निसिन्नो व्यग्घुसभो व सीहो व गिरिगब्भरे ॥ १२ ॥

---

४१२ याप्रमाणें पाठविलेले ते राजदूत तो भिक्षु कोठें जातो व कोठें राहतो, हें पाहण्यासाठीं त्याच्या मागोमाग गेले (८)

४१३. गुप्तेन्द्रिय, सुसंवृत, सावध व जागृत अशा त्यानें (लहान मोठें घर वर्ज्य न करता) ओळीनें भिक्षा घेऊन आपलें पात्र त्वरित भरलें (९)

४१४ तो मुनि भिक्षा घेऊन व नगरातून निघून वस्तीला राहण्यासाठीं पांडव पर्वतापाशीं आ[illegible]

४१५ वस्तीस राहिलेल्या त्याला पाहून ते दूत तेथेंच बसले, आणि त्यापैकीं एकानें येऊन राजाला हें वर्तमान दिलें— (११)

४१६ महाराज, ता हा भिक्षु गिरिगव्हरात राहणाऱ्या व्याघ्रासारखा, ऋषभासारखा किंवा सिंहासारखा पांडव पर्वताच्या पायथ्याशीं बसला आहे. (१२)

४१७ सुत्वान दूतवचनं भद्दयानेन खत्तियो ।
तरमानरूपो निय्यासि येन पण्डवपब्बतो ॥ १३ ॥
४१८ स यानभूमिं यायित्वा याना ओरुय्ह खत्तियो ।
पत्तिको उपसंकम्म आसज्ज नं उपाविसि ॥ १४ ॥
४१९ निसज्ज राजा सम्मोदि कथं सारणियं[1] ततो ।
कथं सो वीतिसारेत्वा इममत्थं अभासथ— ॥ १५ ॥
४२० युवा च दहरो चासि पठमुप्पत्तिका[2] सुसु ।
वण्णारोहेन सम्पन्नो जातिमा विय खत्तियो ॥ १६ ॥
४२१ सोभयन्तो अनीकग्गं नागसंघपुरक्खतो ।
ददामि भोगे भुञ्जस्सु जातिं चऽक्खाहि पुच्छितो ॥ १७ ॥

१ रो०—साराणियं  २ सी०—पठमुप्पत्तिया.

४१७ दूताचें वचन ऐकून तो क्षत्रिय राजा त्वरित उत्तम यानातून पांडवपर्वताकडे जाण्यास निघाला (१३)

४१८. यानानें जाण्याचा रस्ता होता तोंपर्यंत यानानें जाऊन, तो क्षत्रिय यानातून खालीं उतरला, व पायींच त्याच्या जवळ जाऊन बसला. (१४)

४१९ बसून त्या राजानें त्याला कुशल-प्रश्नादिक विचारले, व कुशल प्रश्नाचें भाषण संपवून, तो त्यास याप्रमाणें बोलला— (१५)

४२० "तू जवान, लहान, पूर्ववयांत असलेला कुमार आहेस. कान्तीनें आणि वाढ्यानें संपन्न असा तू जातिवन्त क्षत्रियासारखा दिसतोस (१६)

४२१. तुला मी संपत्ति देतों तिचा उपभोग घे, व हत्तिसंघानें पुरस्कृत असा तू माझ्या सेनाग्राला शोभा आण मात्र मी विचारतों कीं जन्मानें तू कोण आहेस तें तेवढें सांग" (१७)

४२२ उजुं जनपदो राजा हिमवन्तस्स पस्सतो ।
धनविरियेन सपन्नो कोसलेसु निकेतिनो ॥ १८ ॥
४२३ आदिच्चा नाम गोत्तेन साकिया नाम जातिया ।
तम्हा कुला पब्बजितो (ऽम्हि राज) न कामे अभिपत्थयं ॥ १९ ॥
४२४ कामेस्वादीनवं दिस्वा नेक्खम्मं दट्ठु खेमतो ।
पधानाय गमिस्सामि एत्थ मे रञ्जति मनो' ति ॥ २० ॥

पब्बज्जासुत्तं निट्ठितं ।

२८

## [ २. पधानसुत्तं ]

४२५ तं मं पधानपहितत्तं नदिं नेरञ्जरं पति । near, to
विपरक्कम्म झायन्तं योगक्खेमस्स पत्तिया ॥ १ ॥

---

१ सी०—जानपदो २ म०--आदिच्चो. ३ म० -साकियो.

---

४२२. " हे राजा, येथून सरळ हिमालयाच्या पायथ्याशीं धनानें आणि शौर्यानें संपन्न अशा कोसल राष्ट्रांत राहणारे लोक आहेत. (१८)

४२३. ते लोक गोत्रानें आदित्य व जन्मतः शाक्य. त्या कुळांतून निघून मीं प्रव्रज्या घेतली, ती संपत्तीच्या इच्छेनें नव्हे. ( १९ )

४२४. विषयोपभोगांत दोष व नैष्कर्म्यांत निर्भयता पाहून मी तपाचरणासाठीं जात आहें. यातच माझ्या मनाला आनंद वाटतो.' (२०)

पब्बज्जासुत्त समाप्त

## [ २. पधानसुत्त ]

४२५. त्या मला, नेरंजरा नदीच्या तीरीं योगक्षेम (जें निर्वाण) त्याच्या प्राप्तीसाठीं मी प्रयत्नांत गढून गेलों असतां, व अत्यंत दक्षतेनें ध्यान करीत असतां, ( १ )

४२६ नमुची करुण वाच भासमानो उपागमि ।
किसो त्वमसि दुब्बण्णो सन्तिके मरण तव ॥ २ ॥

४२७ सहस्सभागो मरणस्स एकंसो तव जीवितं ।
जीव भो जीवितं सेय्यो जीव पुञ्ञानि काहसि ॥ ३ ॥

४२८ चरतो च ते ब्रह्मचरियं अग्गिहुत्तं च जूहतो ।
पहूतं चीयते पुञ्ञं किं पधानेन काहसि ॥ ४ ॥

४२९ दुग्गो मग्गो पधानाय दुक्करो दुरभिसम्भवो ।
इमा गाथा भणं मारो अट्ठा बुद्धस्स सन्तिके ॥ ५ ॥

१ म०- नमुचि. २ प०--जीव

४२६ नमुचि ( मार ) मजजवळ येऊन करुणवाणीनें म्हणाला—"तू कृश आणि दुर्वर्ण झाला आहेस, मरण तुझ्या जवळ आलें आहे ( २ )

४२७. हजार वाट्यानीं तू मरणार, तुझ्या आयुष्याचा एक वाटा बाकी आहे. भो, तू जिवन्त रहा, जगणें चांगलें, जगल्यानें तू पुण्य करू शकशील. ( ३ )

४२८. ब्रह्मचर्याचें आचरण व अग्निहोत्राचें पालन केलें असता तुला पुष्कळ पुण्य मिळेल हा निर्वाणार्थ प्रयत्न करून काय फायदा ? ( ४ )

४२९. निर्वाणाच्या प्रयत्नाचा मार्ग कठिण, दुष्कर आणि दुष्प्राप्य आहे" या गाथा म्हणून मार बुद्धासमोर उभा राहिला ( ५ )

४३० तं तथावादिनं मारं भगवा एतदब्रवि।
पमत्तबन्धु पापिम येनऽत्थेन इधागतो ॥ ६ ॥
४३१ अणुमत्तेनऽपि पुञ्ञेन अत्थो मय्हं न विज्जति।
येसं च अत्थो पुञ्ञानं ते मारो वत्तुमरहति ॥ ७ ॥
४३२ अत्थि सद्धा ततो विरियं पञ्ञा च मम विज्जति।
एवं मे पहितऽत्तऽपि किं जीवमनुपुच्छसि ॥ ८ ॥
४३३ नदीनमपि सोतानि अयं वातो विसोसये।
किं च मे पहितऽत्तस्स लोहितं नूपसुस्सये ॥ ९ ॥

१ सी०-एतदबुवि. २ म०-तपो. ३ म०-जीवमनुपुच्छय. ४-४सी०, म०- किंचि.

४३०. तसें बोलणाऱ्या त्या माराला भगवान् म्हणाला— " हे प्रमत्तबन्धु, पापी मारा, तूं कशासाठीं आलास (हें मी जाणतों) (६)

४३१. मला त्या पुण्याच्या अणुमात्रेचीही जरूरी नाहीं. ज्यांना तसें पुण्य पाहिजे असेल, त्यांना मारानें या गोष्टी सांगाव्यात. (७)

४३२. माझें ठायीं श्रद्धा आहे, उत्साह आहे आणि प्रज्ञा आहे. या प्रमाणें मी दृढचित्त असतां तूं मला 'जग' म्हणून कां सांगतोस ? (८)

४३३. माझ्या शरीरांतील हा (उत्साहरूपी) वारा नद्यांचें प्रवाहही शोषित करील; तर मग दृढचित्त असलेल्या माझें रक्त शोषित कसें न करील ! (९)

४३४ लोहिते सुस्समानम्हि पित्तं सेम्हं च सुस्सति।
मंसेसु खीयमानेसु भिय्यो चित्तं पसीदति।
भिय्यो सति च पञ्ञा च समाधि मम तिट्ठति ॥ १० ॥
४३५ तस्स मे'व विहरतो पत्तस्सुत्तमवेदनं।
कामे नापेक्खते चित्तं पस्स सत्तस्स सुद्धतं ॥ ११ ॥
४३६ कामा ते पठमा सेना दुतिया अरति वुच्चति।
ततिया खुप्पिपासा ते चतुत्थी तण्हा पवुच्चति ॥ १२ ॥
४३७ पञ्चमं थीनमिद्धं ते छट्ठा भीरुपवुच्चति।
सत्तमी विचिकिच्छा ते मक्खो थम्भो ते अट्ठमो ॥ १३ ॥
४३८ लाभो सिलोको सक्कारो मिच्छालद्धो च यो यसो।
यो चत्तानं समुक्कंसे परे च अवजानति ॥ १४ ॥

१ म०—सद्धतं.

४३४. रक्त शोषित झालें, म्हणजे पित्त आणि कफ शोषित होतात; आणि मांस क्षीण झालें म्हणजे माझें चित्त तर विशेषच प्रसन्न होतें, आणि माझी स्मृति, प्रज्ञा आणि समाधि अधिकतर स्थिर होतात. (१०)

४३५. याप्रमाणें उत्तम अनुभव प्राप्त करून घेऊन राहत असतां, माझें चित्त कामोपभोगाची अपेक्षा धरीत नाहीं. ही तूं सत्त्व-शुद्धि पाहा. (११)

४३६. कामोपभोग ही तुझी पहिली सेना आहे, दुसरी अरति, तिसरी तहानभूक आणि चवथी तृष्णा; (१२)

४३७. पांचवी अनुत्साह व आळस, सहावी भीति, सातवी कुशंका, परगुणांबद्दल तिरस्कार आणि दुराग्रह आठवी. (१३).

४३८ लाभ, कीर्ति, सत्कार आणि खोट्या मार्गानें मिळविलेलें यश, ज्याच्या योगें मनुष्य आत्मस्तुति आणि परनिंदा करतो—(१४)

४३९ एसा नमुचि ते सेना कण्हस्साभिप्पहारिणी ।
न तं असूरो जिनाति जेत्वा च लभते सुखं ।। १५ ।।
४४० एस मुञ्जं परिहरे धिरत्थु इध जीवितं ।
संगामे मे मतं सेय्यो यं चे जीवे पराजितो ।। १६ ।।
४४१ पगाळ्हा एत्थ न दिस्सन्ति एके समणब्राह्मणा ।
तं च मग्गं न जानन्ति येन गच्छन्ति सुब्बता ।। १७ ।।
४४२ समन्ता धजिनिं दिस्वा युत्तं मारं सवाहनं ।
युद्धाय पच्चुग्गच्छामि मा मं ठाना अचावयि ।। १८

१ रो०-°हारणी.

४३९. हे नमुचि, तुझी कृष्णाची ही इतरांवर प्रहार करणारी सेना होय. तिला दुबळा माणूस जिंकू शकत नाहीं. पण (जो शूर) तिला जिंकतो, तो सुख लाभतो. (१५)

४४०. हा मी मुंज-तृण (मस्तकीं)[१] धारण करतो. (तुझ्या सेनेकडून पराभूत झाल्यास) माझ्या जीविताचा धिक्कार असो! पराजय पावून जगण्यापेक्षां संग्रामांत मला मरण आलेलें चांगलें! (१६)

४४१. कित्येक श्रमण-ब्राह्मण या तुझ्या सैन्यांत निमग्न झाल्याकारणानें प्रकाशित होत नाहींत, आणि सुव्रत ज्या मार्गानें जातात, तो मार्ग ते जाणत नाहींत. (१७)

४४२. आसमंतात् लढाईला सिध्द झालेल्या मारसेनेला आणि वाहनारूढ माराला पाहून, त्यानें मला स्थानभ्रष्ट करूं नये म्हणून मी युध्दाला पुढें सरसावतों. (१८)

१ लढाईस जातांना शूर योद्धे डोक्यावर, तरवारीस किंवा झेंड्यास मुंज नांवाचें गवत बांधीत असत. त्याचा अर्थ इतकाच कीं, आम्हीं लढाईंत मरूं, पण पराजय पावून मागें फिरणार नाहीं.

४४३ य ते त नप्पसहति सेन लोको सदेवको ।
त ते पञ्ञाय गच्छामि आमं पत्तं'व अस्मना ॥ १९ ॥
४४४ वसिं करित्वान सङ्कप्पं सतिं च सुप्पतिट्ठितं ।
रट्ठा रट्ठं विचरिस्सं सावके विनयं पुथु ॥ २० ॥
४४५ ते अप्पमत्ता पहितत्ता मम सासनकारका ।
अकामस्स ते गमिस्सन्ति यत्थ गन्त्वा न सोचरे ॥ २१ ॥
४४६ सत्त वस्सानि[1] भगवन्तं अनुबन्धिं पदापदं ।
ओतारं नाधिगच्छिस्सं सम्बुद्धस्स सतीमतो ॥ २२ ॥
४४७ मेदवण्णं'व पासाणं वायसो अनुपरियगा ।
अपेत्थ मुदुं विन्देम अपि अस्सादना सिया ॥ २३ ॥

१ रो०–अम्हना. २ म०–सत्तवस्स. ३ म०–अनुपरीयगा.

४४३. ज्या तुझ्या सेनेसमोर देव आणि मनुष्यें टिकत नाहींत तिचा, कच्चें मातीचें भांडें दगडानें फोडावें त्याप्रमाणें, प्रज्ञेनें मी विध्वंस करतों. ( १९ )

४४४ माझे संकल्प स्वाधीन ठेवून, स्मृति सुस्थित करून, अनेक श्रावकांना उपदेश देत मी देशोदेशीं फिरत राहीन. ( २० )

४४५ ते अप्रमत्त, दृढचित्त होऊन माझ्या उपदेशाप्रमाणें वागणारे, तुझ्या इच्छेविरुद्ध, अशा स्थानीं जातील कीं, जेथें जाऊन ते शोक करीत बसणार नाहींत. ( २१ )

४४६. (मार–) "भगवताच्या मागोमाग सात वर्षें सारखा फिरत राहिलों; पण या स्मृतिमान् संबुद्धाचें छिद्र मला सांपडलें नाहीं. ( २२ )

४४७ 'येथें काहीं मृदु ( मांस ) असेल व आस्वाद असेल,' अशा समजुतीनें कावळा मेदवर्ण पाषाणाजवळ आला. ( २३ )

४४८ अलद्धा तत्थ अस्सादं वायसेत्तो अपक्कमि ।
काको'व सेलमासज्ज निब्बिज्जापेम गोतमं ॥ २४ ॥
४४९ तस्स सोकपरेतस्स वीणा कच्छा अभस्सथ ।
ततो सो दुम्मनो यक्खो तत्थेवऽन्तरधायथा ति ॥ २५॥

पधानसुत्तं निट्ठितं ।

२९

[ ३. सुभासितसुत्तं ]

एवं मे सुतं । एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने....पे० ...भगवा एतदवोच—चतूहि भिक्खवे अङ्गेहि समन्नागता वाचा सुभा-

१ सी०—सेलमावज्ज.२ सं. नि. १. १२४[c]. १२७[17] गोतमा ।

४४८. पण त्यांत काहींच आस्वाद न सापडल्यामुळें कावळा तेथून निघून गेला. तो कावळा जसा त्या शिळेवर प्रहार करून निराश होऊन पळाला, तसा मी गोतमापासून निराश होऊन निघून जातों." ( २४ )

४४९. शोकाकुल झालेल्या त्या माराच्या काखेंतून वीणा गळून पडली, तदनंतर खिन्न झालेला तो यक्ष ( मार ) तेथेंच अन्तर्धान पावला. ( २५ )

पधानसुत्त समाप्त

२९

[ ३. सुभासितसुत्त ]

असें मी ऐकलें आहे. एके समयीं भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामांत राहत होता. तेथें भगवान् भिक्षूंना उद्देशून

सिता होति, न दुब्भासिता, अनवज्जा च अननुवज्जा च विञ्ञूनं। कतमेहि चतूहि। इध भिक्खवे भिक्खु सुभासितं येव भासति नो दुब्भासितं, धम्मं येव भासति नो अधम्मं, पियं येव भासति नो अप्पियं, सच्चं येव भासति नो अलिकं। इमेहि खो भिक्खवे चतूहि अङ्गेहि समन्नागता वाचा सुभासिता होति, नो दुब्भासिता, अनवज्जा च अननुवज्जा च विञ्ञूनं ति। इदमवोच भगवा, इदं वत्वा सुगतो अथापरं एतदवोच सत्था—

४५० सुभासितं उत्तममाहु सन्तो। धम्मं भणे नाधम्मं तं दुतियं।
पियं भणे नाप्पियं तं ततियं। सच्चं भणे नालिकं तं चतुत्थं॥१॥

१ म०—अनुवज्जा

म्हणाला, ' हे भिक्षूनो ' ' भदन्त ' असें त्या भिक्षूंनी भगवंताला उत्तर दिलें तेव्हा भगवान् म्हणाला—भिक्षूंनो, चार अंगानीं जी संपन्न, ती सुभाषित वाणी ती दुर्भाषित नव्हे ता निर्दोष आणि पंडिताना मान्य होय तीं चार अंगें कोणतीं? एखादा भिक्षु सुभाषितच बोलतो, दुर्भाषित बोलत नाहीं, धर्मच बोलतो, अधर्म बोलत नाहीं, प्रियच बोलतो, अप्रिय बोलत नाहीं, सत्यच बोलतो, असत्य बोलत नाहीं—या चार अंगानीं संपन्न, ती सुभाषित वाणी, दुर्भाषित नव्हे, ती निर्दोष आणि पंडिताना मान्य होय, असें भगवान् बोलला असें बोलून तदनंतर तो सुगत शास्ता आणखी असें म्हणाला—

४५० संत असें म्हणतात कीं, सुभाषित ( वाणी बोलणें ) ही उत्तम गोष्ट, धर्म बोलावा, अधर्म बोलू नये ही दुसरी, प्रिय बोलावें, अप्रिय बोलू नये ही तिसरी, सत्य बोलावें असत्य बोलू नये ही चवथी ( १ )

अथ खो आयस्मा वंगीसो उट्ठायासना एकंसं चीवरं कत्वा येन भगवा तेनऽञ्जलिं पणामेत्वा भगवन्तं एतदवोच—पटिभाति मं सुगता ति। पटिभातु तं वंगीसा ति भगवा अवोच। अथ खो आयस्मा वंगीसो भगवन्तं सम्मुखा सारुप्पाहि गाथाहि अभित्थवि—

४५१ तमेव भासं भासेय्य यायऽत्तानं न तापये।
परे च न विहिंसेय्य सा वे वाचा सुभासिता ॥ २ ॥

४५२ पियवाचमेव भासेय्य या वाचा पटिनन्दिता।
यं अनादाय पापानि परेसं भासते पियं ॥ ३ ॥

४५३ सच्चं वे अमता वाचा एस धम्मो सनन्तनो।
सच्चे अत्थे च धम्मे च आहु सन्तो पतिट्ठिता ॥ ४ ॥

---

त्यावर आयुष्मान् वंगीस आसनावरून उठला व एका खांद्यावर चीवर करून भगवंतासमोर अंजलि करून भगवन्ताला म्हणाला— 'भगवन्, मी बोलूं इच्छितों.' 'वंगीस, तुला बोलावयाचें असेल तें बोल,' असें भगवान् म्हणाला. तेव्हां आयुष्मान् वंगीसानें योग्य गाथांनी भगवन्ताची समक्ष स्तुति केली—

४५१. अशीच वाणी बोलावी कीं जिच्यामुळें आपणांवर पश्चात्ताप करण्याची पाळी येत नाहीं, व इतरांना त्रास होत नाहीं; तीच खरी सुभाषित वाणी होय. (२)

४५२. जिच्यायोगें बोलणारा दुसऱ्याच्या वाईट गोष्टींचा विचार न करतां प्रिय तेवढेंच बोलतो, अशी इतरांना आवडणारी जी प्रिय वाचा तीच बोलावी. (३)

४५३. पण सत्य वाणी अमृतवाणी होय, व हा सनातन धर्म होय. सत्य, सदर्थ आणि धर्म यांतच संत दृढ राहतात असें म्हणतात. (४)

४५४ यं बुद्धो भासती[1] वाचं खेमं निब्बानपत्तिया।
दुक्खस्सऽन्तकिरियाय सा वे वाचानमुत्तमा ति ॥ ५ ॥

सुभासितसुत्तं निट्ठितं।

---

## ३०

## [ ४ सुन्दरिकभारद्वाजसुत्तं[2] ]

एवं मे सुतं। एकं समयं भगवा कोसलेसु विहरति सुन्दरिकाय नदिया तीरे। तेन खो पन समयेन सुन्दरिकभारद्वाजो ब्राह्मणो सुन्दरिकाय नदिया तीरे अग्गिं जुहति, अग्गिहुत्तं परिचरति। अथ खो सुन्दरिकभारद्वाजो ब्राह्मणो अग्गिं जुहित्वा अग्गिहुत्तं परिचरित्वा,

---

१ म०-भासति, २ अ०-पूरळासुत्त.

---

४५४. निर्वाणप्राप्तीसाठी व दुःखाचा अन्त करण्यासाठी जी क्षेमकारक वाचा बुद्ध बोलतो, तीच सर्व वाचांत उत्तम वाचा होय. (५)

सुभाषितसुत्त समाप्त

---

## ३०

## [ ४. सुन्दरिकभारद्वाजसुत्त ]

असें मी ऐकलें आहे. एके समयीं भगवान् कोसल देशांत सुन्दरिका नदीच्या तीरीं राहत होता. त्या काळीं सुन्दरिक भारद्वाज ब्राह्मण सुन्दरिका नदीच्या तीरीं अग्नीला हवन करीत होता व अग्निहोत्र पाळत होता. तेव्हां सुन्दरिक भारद्वाज ब्राह्मण अग्नीची पूजा करून

उट्ठायासना समन्ता चतुद्दिसा अनुविलोकेसि—को नु खो इम हव्यसेस भुञ्जेय्या ति। अद्दसा खो सुन्दरिकभारद्वाजो ब्राह्मणो भगवन्त अविदूरे अञ्ञतरस्मिं रुक्खमूले ससीसं पारुपत निसिन्नं, दिस्वान वामेन हत्थेन हव्यसेस गहेत्वा, दक्खिणेन हत्थेन कमण्डलु गहेत्वा, येन भगवा तेनुपसकमि। अथ खो भगवा सुन्दरिकभारद्वाजस्स ब्राह्मणस्स पदसद्देन सीसं विवरि। अथ खो सुन्दरिकभारद्वाजो ब्राह्मणो, मुण्डो अयं भवं, मुण्डको अयं भवं ति ततो व पुन निवत्तितुकामो अहोसि। अथ खो सुन्दरिकभारद्वाजस्स ब्राह्मणस्स एतदहोसि-मुण्डाऽपि हि इधेकच्चे ब्राह्मणा भवन्ति, यन्नूनाहं उपसङ्कमित्वा जातिं पुच्छेय्यं'ति। अथ खो सुन्दरिकभारद्वाजो ब्राह्मणो येन भगवा तेनुपसकमि, उपसङ्कमित्वा भगवन्त

१ म०–हब्य°.

व अग्निहोत्राचें काम आटोपून आणि आसनावरून उठून, हव्यशेष अन्न खाण्याला कोणी आहे की काय हें पाहण्यासाठीं चारही दिशाना अवलोकन करूं लागला तेव्हा सुन्दरिक भारद्वाज ब्राह्मणानें जवळच्या एका वृक्षाखालीं डोक्यावरून पांघरूण घेऊन बसलेल्या भगवन्ताला पाहिलें. पाहून डाव्या हातात हव्यशेष अन्न घेऊन व उजव्या हातात कमडलु घेऊन तो भगवन्तापाशीं आला. तेव्हा सुंदरिक भारद्वाज ब्राह्मणाचा पदशब्द ऐकून भगवन्तानें आपल्या डोक्यावरचें पांघरूण काढलें. तेव्हा, ' अरे ! हा तर मुण्ड आहे, मुडका आहे ! ' असें म्हणून सुन्दरिक भारद्वाज ब्राह्मण तेथूनच मागें वळण्याचा विचार करूं लागला. पण सुन्दरिक भारद्वाज ब्राह्मणाला असें वाटलें कीं, मुंडापैकींही कांहीं ब्राह्मण असतात, तेव्हा याच्याजवळ जाऊन तो जन्मानें कोण आहे हें विचारावें हें बरें. तेव्हां सुन्दरिक भारद्वाज ब्राह्मण भगवन्तापाशीं आला. येऊन भगवन्ताला म्हणाला —' तू

Tri-Caste

एतदवोच–किंजच्चो भवं ति। अथ खो भगवा सुन्दरिकभारद्वाजं ब्राह्मणं गाथाहि अज्झभासि—

४५५ न ब्राह्मणो नोऽम्हि न राजपुत्तो। न वेस्सायनो उद कोचि नोऽम्हि
गोत्तं परिञ्ञाय पुथुज्जनानं। अकिंचनो मन्त चरामि लोके ॥ १॥

४५६ सघाटिवासी अगहो चरामि। निवुत्तकेसो अभिनिब्बुतऽत्तो।
अलिप्पमानो इध माणवेहि। अकल्लं मं (ब्राह्मण) पुच्छसि गोत्तपञ्हं ॥ २ ॥

४५७ पुच्छन्ति वे भो ब्राह्मणा ब्राह्मणेहि। सह ब्राह्मणो नो भवं ति।
ब्राह्मणो चे त्वं ब्रूसि मं च ब्रूसि अब्राह्मणं।
तं सावित्तिं पुच्छामि तिपदं चतुवीसतक्खरं ॥ ३ ॥

१ म०–पुत्र. २ सी०, अ०–अगिहो. ३ म०–अकाल ४ रो०–पुच्छि

जन्मत कोण आहेस ?' त्यावर भगवान् सुन्दरिक भारद्वाज ब्राह्मणाला गाथांनीं बोलला—

४५५ मी ब्राह्मण नव्हे की, राजपुत्र नव्हे वैश्य नव्हे, अथवा कोणीहि नव्हे सामान्य जनांचे गोत्र ओळखून अकिंचन असा मी इहलोकीं प्रज्ञापूर्वक वागतों

४५६ संघाटी (चीवर) पांघरून, मुंडन करून, शांतचित्त, गृहरहित व मनुष्यापासून अलिप्त होऊन मी लोकांत फिरत असतो तेव्हां हे ब्राह्मणा, तुझा हा गोत्रासंबंधींचा प्रश्न अनाठायी आहे. (२)

४५७ (भारद्वाज–) भो, ब्राह्मण ब्राह्मणाला 'तू ब्राह्मण आहेस काय ?' असें विचारतात (भगवान्–) तू आपणाला ब्राह्मण म्हणवतोस, व मला अब्राह्मण म्हणतोस, तर मी तुला तीन पादांची व चोवीस अक्षरांची सावित्री विचारतों. (३)

४५८ 'किं निस्सिता इसयो मनुजा खत्तिया ब्राह्मणा।
देवतान यञ्ञमकप्पयिंसु पुथु इध लोके'' ।
''यदन्तगू वेदगू यञ्ञकाले ।
यस्साहुतिं लभे तस्सिज्झे ति ब्रूमि ॥ ४ ॥ succeed
४५९ अद्धा हि तस्स हुतमिज्झे ( ति ब्राह्मणो )।
य तादिसं वेदगुं अद्दसाम ।
तुम्हादिसानं हि अदस्सनेन । अञ्ञो जनो भुञ्जति पूरळासं॥ ५॥ oblation
४६० तस्मातिह त्वं ब्राह्मण अत्थेन । अत्थिको उपसकम्म पुच्छ ।
सन्तं विधूमं अनिघं निरासं । अप्पेविध अभिविन्दे सुमेधं ॥ ६ ॥

४५८ ( भारद्वाज— ) ऋषि, क्षत्रिय, ब्राह्मण व इतर मनुष्य या जगात देवतांना उद्देशून निरनिराळे यज्ञ कशासाठी करतात? ( भगवान्— ) मी म्हणतो की यज्ञकाली दु:खांतगाला आणि वेदपारगाला ज्याच्याकडून दान मिळेल त्याचा यज्ञ सफल होईल ( ४ )

४५९ तर मग खात्रीनें माझा यज्ञ सफल होईल असें ब्राह्मण म्हणाला. कारण, माझी तुझ्यासारख्या वेदपारगाची भेट झाली तुमच्यासारख्यांची भेट न झाल्याकारणानें इतर जनांना पुरोडाश द्यावा लागतो ( ५ )

४६० ( भगवान्— ) असें जर आहे, तर हे ब्राह्मणा, सदर्थाची इच्छा करणारा असा तू मजपाशीं ये, आणि मला प्रश्न विचार या जगात शांत, निर्धूम, निर्दुःख, निस्तृष्ण व सुज्ञ असा कोण, हें तू जाणू शकशील (६)

४६१ यञ्‍ञे रताह ( भो गोतम ) यञ्‍ञं यिट्ठुकामो ।
नाहं पजानामि अनुसासतु मं भवं । यत्थ हुतं इज्झते ब्रूहि मे तं ७
तेन हि त्वं ब्राह्मण ओदहस्सु सोतं, धम्मं ते देसेस्सामि—
४६२ मा जातिं पुच्छ चरणं च पुच्छ । कट्ठा हवे जायति जातवेदो ।
नीचाकुलीनोऽपि मुनी धितीमा आजानियो होति हिरीनिसेधो ८
४६३ सच्चेन दन्तो दमसा उपेतो । वेदन्तगू वुसितब्रह्मचरियो ।
कालेन तम्हि हव्यं पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥९॥
४६४ ये कामे हित्वा अगेहा[1] चरन्ति । सुसञ्‍ञतत्ता तसरं व उज्जुं ।
कालेन तेसु हव्यं पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥१०॥

---

१ रो०—अगिहा.

---

४६१. ( भारद्वाज— ) भो गोतमा, मी यज्ञांत रत आहें यज्ञ करण्याची माझी इच्छा आहे पण मी हें जाणत नाहीं कीं— मला भवान् उपदेश करो— कोणत्या पात्रीं दान दिलें असतां तें फलद्रूप होतें तें मला सांग. ( ७ )

असें आहे तर, हे ब्राह्मणा, लक्ष दे मी तुला धर्मोपदेश करतों—

४६२. तू जन्माविषयीं विचारू नकोस, आचरण विचार, कारण काष्ठापासूनहि अग्नि होतो आणि नीच कुळांत जन्मलेलाही धैर्यशाली, समजस आणि पापाची लाज वाळगणारा असा मुनि होतो. ( ८ )

४६३. जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करतो त्यानें, सत्यानें दान्त, दमानें युक्त, वेदान्तपारग व ब्रह्मचर्य पूर्ण केलेला नेणारा अशाला योग्य वेळीं हव्य द्यावें ( ९ )

४६४. जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करतो त्यानें, जे सरळ धोट्याप्रमाणें वागणारे सुसंयतात्मा कामोपभोग सोडून गृहरहित होतात, त्यांना योग्य वेळीं हव्य द्यावें. (१०)

४६५ ये वीतरागा सुसमाहितिन्द्रिया । चन्दो व राहुगहणा पमुत्ता ।
कालेन तेसु हब्य पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥ ११

४६६ असज्जमाना विचरन्ति लोके । सदा सता हित्वा ममायितानि ।
कालेन तेसु हब्य पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥ १२॥

४६७ यो कामे हित्वा अभिभुय्य चारी । यो वेदि जातिमरणस्स अन्तं ।
परिनिब्बुतो उदकरहदो व सीतो । तथागतो अरहति पूरळास १३

४६८ समो समेहि विसमेहि दूरे । तथागतो होति अनन्तपञ्ञो ।
अनूपलित्तो इध वा हुरं वा । तथागतो अरहति पूरळास ॥ १४॥

---

४६५ जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करतो त्यानें, जसा चन्द्र राहु-ग्रहणापासून मुक्त तसे जे रागापासून मुक्त व सुसमाहितेन्द्रिय आहेत, त्याना योग्य वेळीं हव्य द्यावें. (११)

४६६ जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करतो त्यानें, जे स्मृतिमान्, ममत्व सोडून व अनासक्त होऊन या जगात हिंडतात, त्याना योग्य वेळीं हव्य द्यावें. (१२)

४६७ जो कामोपभोग सोडून त्यावर मात करून हिंडतो, ज्यानें जन्ममरणाचा अन्त जाणला, जो थंडगार जलाशयाप्रमाणें शांत आहे, असा तथागत पुरोडाश देण्याला योग्य होय (१३)

४६८. तथागत सम मार्गानें चालणाऱ्याशीं समत्वानें वागतो, पण विषम मार्गानें चालणाऱ्यापासून दूर राहतो; त्याच्या प्रज्ञेला पार नाहीं, व तो इहलोकीं किंवा परलोकीं बद्ध होत नाहीं. असा तथागत पुरोडाश देण्याला योग्य होय. (१४)

४६९ यम्हि न माया वसती न मानो। यो वीतलोभो अममो निरासो।
पनुण्णकोधो अभिनिब्बुतत्तो। यो[1] ब्राह्मणो सोकमलं अहासि।
तथागतो अरहति पूरळास ॥ १५ ॥

४७० निवेसनं यो मनसो अहासि। परिग्गहा यस्स न सन्ति केचि।
अनुपादियानो इध वा हुरं वा। तथागतो अरहति पूरळास ॥ १६ ॥

४७१ समाहितो यो उदतारि ओघं। धम्मं चऽञ्ञासि परमाय दिट्ठिया।
खीणासवो अन्तिमदेहधारी। तथागतो अरहति पूरळास ॥ १७ ॥

४७२ भवासवा यस्स वची खरा च। विधूपिता अत्थगता न सन्ति।
स वेदगू सब्बधि विप्पमुत्तो। तथागतो अरहति पूरळास ॥ १८ ॥

१ रो० -सो.

४६९ ज्याच्या अन्तःकरणात माया किंवा अहंकार नाहीं, जो निर्लोभ, अमम, निःस्पृह, विगतक्रोध व शान्त आहे, ज्या ब्राह्मणानें शोकमलाचा त्याग केला आहे, असा तथागत पुरोडाश देण्याला योग्य होय (१५).

४७०. मनाच्या वासना ज्यानें सोडल्या, ज्याला यत्कलाही परिग्रह नाहीं, व जो इहलोकाची किंवा परलोकाची आशा धरीत नाहीं, तो तथागत पुरोडाश देण्याला योग्य होय (१६)

४७१ जो समाहित होऊन ओघ तरून गेला, ज्यानें परमार्थ दृष्टीनें धर्म जाणला, तो क्षीणाश्रव, अन्तिमदेहधारी तथागत पुरोडाश देण्यास योग्य होय. (१७)

४७२ ज्याच्या संसारवासना व कठोर वाचा दग्ध आणि अस्तंगत होऊन नाहींशा झाल्या, तो वेदपारग, सर्वप्रकारें मुक्त तथागत पुरोडाश देण्याला योग्य होय. (१८)

४७३ सगातिगो यस्स न सन्ति सगा । यो मान-सत्तेसु अ मान सत्तो ।
दुक्ख परिञ्ञाय सखेत्तवत्थु । तथागतो अरहति पूरळास ॥ १९ ॥
४७४ आस अनिस्साय विवेकदस्सी । परवेदिय दिट्ठिमुपातिवत्तो ।
आरम्मणा यस्स न सन्ति केचि । तथागतो अरहति पूरळास ॥२०
४७५ परोवरा यस्स समेच्च धम्मा । विधूपिता अत्थगता न सन्ति ।
सन्तो उपादानखये विमुत्तो । तथागतो अरहति पूरळास ॥२१॥
४७६ सयोजन जातिखयऽन्तदस्सी । योऽपानुदि रागपथ असेस ।
सुद्धो निद्दोसो विमलो अकाचो । तथागतो अरहति पूरळास २२

१ सी०–अकामो.

४७३. सगाच्या पार गेल्यानें ज्याला सग नाहींत, जो अहकार-बद्ध लोकात अहकारापासून मोकळा, दु खाच्या क्षेत्रवस्तूसह ( कारण-परपरेसह ) दु खाला जाणतो, तो तथागत पुरोडाश देण्याला योग्य होय ( १९ )

४७४. आशेत बद्ध न होता जो विवेकदर्शी, इतर साप्रदायिक दृष्टीच्या पलीकडे गेलेला, व ज्याला कोणत्याही (पुनर्भवाच्या कारण बनलेल्या) वासना नाहींत, तो तथागत पुरोडाश देण्याला योग्य होय ( २० )

४७५. लहानमोठे सस्कार जाणून ज्यानें दग्ध केले, ज्याला ते राहिले नाहींत, जो शान्त व तृष्णेच्या क्षयानें विमुक्त, तो तथागत पुरोडाश देण्यास योग्य होय. ( २१ )

४७६. ज्यानें सयोजनाच्या ( क्षयामुळें ) जन्माचा अन्त पाहिला आणि अशेष कामपथाचा त्याग केला, जो शुद्ध, निर्दोष, विमल व अपाप, तो तथागत पुरोडाश देण्यास योग्य होय ( २२ )

१ टीकेला अनुसरून हा अर्थ दिला आहे.

४७७ यो अत्तनाऽत्तान नानुपस्सति । समाहितो उज्जुगतो ठितऽत्तो।
स वे अनेजो अखिलो अकखो । तथागतो अरहति पूरळास ॥२३
४७८ मोहऽन्तरा यस्स न सन्ति केचि । सब्बेसु धम्मेसु च आणदस्सी।
सरीर च अन्तिम धारेति । पत्तो च सम्बोधिमनुत्तर सिव ।
एत्तावता यक्खस्स सुद्धि । तथागतो अरहति पूरळास ॥२४॥
४७९ हुत च मय्ह हुतमत्थु सच्च । य तादिस वेदगुन अलत्थ ।
ब्रह्मा हि सक्खि पटिगण्हातु मे भगवा । भुञ्जतु मे भगवा पूरळास २५
४८० गाथाऽभिगीत मे अभोजनेय्य । सपस्सत ब्राह्मण नेस धम्मो ।
गाथाऽभिगीत पनुदन्ति बुद्धा । धम्मे सति ब्राह्मण वुत्तिरेसा २६

---

४७७ जो स्वत ( आपलें ठायीं अन्तर्यामी असा ) आत्मा पाहत नाहीं, जो समाहित, सरळ व स्थितात्मा, तो अप्रकम्प्य, काठिन्य-रहित, नि शक तथागत पुरोडाश देण्यास योग्य होय ( २३ )

४७८. ज्याच्या अन्त करणातून अज्ञानहेतू नष्ट झाले, जो सर्व पदार्थांकडे ज्ञानदृष्टीनें पाहतो, जो अन्तिम शरीर धारण करतो, जो कल्याणकारक लोकोत्तर सबोधाला पावला, व येणेंकरून ज्याची आत्मशुद्धि झाली, तो तथागत पुरोडाश देण्यास योग्य होय. ( २४ )

४७९. (ब्राह्मण— ) आज मला तुझ्यासारखा वेदपारग मिळाला, तेव्हा हें माझें हव्य यथार्थ हव्य होऊं दे साक्षात् ब्रह्मा असा भगवान् हें माझें ( हव्यशेष-अन्न ) ग्रहण करो भगवान् या पुरोडाशाचें भोजन करो ( २५ )

४८० ( भगवान्— ) या अन्नासंबंधीं मी गाथा बोल्लों तेव्हा, तें मला स्वीकारता येत नाहीं. हे ब्राह्मणा, ( तें स्वीकारणें ) हा जाणण्याचा धर्म नव्हे. ज्या अन्नासंबंधीं गाथा म्हटल्या तें अन्न बुद्ध स्वीकारीत नाहींत हे ब्राह्मणा, सदाचाराला हीच पद्धत योग्य आहे. ( २६ )

४८१ अञ्ञेन च केवलिनं महेसिं। खीणासवं कुक्कुच्चवूपसन्तं।
अन्नेन पानेन उपट्ठहस्सु। खेत्तं हि तं पुञ्ञऽपेक्खस्स होति २७

४८२ साधाहं भगवा तथा विजञ्ञं। यो दक्खिणं भुञ्जेय्य मादिसस्स।
यं यञ्ञकाले परियेसमानो। पप्पुय्य तव सासनं ॥ २८ ॥

४८३ सारम्भा यस्स विगता चित्तं यस्स अनाविलं।
विप्पमुत्तो च कामेहि थीनं यस्स पनूदितं ॥ २९ ॥

४८४ सीमन्तानं विनेतारं जातिमरणकोविदं।
मुनिं मोनेय्यसम्पन्नं तादिसं यञ्ञमागतं ॥ ३० ॥

---

४८१. कैवल्य प्राप्त झालेल्या क्षीणपाप व कौकृत्य शांत झालेल्या महर्षीची तू अन्य अन्नपानानें सेवा कर. का कीं, पुण्येच्छूला तो पुण्यक्षेत्रासारखा होय. ( २७ )

४८२. ( ब्राह्मण– ) हे भगवन्, मला आपल्या शासनाचा लाभ घडला आहे, तर आता यज्ञकालीं, शोधूं गेलें असता, माझ्या सारख्याची दक्षिणा घेण्यास योग्य होईल असा कोण, हें मला समजू द्या. ( २८ )

४८३. ( भगवान्– ) ज्याच्या ठायीं विरोधप्रियता नाहीं, ज्याचें चित्त निर्मळ, जो कामोपभोगापासून मुक्त, ज्याचा अनुत्साह दूर झाला, ( २९ )

४८४. ( आत्मपरभावाच्या ) सीमा ज्यानें उल्लंघन केल्या, जो जन्ममरणज्ञानात कुशल, व जो मौनसंपन्न, असा मुनि यज्ञाला आला असता, ( ३० )

---

१. ९२५ व्या गाथेंतील ह्या शब्दावरील टीप पहा. २ टीकाकार ह्या शब्दाचें गूढार्थी विवरण करतो.

४८५ भकुटिं विनयित्वान पञ्जलिका नमस्सथ।
पूजेथ अन्नपानेन एवं इज्झन्ति दक्खिणा ॥ ३१ ॥

४८६ बुद्धो भवं अरहति पुरळासं। पुञ्ञक्खेत्तमनुत्तरं।
आयागो सब्बलोकस्स। भोतो दिन्नं महप्फलं ति ॥ ३२ ॥

अथ खो सुन्दरिकभारद्वाजो ब्राह्मणो भगवन्तं एतदवोच— अभिक्कन्तं भो गोतम....पे०...अनेकपरियायेन धम्मो पकासितो। एसाहं भगवन्तं गोतमं सरणं गच्छामि, धम्मं च भिक्खुसंघं च। लभेय्याहं भोतो गोतमस्स सन्तिके पब्बज्जं, लभेय्यं उपसम्पदं ति। अलत्थ सुन्दरिकभारद्वाजो ब्राह्मणो....पे०...अरहतं अहोसी ति।

सुन्दरिकभारद्वाजसुत्तं निट्ठितं।

---

४८५. भिवया न चढविता, हात जोडून त्याला नमस्कार करा, व अन्नपानानें त्याची पूजा करा. याप्रमाणें दिलेल्या दक्षिणा फलद्रूप होतात. ( ३१ )

४८६. ( ब्राह्मण- ) लोकोत्तर, पुण्यक्षेत्र, सर्व लोकांना पूजनीय असा भगवान् बुद्ध पुरोडाश देण्याला योग्य आहे; भगवन्ताला दिलेलें ( दान ) महत्फलदायक होतें. ( ३२ )

त्यावर सुन्दरिक भारद्वाज ब्राह्मण भगवन्ताला म्हणाला, " धन्य ! धन्य ! भो गोतमा,...." [ इत्यादिक कसिभारद्वाजसुत्ताच्या शेवटीं ( पान २९-३० ) पहा. ]... आयुष्मान् सुन्दरिक भारद्वाज अरहतांपैकीं एक झाला.

सुन्दरिकभारद्वाजसुत्त समाप्त

## ३१

## [ ५. माघसुत्तं ]

Vulture

एवं मे सुतं। एक समय भगवा राजगहे विहरति गिज्झकूटे पब्बते। अथ खो माघो माणवो येन भगवा तेनुपसङ्कमि। उपसङ्कमित्वा भगवता सद्धिं सम्मोदि। सम्मोदनीयं कथं साराणीयं वीतिसारेत्वा एकमन्तं निसीदि। एकमन्तं निसिन्नो खो माघो माणवो भगवन्तं एतदवोच—अहं हि भो गोतम दायको दानपति वदञ्ञू याचयोगो, धम्मेन भोगे परियेसामि, धम्मेन भोगे परियेसित्वा धम्मलद्धेहि भोगेहि धम्माधिगतेहि एकस्स पि ददामि, द्विन्न पि ददामि, तिण्ण पि ददामि, चतुन्न पि ददामि, पञ्चन्नं पि ददामि, छन्न पि ददामि, सत्तन्न पि ददामि, अट्ठन्न पि

## ३१

## [ ५. माघसुत्त ]

असें मीं ऐकलें आहे. एके समयीं भगवान् राजगृह येथें गृध्रकूट पर्वतावर राहत होता. त्या वेळीं माणव ( विद्यार्थी ) माघ भगवन्तापाशीं आला. येऊन त्यानें भगवन्ताला कुशल प्रश्नादिक विचारले. कुशल प्रश्नादिक समाषण संपवून तो एका बाजूला बसला. एका बाजूला बसलेला तो माघ माणव भगवन्ताला म्हणाला, "भो गोतमा, मी दायक, दानपति, वदान्य ( उदारधी ) व याचकप्रिय आहें. मी धर्ममार्गानें संपत्ति मिळवतों. धर्ममार्गानें संपत्ति मिळवून, त्या धर्ममार्गानें मिळविलेल्या, धर्ममार्गानें उपार्जिलेल्या संपत्तींतून, एकालाही

ददामि, नवन्नं पि ददामि, दसन्नं पि ददामि, वीसायऽपि ददामि, तिंसायऽपि ददामि, चत्तारीसायऽपि ददामि, पञ्ञासायऽपि ददामि, सतस्सऽपि ददामि, भिय्योऽपि ददामि; कच्चाहं भो गोतम एवं ददन्तो एवं यजन्तो बहु पुञ्ञं पसवामी ति। तग्घ त्वं माणव एवं ददन्तो एवं यजन्तो बहुं पुञ्ञं पसवसि। यो खो माणव दायको दानपति वदञ्ञू याचयोगो धम्मेन भोगे परियेसति, धम्मेन भोगे परियेसित्वा धम्मलद्धेहि भोगेहि धम्माधिगतेहि एकस्स पि ददाति...पे०.... सतस्स पि ददाति, भिय्योऽपि ददाति, बहु सो पुञ्ञं पसवती ति। अथ खो माघो माणवो भगवन्तं गाथाय अज्झभासि—

---

देतों, दोघांनाही देतों, तिघांनाही देतों, चौघांनाही देतों, पाचांनाही देतों सहानाही देतों, सातानाही देतों, आठांनाही देतों, नवानाही देतों, दहानाही देतों, विसानाही देतों, तिसांनाही देतों, चाळीसांनाही देतों, पन्नासानाही देतों, शभरांनाही देतों; त्याहून अधिक माणसांनाही देतों. भो गोतमा, याप्रमाणें देत असतां, याप्रमाणें यज्ञ करीत असतां माझें पुण्य पुष्कळ वाढतें काय?" "हे माणवा (विद्यार्थ्या), याप्रमाणें देत असतां, याप्रमाणें यज्ञ करीत असतां, तुझें पुण्य खात्रीनें वाढत आहे. हे माणवा, जो दायक, दानपति, वदान्य व याचकप्रिय माणूस धर्ममार्गानें.... ..इत्यादिक........ शंभरानाही देतो, त्याहून जास्त माणसांनाही देतो, त्याचें पुण्य पुष्कळ वाढतें." त्यावर माघ माणव भगवन्ताला गाथेनें बोलला—

४८७ पुच्छामहं भो गोतम वदञ्ञु ( इति माघो माणवो ) । कासायवासिं अगहं चरन्तं ।
यो याचयोगो दानपति गहट्ठो पुञ्ञत्थिको यजति पुञ्ञपेक्खो
ददं परेस इध अन्नपानं । कत्थ हुतं यजमानस्स सुज्झे ॥ १ ॥

४८८ (यो) याचयोगो दानपति गहट्ठो (माघा ति भगवा) । पुञ्ञत्थिको यजति पुञ्ञपेक्खो ।
ददं परेस इध अन्नपानं । आराधये दक्खिणेय्ये हि[1] तादि ॥२॥

१-१. रो०, अ०—दक्खिणेय्येहि.

४८७ काषाय वस्त्र धारण करणाऱ्या, गृहरहित फिरणाऱ्या व याचकाच्या भाषणाचा अभिप्राय जाणणाऱ्या भवान् गोतमाला मी विचारतों कीं—असें माघ माणव म्हणाला —इहलोकीं इतराना अन्नपान दान देणारा, जो याचकप्रिय दानपति गृहस्थ पुण्याच्या अपेक्षेनें पुण्यप्राप्तीसाठीं यज्ञ करतो, अशा यजमानाचें दान कोणत्या पात्रीं दिल्यानें शुद्ध होतें ? ( १ )

४८८ इहलोकीं इतराना अन्नपान दान देणारा—हे माघा, असें भगवान् म्हणाले —जो याचकप्रिय दानपति गृहस्थ पुण्याच्या अपेक्षेनें पुण्यप्राप्तीसाठीं यज्ञ करतो, अशा माणसानें दक्षिणार्हांची आराधना करावी ( २ )

१ अक्षरानुन अर्थ काढण्याचा प्रयत्न करणाऱ्या टीकाकाराच्या अर्था प्रमाणें. पण 'उदारधी ' हाच ' वदञ्ञु ( वदान्य ) ' शब्दाचा सरळ अर्थ दिसतो

२. टीकाकार ' दक्खिणेय्येहि ' असा पाठ घेऊन, ' असा माणूस दक्षिणार्हांच्या मदतीनें आपलं दान ( यज्ञ ) शुद्ध करतो ' असा अर्थ देतो

४८९ यो याचयोगो दानपति गहट्ठो ( इति माघो ) । पुञ्ञऽत्थिको यजति पुञ्ञऽपेक्खो ।
दद परेस इध अन्नपानं । अक्खाहि मे भगवा दक्खिणेय्ये ॥३॥
४९० ये वे असत्ता विचरन्ति लोके । अकिंचना केवलिनो यतऽत्ता ।
कालेन तेसु हव्यं पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥४॥
४९१ ये सब्बसंयोजनबन्धनच्छिदा । दन्ता विमुत्ता अनिघा निरासा ।
कालेन तेसु हव्यं पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥५॥
४९२ ये सब्बसंयोजनविप्पमुत्ता । दन्ता विमुत्ता अनिघा निरासा ।
कालेन तेसु हव्यं पवेच्छे यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥६॥

---

४८९ इहलोकीं इतराना अन्नपान दान देणारा—असें माघ म्हणाला—जो याचकप्रिय, दानपति गृहस्थ पुण्याच्या अपेक्षेनें पुण्यप्राप्तीसाठीं यज्ञ करतो, त्याला दक्षिणार्ह असे लोक कोणते हें, हे भगवन्, मला सांग ( ३ )

४९० जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करील त्यानें, जे या जगात अनासक्त, अकिंचन, केवली व यतात्मा होऊन राहतात, त्यास वेळोंवेळीं हव्य द्यावें ( ४ )

४९१ जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करील त्यानें, जे सर्व संयोजन-बन्धनें तोडणारे दान्त, विमुक्त, निर्दुःख व निस्तृष्ण असतात, त्याना योग्य वेळीं हव्य द्यावें. ( ५ )

४९२ जो पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करील त्यानें, जे सर्व संयोजनापासून मोकळे, दान्त, विमुक्त, निर्दुःख आणि निस्तृष्ण असतात, त्याना योग्य वेळीं हव्य द्यावें. ( ६ )

४९३ राग च दोस च पहाय मोहं । खीणासवा वुसितब्रह्मचरिया ।
काले तेसु हव्यं पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥७॥
४९४ येसु न माया वसती न मानो । ये वीतलोभा अममा निरासा ।
कालेन तेसु हव्यं पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥८॥
४९५ ये वे न तण्हासु उपातिपन्ना । वितरेय्य ओघं अममा चरन्ति ।
कालेन तेसु हव्यं पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥९॥
४९६ येसं तण्हा नत्थि कुहिञ्चि लोके । भवाभवाय इध वा हुरं वा ।
कालेन तेसु हव्यं पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥१०॥

१-१ खीणासवा वुसितब्रह्मचरिया । २ रो०-येसु तु

४९३ जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करील त्यानें, ज्यानीं काम, राग, द्वेष आणि मोह सोडून देऊन ब्रह्मचर्य पूर्णपणें पाळलें आहे, अशा क्षीणाश्रवाना योग्य वेळीं हव्य द्यावें. ( ७ )

४९४ जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करील त्यानें, ज्याच्या अंतःकरणात माया व अहंकार नाहीं, जे वीतलोभ, अमम व निस्तृष्ण, त्याना योग्य वेळीं हव्य द्यावें ( ८ )

४९५. जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करील त्यानें, जे तृष्णेंत फसलेले नाहींत, ओघ तरून जे अमम राहतात, त्याना योग्य वेळीं हव्य द्यावें ( ९ )

४९६ जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करील त्यानें, ज्याना शाश्वत होण्यासाठीं किंवा उच्छेद पावण्यासाठीं, इहलोकीं किंवा परलोकीं कोठेंहि नेण्यासाठीं तृष्णा नाहीं, त्याना योग्य वेळीं हव्य द्यावें ( १० )

४९७ ये कामे हित्वा अगहा चरन्ति । सुसञ्ञतऽत्ता तसर 'व उज्जु ।
फालेन तेसु हव्य पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥११॥

४९८ ये वीतरागा सुसमाहितिन्द्रिया । चन्दो'व राहुगहणा पमुत्ता ।
कालेन तेसु हव्य पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥१२॥

४९९ समिताविनो वीतरागा अकोपा । येसं गति नत्थि इध विप्पहाय ।
कालेन तेसु हव्य पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥१३॥

५०० जहेत्वा जातिमरणं असेसं । कथंकथं सब्बमुपातिवत्ता ।
कालेन तेसु हव्य पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥१४॥

---

१ रो० उज्जु, म०—उजुं.

४९७. जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करील त्यानें, जे कामोपभोगाचा त्याग करून सरळ धोट्याप्रमाणें सुसंयतात्मा गृहरहित फिरतात, त्यांना योग्य वेळीं हव्य द्यावें. ( ११ )

४९८ जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करील त्यानें, जे वीतराग, सुसमाहितेन्द्रिय व राहुग्रहणापासून मुक्त झालेल्या चन्द्राप्रमाणें मुक्त आहेत, अशांना योग्य वेळीं हव्य द्यावें. ( १२ )

४९९. जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करील त्यानें, जे शमितपाप, वीतराग व अक्रोध, ज्यांना इहलोक सोडल्यावर पुनर्जन्म नाहीं, त्यांना योग्य वेळीं हव्य द्यावें. ( १३ )

५०० जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करील त्यानें, जे अशेष जन्ममरण सोडून सर्व शंकांच्या पार गेले, त्यांना योग्य वेळीं हव्य द्यावें. ( १४ )

५०१ ये अत्तदीपा विचरन्ति लोके । अकिंचना सब्बधि विप्पमुत्ता ।
कालेन तेसु हव्यं पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥१५॥
५०२ ये हेत्थ जानन्ति यथातथा इद । अयमन्तिमा नत्थि पुनब्भवो'ति ।
कालेन तेसु हव्यं पवेच्छे । यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥१६॥
५०३ यो वेदगू झानरतो सतीमा । सम्बोधिपत्तो सरण बहुन्न ।
कालेन तम्हि हव्य पवेच्छे। यो ब्राह्मणो पुञ्ञऽपेक्खो यजेथ ॥१७॥
५०४ अद्धा अमोघा मम पुच्छना अहु । अक्खासि मे भगवा दक्खिणेय्ये ।
त्व हेत्थ जानासि यथातथा इद । तथा हि ते विदितो एस धम्मो १८

१ सी०–एत्थ २ म०–सतिमा.

५०१ जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करील त्यानें, जे अकिंचन, सर्व प्रकारें विमुक्त, या जगात स्वत ला द्वीपं बनवून राहतात, त्याना योग्य वेळीं हव्य द्यावें. (१५)

५०२. जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करील त्यानें, जे आपणास यथार्थतया जाणतात, 'हा आपला शेवटचा जन्म आहे व आपणास पुनर्जन्म नाहीं' हें जाणतात, त्याना योग्य वेळीं हव्य द्यावें (१६)

५०३ जो ब्राह्मण पुण्याच्या अपेक्षेनें यज्ञ करील त्यानें, जो वेदपारग, ध्यानरत, स्मृतिमान्, सबोधि प्राप्त व पुष्कळाना तारणारा, त्याला योग्य वेळीं हव्य द्यावें (१७)

५०४ (माघ–) माझें विचारणें सफल झालें भगवन्तानें दक्षिणार्ह कोण हें मला सांगितलें. हें तू यथातथ्य जाणतोस, कारण हा धर्म तुला माहीत आहे. (१८)

१ समुद्रातील बेटाप्रमाणें सुस्थिर.

५०५ यो याचयोगो दानपति गहट्ठो ( इति माघो माणवो ) । पुञ्ञऽ-
त्थिको यजति पुञ्ञऽपेक्खो ।
दद परेस इव अन्नपान । अक्खाहि मे भगवा यञ्ञसपद ॥१९॥
५०६ यजस्सु यजमानो ( माघा'ति भगवा ) । सब्बत्थ च विप्प-
सादेहि चित्त ।[1]
आरम्भण यजमानस्स यञ्ञ । एत्थ पतिट्ठाय जहाति दोस ॥२०॥
५०७ सो[2] वीतरागो पविनेय्य[3] दोस । मेत्त चित्त भावय अप्पमाण ।
रत्तिं-दिव सतत अप्पमत्तो । सब्बा दिसा फरते अप्पमञ्ञ ॥२१॥

१ प०-यञ्ञो. २ म०-यो. ३ म०, सी०-विनेय्य.

५०५. या जगात इतराना अन्नपान देणारा, जो याचकप्रिय, दानपति गृहस्थ—असें माघ माणव म्हणाला—पुण्याच्या अपेक्षेनें पुण्यप्राप्तीसाठीं यज्ञ करतो, त्याची, हे भगवन्, यज्ञसंपदा कोणती तें मला सांग. ( १९ )

५०६. यजमान होऊन यज्ञ कर—हे माघा, असें भगवान् म्हणाला—सर्वत्र[1] चित्त प्रसन्न ठेव. यज्ञ यजमानाला आलंबनासारखा आहे, ह्यावर स्थिर राहून यजमान द्वेष सोडून देतो. ( २० )

५०७. तो वीतराग द्वेष सोडून अप्रमाण मैत्रीची भावना करणारा, रात्रंदिवस जागृत राहून सर्व दिशा, अप्रमाण (मैत्री, करुणा, मुदिता, उपेक्षा—या ) भावनांनीं भरून टाकतो.

१ टीकाकाराच्या मताप्रमाणें 'सर्वत्र' म्हणजे सर्वकाळीं—दान देण्यापूर्वी, दान देत असताना व दानानंतर ५०९ गाथेवरील टीप पहा.

५०८ को सुज्झति मुचति बज्झति च। केनऽत्तना गच्छति ब्रह्मलोकं।
अजानतो मे मुनि ब्रूहि पुट्ठो। भगवा हि मे सक्खि ब्रह्मऽज्ज दिट्ठो।
तुवं हि नो ब्रह्मसमो ति सच्चं। कथं उप्पज्जति ब्रह्मलोकं
(जुतीमां[1]) ॥ २२॥
५०९ यो यजति तिविधं यञ्ञसंपदं (माघा ति भगवा)। आराधये
दक्खिणेय्ये हि[2] तादि।
एवं यजित्वा सम्मा याचयोगो। उप्पज्जति ब्रह्मलोकं ति ब्रूमी ति २३

[1] सी०-जुतिमा, म०-जुतिम. २-२. रो०,अ०-दक्खिणेय्येहि.

५०८. (माघ—) कोण शुद्ध होतो, कोण मुक्त होतो, कोण बन्ध पावतो, मनुष्य कशानें स्वत: महालोकाला जातो हें, हे मुनि, मला माहीत नाहीं. म्हणून मीं विचारलें असतां मला सांग. कारण, आज मला भगवान् जणूं काय साक्षात् ब्रह्माच भेटला. हे द्युतिमन्, तूं खरोखरच आम्हाला ब्रह्मसम आहेस. तेव्हा मनुष्य ब्रह्मलोकाला कसा जातो हें सांग. (२२)

५०९. जो त्रिविध[1] यज्ञसंपदेनें यज्ञ करतो — हे माघा, असें भगवान् म्हणाला — असा माणूस दक्षिणार्हांची आराधना करील. तो खरा याचकप्रिय याप्रमाणें यज्ञ करून ब्रह्मलोकाला जातो, असें मी म्हणतों (२३)

१ दान देण्यापूर्वी सन्तोष, देताना सन्तोष व दिल्यावर संतोष—याला त्रिविध यज्ञसंपदा म्हणतात दीघनिकाय, कूटदन्तसुत्तांत याला 'तिस्सो विधा' म्हटलें आहे. ( राजवाडे यांचें मराठी भाषांतर पृष्ठ १५९. )

२. गाथा ४८८ वरील टीप पहा.

एवं वुत्ते माघो माणवो भगवन्तं एतदवोच—अभिक्कन्तं भो गोतम—....
पे०....अज्जतग्गे पाणुपेत सरणं गतं'ति ।

माघसुत्तं निट्ठितं।

---

३२

[ ६. सभियसुत्तं ]

एवं मे सुतं । एकं समयं भगवा राजगहे विहरति वेळुवने कलन्दकनिवापे । तेन खो पन समयेन सभियस्स परिब्बाजकस्स पुराणसालोहिताय देवताय पञ्हा उद्दिट्ठा होन्ति–यो ते सभिय समणो वा ब्राह्मणो वा इमे पञ्हे पुट्ठो ब्याकरोति, तस्स सन्तिके ब्रह्मचरियं चरेय्यासी ति । अथ खो सभियो परिब्बाजको तस्सा देवताय सन्तिके

---

असें म्हटल्यावर माघ माणव भगवन्ताला म्हणाला—धन्य ! धन्य ! भो गोतम, ........इत्यादि........ आजपासून आमरण शरण गेलेला मी उपासक आहें, असें भगवान् गोतमानें समजावें.

माघसुत्त समाप्त

---

३२

[ ६. सभियसुत्त ]

असें मी ऐकलें आहे. एके समयीं भगवान् राजगृह येथें वेणुवनांत कलंदक निवापांत राहत होता. त्या वेळीं जी तिच्या पूर्वजन्मीं सभिय परिव्राजकाची नातलग होती अशा एका देवतेनें " सभिया, जो श्रमण अथवा ब्राह्मण हे प्रश्न सोडवील, त्याचा तूं शिष्य होऊन ब्रह्मचर्याचें-पालन कर " असें म्हणून सभिय, परि-

ते पञ्हे उग्गहेत्वा, ये ते समणब्राह्मणा संघिनो गणिनो गणाचरिया ञाता यसस्सिनो तित्थकरा साधुसम्मता बहुजनस्स, सेय्यथीदं—पूरणो कस्सपो, मक्खलि गोसालो, अजितो केसकम्बली[1], पकुधो[2] कच्चायनो, संजयो बेलट्ठिपुत्तो[3], निगण्ठो नातपुत्तो[4]—ते उपसंकमित्वा ते पञ्हे पुच्छति। ते सभियेन परिब्बाजकेन पञ्हे पुट्ठा न सपायन्ति, असपायन्ता कोप च दोस च अप्पच्चय च पातुकरोन्ति, अपि च सभिय येव परिब्बाजकं पटिपुच्छन्ति। अथ खो सभियस्स परिब्बाजकस्स एतदहोसि-ये खो ते भोन्तो समणब्राह्मणा संघिनो गणिनो गणाचरिया ञाता यसस्सिनो तित्थकरा साधुसम्मता बहुजनस्स, सेय्यथीदं—पूरणो कस्सपो ...... पे० ... . निगण्ठो नातपुत्तो—ते मया पञ्हे पुट्ठा न सपायन्ति, असंपायन्ता कोप च दोस च अप्पच्चय च पातुकरोन्ति,

१ सी०, म०—केसकम्बलो. २ सी०—ककुधो. ३ म०—बेलट्ठ°. ४ सी०—नाथपुत्तो, म०—नाट°.

ब्राजकाला काहीं प्रश्न शिकविले होते. तेव्हा सभिय परिव्राजक त्या देवतेपाशीं ते प्रश्न शिकून, जे श्रमण-ब्राह्मण संघनायक गणनायक, गणाचार्य, प्रसिद्ध यशस्वी तीर्थंकर आणि बहुजनांना साधुसम्मत—ते कोणते तर पूर्ण काश्यप, मस्करी गोशाल, अजित केशकम्बली, पकुध कात्यायन, संजय बेलट्ठिपुत्र, आणि निर्ग्रंथ नातपुत्र हे—त्यांजपाशीं जाऊन ते प्रश्न विचारीत होता सभिय परिव्राजकानें प्रश्न विचारले असतां त्यांना उत्तर देतां येत नसे उत्तर देतां येत नसल्यानें कोप, द्वेष आणि दौर्मनस्य प्रकट करीत आणि सभिय परिव्राजकालाच उलट विचारीत. तेव्हा सभिय परिव्राजकाला असें वाटलें कीं, जे ते भदन्त श्रमण ब्राह्मण संघनायक, गणनायक ........इत्यादि ... ...निर्ग्रंथ नातपुत्र हे—यांना मीं प्रश्न विचारले

अपि च मञ्ञेवेत्थ पटिपुच्छन्ति; यन्नूनाहं हीनायावत्तित्वा कामे परिभुञ्जेय्य'न्ति। अथ खो सभियस्स परिब्बाजकस्स एतदहोसि—अयऽपि समणो गोतमो सघी चेव गणी च गणाचरियो च, ञातो यसस्सी तित्थकरो साधुसम्मतो बहुजनस्स, यन्नूनाहं समणं गोतमं उपसङ्कमित्वा इमे पञ्हे पुच्छेय्यं'न्ति। अथ खो सभियस्स परिब्बाजकस्स एतदहोसि—येऽपि खो ते भोन्तो समणब्राह्मणा जिण्णा वुद्धा महल्लका अद्धगता वयो अनुप्पत्ता थेरा रत्तञ्ञू चिरपब्बजिता सङ्घिनो गणिनो गणाचरिया ञाता यसस्सिनो तित्थकरा साधुसम्मता बहुजनस्स, सेय्यथीदं – पूरणो कस्सपो पे० ..निगण्ठो नातपुत्तो—तेऽपि मया पञ्हे पुट्ठा न सम्पायन्ति, असम्पायन्ता कोपं च दोसं च अप्पच्चयं च पातुकरोन्ति, अपि च मञ्ञेवेत्थ पटिपुच्छन्ति, किं पन मे समणो गोतमो इमे पञ्हे पुट्ठो ब्याकरिस्सति। समणो हि गोतमो दहरो चेव जातिया नवो च॰

---

असता त्याना उत्तर देता येत नाहीं, उत्तर देता येत नसल्यानें ते कोप द्वेष आणि दौर्मनस्य प्रकट करितात, आणि मलाच परत विचारतात, तेव्हा ही प्रव्रज्या सोडून पुन गृहस्थ व्हावें हें बरें तरी सभिय परिव्राजकाला वाटलें कीं, हा श्रमण गोतम देखील संघनायक, गणनायक, गणाचार्य, प्रसिद्ध, यशस्वी, तीर्थंकर व बहुजनांना साधुसमत आहे, तर त्याच्याजवळ जाऊन त्याला हे प्रश्न विचारावेत हें चांगलें तेव्हा सभिय परिव्राजकाला असें वाटलें—'जे ते भवन्त श्रमण–ब्राह्मण जीर्ण, वृद्ध, म्हातारे, उतार वयाचे, वय झालेले, स्थविर, जुने आणि चिरकाल-प्रव्रजित, संघनायक, गणनायक, गणाचार्य, प्रसिद्ध, यशस्वी, तीर्थंकर व बहुजनांना साधु समत . त्याना मी प्रश्न विचारले असता तेही उत्तर देऊ शकत नाहींत उत्तर देता येत नसल्यानें कोप, द्वेष आणि दौर्मनस्य प्रकट करतात, आणि मलाच परत

पब्बज्जाया ति । अथ खो सभियस्स परिब्बाजकस्स एतदहोसि-समणो खो दहरो ति न उञ्ञातब्बो न परिभोतब्बो । दहरोऽपि च समणो होति, सा होति महिद्धिको महानुभावो, यन्नूनाहं समणं गोतमं उपसङ्कमित्वा इमे पञ्हे पुच्छेय्य ति । अथ खो सभियो परिब्बाजको येन राजगहं तेन चारिकं पक्कामि । अनुपुब्बेन चारिकं चरमानो येन राजगहं वेळुवनं कलन्दकनिवापो येन भगवा तेनुपसङ्कमि, उपसङ्कमित्वा भगवता सद्धिं सम्मोदि, सम्मोदनीयं कथं साराणीयं वीतिसारेत्वा एकमन्तं निसीदि । एकमन्तं निसिन्नो खो सभियो परिब्बाजको भगवन्तं गाथाय अज्झभासि—

---

विचारतात, तर मग श्रमण गोतमाला हे प्रश्न विचारले असता तो मला उत्तर कसें देणार? कारण, श्रमण गोतम वयानें तरुण व अलीकडेच प्रव्रज्या घेतलेला.' तरी सभिय परिव्राजकाला वाटलें कीं श्रमण तरुण आहे म्हणून त्याची अवज्ञा करून त्याला तुच्छ मानता कामा नये. एखादा तरुण श्रमणही मोठा ऋद्धिमान् व महानुभाव असतो. तेव्हा श्रमण गोतमाजवळ जाऊन त्याला मी हे प्रश्न विचारावें हें बरें. तदनन्तर सभिय परिव्राजक राजगृहाच्या प्रवासाला निघाला अनुक्रमें प्रवास करीत राजगृहात, वेणुवनात, कलन्दक निवापात, जेथें भगवान् होता तेथें आला, तेथें येऊन त्यानें भगवन्ताला कुशल प्रश्न विचारले. कुशल प्रश्नादिक संभाषण संपवून तो एका बाजूस बसला. एका बाजूला बसून सभिय परिव्राजक भगवन्ताला गाथेनें बोलला —

५१० कङ्खी वेचिकिच्छी आगमं (इति सभियो)। पञ्हे पुच्छितुं अभिकङ्खमानो।
तेसन्तकरो भगवा हि पुट्ठो। अनुपुब्बं अनुधम्मं ब्याकरोहि मे ॥१॥

५११ दूरतो आगतोऽसि सभिया (इति भगवा)। पञ्हे पुच्छितुं अभिकङ्खमानो
तेसन्तकरो भवामि पुट्ठो। अनुपुब्बं अनुधम्मं ब्याकरोमि ते ॥२॥

५१२ पुच्छ मं सभिय पञ्हं। यं किंचि मनसिच्छसि।
तस्स तस्सेव पञ्हस्स। अहं अन्तं करोमि ते'ति ॥ ३ ॥

---

१ म०—भव भयाहि. रो०—भयाहि मे. २ म०, रो०—पञ्हे मे पुट्ठो अनुपुब्बं ... ३ रो०—ते, म०—तेसमन्तं करोमि ते. ४ रो०—पञ्हे ते पुट्ठो अनुपुब्बं ... । म०—पञ्हे पुट्ठो अनुपुब्बं. ... ।

---

५१०. संशय आणि शंका असलेला मी—असें सभिय म्हणाला। —प्रश्न विचारण्याच्या उद्देशानें आलों आहें. ते विचारले असता तू माझे ते प्रश्न सोडव, व धर्माला अनुसरून, अनुक्रमें, त्याचीं मला उत्तरें दे. ( १ )

५११. हे सभिया—असें भगवान् म्हणाला—तू दूरच्या प्रदेशातून प्रश्न विचारण्याच्या हेतूनें आला आहेस. ते विचारले असता मी ते सोडवितों व धर्माला अनुसरून, अनुक्रमें, त्याचीं तुला उत्तरें देतों. ( २ )

५१२. हे सभिया, जी कांहीं तुझ्या मनात इच्छा असेल तिला अनुसरून तू मला प्रश्न विचार तुझा जो जो प्रश्न असेल तो तो मी सोडवितों. ( ३ )

अथ खो सभियस्स परिब्बाजकस्स एतदहोसि—अच्छरियं वत भो अब्भुतं वत भो, यावताऽहं अञ्ञेसु समणब्राह्मणेसु ओकासकम्ममत्तम्पि नालत्थं, तं मे इदं समणेन गोतमेन ओकासकम्मं कतं ति अत्तमनो पमोदितो उदग्गो पीतिसोमनस्सजातो भगवन्तं पञ्हं पुच्छि—

५१३ किं पत्तिनमाहु भिक्खुनं (इति सभियो)। सोरतं[1] केन कथं
च दन्तमाहु।
बुद्धो'ति कथं पवुच्चति। पुट्ठो मे भगवा ब्याकरोहि ॥ ४ ॥

५१४ पज्जेन कतेन अत्तना (सभिया ति भगवा)। परिनिब्बानगतो
वितिण्णकङ्खो।
विभवं च भवं च विप्पहाय। वुसितवा खीणपुनब्भवो स भिक्खु॥ ५

१ रो०–सोरत, अ०–' सुरतं ' ति पि.

५१५ सब्बत्थ उपेक्खको सतीमा। न सो हिंसति किंचि सब्बलोके।
तिण्णो समणो अनाविलो। उस्सदा यस्स न सन्ति सोरतो सो॥ ६
५१६ यस्सिन्द्रियानि भावितानि। अज्झत्तं बहिद्धा च सब्बलोके।
निब्बिज्झ[1] इमं परं च लोकं। कालं कंखति भावितो स दन्तो॥७॥
५१७ कप्पानि विचेय्य केवलानि। संसारं दुभयं चुतूपपातं।
विगतरजमनंगणं विसुद्धं। पत्तं जातिक्खयं तमाहु बुद्धं॥ ८॥
अथ खो सभियो परिब्बाजको भगवतो भासितं अभिनन्दित्वा अनुमोदित्वा अत्तमनो पमोदितो उदग्गो पीतिसोमनस्सजातो भगवन्तं उत्तरिं पञ्हं पुच्छि—

१ अ०-निब्बिज्झ.

५१५. जो सर्व ठिकाणीं उपेक्षायुक्त आणि स्मृतिमान् होऊन या सर्व जगांत कोणाचीही हिंसा करीत नाहीं, जो श्रमण उत्तीर्ण व अनाविल, आणि ज्याला ( रागद्वेषादिक ) उस्सद[1] नाहींत, तो सुशान्त होय. ( ६ )

५१६. या सर्व जगांत ज्याचीं इन्द्रियें, बाह्य व अभ्यंतरींचीं, आटोक्यांत आलीं, व इहलोक व परलोक जाणून[2] उत्पन्न होऊन जो भावितात्मा मरणाची प्रतीक्षा करतो, तो दान्त होय. (७)

५१७. सकल विकल्प, संसार व ( त्याबरोबरच येणारें ) जन्म आणि मरण हीं दोन्हीं जाणून व विगतरज, निष्पाप, आणि विशुद्ध होऊन जो जन्मक्षय पावलेला आहे, त्यास बुद्ध म्हणतात. ( ८ )

त्यावर सभिय परिव्राजकानें भगवन्ताच्या बोलण्याचें अभिनंदन आणि अनुमोदन करून व हृष्ट, तुष्ट, उल्लसित आणि प्रीतिसौमनस्य-युक्त होऊन भगवन्ताला आणखी प्रश्न विचारला.

१ लोभ, द्वेष, मोह, अहंकार, कुदृष्टि, क्लेश आणि दुश्चरित हे सात उस्सद जाणावेत. २ टीकाकार 'निब्बिज्झ' असा पाठ घेऊन 'इहलोक व परलोक जाणून' असा अर्थ करतो.

५१८ किं पत्तिनमाहु ब्राह्मणं (इति सभियो) समणं केन कथं च न्हातको'ति
नागो'ति कथं पवुच्चति। पुट्ठो मे भगवा ब्याकरोहि ॥ ९ ॥

५१९ बाहेत्वा सब्बपापानि (सभिया ति भगवा)। विमलो साधुसमाहितो
ठितत्तो।
संसारमतिच्च केवली सो। असितो तादि पवुच्चते स ब्रह्मा १०

५२० समितावि पहाय पुञ्ञपापं। विरजो ञत्वा इमं परं च लोकं।
जातिमरणं उपातिवत्तो। समणो तादि पवुच्चते तथत्ता ॥ ११ ॥

५२१ निन्हाय सब्बपापकानि। अज्झत्तं बहिद्धा च सब्बलोके।
देवमनुस्सेसु कप्पियेसु। कप्पं नेति तमाहु न्हातको'ति ॥ १२ ॥

---

१ सी०—न्हातको, २ अ०—ठितो. ३ सी०—निन्हाय.

---

५१८. कोणत्या गुणांच्या प्राप्तीनें ब्राह्मण होतो—असें सभिय म्हणाला—श्रमण कसा होतो, स्नातक कसा होतो व नाग कोणाला म्हणतात हें, हे भगवन्, मी विचारतों, त्याचें मला उत्तर दे. (९)

५१९. सर्व पापांवर बहिष्कार घालून—हे सभिया, असें भगवान् म्हणाला — विमल, उत्तम रीतीनें समाहित, स्थितात्मा, संसाराचें अतिक्रमण करून केवली व अनाश्रित असा जो, त्याला ब्राह्मण म्हणतात. (१०)

५२०. पुण्यपापांचा त्याग करून शांत झालेला, इहपरलोक जाणून विगतरज झालेला आणि जन्म-मरणाच्या पार गेलेला जो, त्याला त्या गुणामुळें श्रमण म्हणतात. (११)

५२१. सर्व जगांत, बाह्य व अभ्यन्तरीचीं सर्व पापें धुवून टाकून जो विकल्पबद्ध देवमनुष्यांत विकल्पाला जात नाहीं, त्याला स्नातक म्हणतात. (१२)

५२२ आगु न करोति किंचि लोके । सब्बसयोगे विसज्ज बन्धनानि ।
सब्बत्थ न सज्जति विमुत्तो । नागो तादि पवुच्चते तथत्ता ति ॥१३

अथ खो सभियो परिब्बाजको पे० भगवन्त उत्तरिं पञ्ह पुच्छि –

५२३ क खेत्तजिन वदन्ति बुद्धा (इति सभियो) । कुसल केन कथ च पडितो ति ।
मुनि नाम कथ पवुच्चति । पुट्ठो मे भगवा व्याकरोहि ॥१४॥

५२४ खेत्तानि विचेय्य केवलानि (सभिया ति भगवा) । दिब्ब मानुसक च ब्रह्मखेत्त ।
सब्बखेत्तमूलबन्धना पमुत्तो । खेत्तजिनो तादि पवुच्चते तथत्ता १५

१ सी०–पवुच्चति, २ अ०–'विजेय्य' तिऽपि ३ रो०–दिव्य

५२२ जो या लोकीं कोणतेंही पाप (आगस्) करीत नाहीं, व सर्व सयोग व बधनें सोडवून कोठेंही बद्ध होत नाहीं, विमुक्त होतो, त्याला त्या गुणामुळें नाग (न + आगस्) म्हणतात. (१३)

त्यावर सभिय परिव्राजकानें. इत्यादिक भगवन्ताला आणखी प्रश्न विचारला–

५२३ बुद्ध क्षेत्रजिन कोणाला म्हणतात– असें सभिय म्हणाला–कुशल कसा होतो, पडित कसा होतो, व मुनि कोणाला म्हणतात, हें मी विचारतों त्याचें, हे भगवन्, मला उत्तर दे. (१४)

५२४. दिव्य, मानवी आणि ब्रह्मक्षेत्र हीं सर्व क्षेत्रें जाणून– हे सभिया, असें भगवान् म्हणाला– जो सर्व क्षेत्राच्या मूलबधनापासून मुक्त झाला, त्याला त्या गुणामुळें क्षेत्रजिन म्हणतात (१५)

५२५ कोसानि विचेय्य केवलानि । दिब्बं मानुसकं च ब्रह्मकोसं ।
(सब्ब-) कोसमूलबंधना पमुत्तो । कुसलो तादि पवुच्चते तथत्ता ॥१६
५२६ तदुभयानि विचेय्य पण्डरानि । अज्झत्तं बहिद्धा च सुद्धिपञ्ञो ।
कण्हं सुक्कं उपातिवत्तो । पण्डितो तादि पवुच्चते तथत्ता ॥१७॥
५२७ असतं च सतं च ञत्वा धम्मं । अज्झत्तं च बहिद्धा च सब्बलोके ।
देवमनुस्सेहि पूजियो सो । संगं जालमतिच्च सो मुनी ति ॥१८॥
अथ खो सभियो परिब्बाजको..पे०..भगवन्तं उत्तरिं पञ्हं पुच्छि-
५२८ किं पत्तिनमाहु वेदगुं ( इति सभियो ) । अनुविदितं केन कथं च विरियवा'ति ।
आजानियो किं ति नाम होति । पुट्ठो मे भगवा ब्याकरोहि ॥१९

१ रो०, म०—दुभयानि. २ रो०—कण्हसुक्कं. म०—कण्हसुक्कं.

५२५. दिव्य, मानवी आणि ब्रह्मकोश हे सर्व कोश जाणून, जो सर्व कोशांच्या मूलबंधनापासून मुक्त झाला, त्याला त्या गुणामुळें कुशल म्हणतात. (१६)

५२६. आध्यात्मिक आणि बाह्य पंडरें (म्हणजे आयतनें) जाणून जो विशुद्धप्रज्ञ पापपुण्यांच्या पार जातो, त्याला त्या गुणांमुळें पंडित म्हणतात. (१७)

५२७. सर्व लोकीं अध्यात्मविषयक व बाह्यविषयक, साधूंचा व असाधूंचा, धर्म जाणून व संग-जालाच्या पार जाऊन जो देवमनुष्यांना पूज्य होतो, तो मुनि होय. (१८)

त्यानंतर सभिय परिव्राजकानें....इत्यादिक. ..भगवन्ताला आणखी प्रश्न विचारला—

५२८. कोणत्या गुणाच्या प्राप्तीनें वेदपारग म्हणतात—असें सभिय म्हणाला—अनुविदित कशामुळें होतो, वीर्यवान् कसा होतो व आजन्य कसा होतो, हें मी विचारतों त्याचें, हे भगवन्, मला उत्तर दे. (१९)

५२९ वेदानि विचेय्य केवलानि ( सभिया ति भगवा ) । समणानं
यानिऽपत्थि ब्राह्मणानं ।
सब्बवेदनासु वीतरागो । सब्बं वेदमतिच्च वेदगू सो ॥ २० ॥
५३० अनुविच्च पपंचनामरूपं । अज्झत्तं बहिद्धा च रोगमूलं ।
सब्बरोगमूलबंधना पमुत्तो । अनुविदितो तादि पवुच्चते तथत्ता २१
५३१ विरतो इध सब्बपापकेहि । निरयदुक्खमतिच्च विरियवा सो ।
सो विरियवा पधानवा । धीरो तादि पवुच्चते तथत्ता ॥२२॥
५३२ यस्सऽस्सु लुतानि बंधनानि । अज्झत्तं बहिद्धा च सब्बमूलं ।
( सब्ब- ) संगमूलबंधना पमुत्तो आजानियो तादि पवुच्चते
तथत्ता ति ॥ २३ ॥

---

१ म०–लुनानि.

५२९ जे श्रमणाचे किंवा ब्राह्मणाचे वेद असतील, ते सगळे जाणून—हे सभिया, असें भगवान् म्हणाला—व सर्व वेदांच्या पार जाऊन जो सर्व वेदनांविषयीं वीतराग होतो, तो वेदपारग होय (२०)

५३०. बाह्य व अभ्यन्तरींच्या रोगाचें मूळ—प्रपंच व नामरूप जाणून जो सर्व रोगांच्या मूलबंधनापासून मुक्त होतो, त्याला त्या गुणामुळें अनुविदित म्हणतात (२१)

५३१ जो इहपरलोकीं सर्व पापापासून विरत होतो व निरय-दुःखाच्या पार जातो, तो वीर्यवान्, त्याजच त्या गुणामुळें वीर्यवान् प्रधानवान् आणि धीर म्हणतात (२२)

५३२ आभ्यन्तरींचीं आणि बाहेरचीं सर्वांचें मूळ असलेली संगकारणबंधनें तोडलीं जाऊन जो सर्व संगाच्या मूलबंधनापासून मुक्त झाला, याला त्या गुणामुळें आजन्य म्हणतात. (२३)

अथ खो सभियो परिब्बाजको–पे०–भगवन्तं उत्तरिं पञ्ह पुच्छि-

५३३ किं पत्तिनमाहु सोत्तियं (इति सभियो)। अरियं केन कथं
च चरणवा ति।

परिब्बाजको किं ति नाम होति। पुट्ठो मे भगवा ब्याकरोहि॥ २४

५३४ सुत्वा सब्बधम्मं अभिञ्ञाय लोके (सभिया ति भगवा)।
सावज्जानवज्जं यदत्थि किंचि।

अभिभुं अकथंकथिं विमुत्तं। अनीघं सब्बधिमाहु सोत्तियो ति॥ २५

५३५ छेत्वा आसवानि आलयानि। विद्वा सो न उपेति गब्भसेय्यं।
सञ्ञं तिविधं पनुज्ज पङ्कं। कप्पं नेति तमाहु अरियो ति॥ २६

१ रो० सोत्तिय २ रो०- अनिघ

त्यावर सभिय परिव्राजकानें इत्यादिक भगवन्ताला आणखी प्रश्न विचारला–

५३३ कोणत्या गुणाच्या प्राप्तीनें श्रोत्रिय म्हटला जातो–असें सभिय म्हणाला आर्य कशामुळें होतो, आचरणवान् कसा होतो, व परिव्राजक कसा होतो, हें मी विचारतों त्याचें, हे भगवन्, मला उत्तर दे (२४)

५३४ जे निंदित किंवा अनिंदित धर्म असतील ते सर्व ऐकून व जाणून–हे सभिया, असें भगवान् म्हणाला– जो त्यावर जय मिळवून निःशंक, विमुक्त व सर्वथैव निर्दुःख होतो, त्याला श्रोत्रिय म्हणतात (२५)

५३५ जो विद्वान् आस्रव किंवा आलय यांचा उच्छेद करून, गर्भवासाला जात नाहीं व जो (काम, रूप व अरूप) अशी त्रिविध पङ्कमय संज्ञा उडवून, विकल्पाला जात नाहीं, तो आर्य होय (२६)

५३६ यो इध चरणेसु पत्तिपत्तो । कुसलो सब्बदा आजानाति धम्मं ।
सब्बत्थ न सज्जति विमुत्तो । पटिघा यस्स न सन्ति चरणवा
सो ॥ २७ ॥

५३७ दुक्खवेपक्कं यदत्थि कम्मं । उद्धं अधो च तिरियं चापि मज्झे ।
परिवज्जयित्वा परिञ्ञचारी । मायं मानमथोऽपि लोभकोधं ।
परियन्तमकासि नामरूपं । तं परिब्बाजकमाहु पत्तिपत्तं ति ॥ २८ ॥

अथ खो सभियो परिब्बाजको भगवतो भासितं अभिनन्दित्वा अनुमोदित्वा अत्तमनो पमोदितो उदग्गो पीतिसोमनस्सजातो उट्ठायासना एकंसं उत्तरासंगं करित्वा येन भगवा तेनञ्जलिं पणामेत्वा भगवन्तं सम्मुखा सारुप्पाहि गाथाहि अभित्थवि—

१ रो० सी०—अजानि २ म०— विमुत्तचित्तो. ३ सी०—दुक्ख ४ अ०, म० परिब्बाजयित्वा ५—५ म० मानपथ विलोभकोध.

५३६. जो इहलोकीं आचरणामध्यें पूर्णत्व पावतो, जो सर्वदा कुशल धर्म जाणतो, जो कोठेंही बद्ध होत नाहीं, जो विमुक्त व ज्याला प्रत्याघातबुद्धि नाहीं, तो आचरणवान् होय. (२७).

५३७ वर, खालीं, चारी बाजूस किंवा मध्यें, जें काहीं दुःख कारक कर्म असेल तें वर्ज्य करून जो विचारपूर्वक वागतो, ज्यानें माया, मान, लोभ, क्रोध व नामरूप याचा अन्त केला, या पूर्णत्वाप्रत गेलेल्याला परिव्राजक म्हणतात (२८)

त्यानंतर सभिय परिव्राजकानें भगवंताच्या भाषणाचें अभिनंदन व अनुमोदन करून व हृष्ट, तुष्ट, उल्लसित आणि प्रीतिसौमनस्ययुक्त होऊन, आसनावरून उठून, उत्तरीय एका खांद्यावर ठेवून व भगवंतापुढें हात जोडून भगवंताची तेथेंच योग्य गाथांनीं स्तुति केली—

५३८ यानि च तीणि यानि च सट्ठि । समणप्पवादसितानि भूरिपञ्ञ ।
सञ्ञक्खरसञ्ञनिस्सितानि । ओसरणानि विनेय्य ओघतमगा॥२९

५३९ अन्तगूऽसि पारगूऽसि दुक्खस्स । अरहाऽसि सम्मासम्बुद्धो खीणा-
सवं तं मञ्ञे ।
जुतिमा मुतिमा पहूतपञ्ञो । दुक्खस्सऽन्तकर अतारयि मं ॥३०

५४० यं मे कंखितमञ्ञासि । विचिकिच्छं मं अतारेसि नमो ते ।
मुनि मोनपथेसु पत्तिपत्त । अखिल आदिच्चबन्धु सोरतोऽसि॥३१

---

१ म० – °निस्सितानि २ म०–पञ्चसगार°. ३ भा० (व्याकरण)-
ओघातमगमा । ओघंतमगा ति या पाठा । ४ सी० – तारेसि. ५ म०,
सी०–विचिकिच्छा. ६ म०–पत्तिपत्त.

---

५३८ हे विपुलप्रज्ञ, ही साठ आणि तीन, श्रमणवादावर व
केवळ कल्पनामय शब्दांवरच अवलंबून राहणारी व ज्यांचा आसरा
अनेक श्रमणांनी घेतलेला आहे, अशी मतें ( उतार ) सोडून तू ओघ
तरून गेलास । ( २९ ).

५४१ या मे कंखा पुरे आसि तं मे व्याकासि चक्खुमा ।
अद्धा मुनीऽसि सबुद्धो नत्थि नीवरणा तव ॥३२॥
५४२ उपायासा च ते सब्बे विद्धस्ता विनळीकता ।
सीतिभूतो दमप्पत्तो धितिमा सच्चनिक्कमो ॥३३॥
५४३ तस्स ते नागनागस्स महावीरस्स भासतो ।
सब्बे देवाऽनुमोदन्ति उभो नारदपब्बता ॥३४॥
५४४ नमो ते पुरिसाजञ्ञ नमो ते पुरिसुत्तम ।
सदेवकस्मिं लोकस्मिं नत्थि ते पटिपुग्गलो ॥३५॥

५४१ जी मला पूर्वी शंका होती, तिचें चक्षुष्मन्तानें समाधान केलें. खात्रीनें तू संबुद्ध मुनि आहेस. कारण तुला आवरणें नाहींत (३२).

५४२. तुझे सर्व शोक विध्वस्त झाले आहेत, विनाश पावले आहेत. तू शान्तिमय, दमप्राप्त, धृतिमान् आणि सत्यनिष्क्रम आहेस! (३३)

५४३. त्या तुझें नागनागाचें महावीराचें भाषण नारद आणि पर्वत हे दोघे व सकल देव अनुमोदितात. (३४).

५४४ हे पुरुषाजन्या, तुला नमस्कार असो. हे पुरुषोत्तमा, तुला नमस्कार असो. या सदेवक लोकांत तुझ्यासारखा दुसरा पुरुष नाहीं (३५)

१. कामच्छंद, व्यापाद, अनुत्साह व आळस, भ्रान्तचित्तता, व कुशंका हीं पाच आवरणें.

२. महाभारतांत शान्तिपर्वात ह्या दोन ऋषींची माहिती दिली आहे. (भाण्डारकर प्राच्य संशोधन मन्दिर प्रत, १२.३० पहा.)

५४५ तुवं बुद्धो तुवं सत्था तुवं माराभिभू मुनि ।
तुवं अनुसये छेत्वा तिण्णो तारेसि'मं पजं ॥३६॥
५४६ उपधी ते समतिक्कन्ता आसवा ते पदालिता ।
सीहोऽसि अनुपादानो पहीनभयभेरवो ॥३७॥
५४७ पुण्डरीकं यथा वग्गु तोये न उपलिम्पति ।
एवं पुञ्ञे च पापे च उभये त्वं न लिम्पसि ।
पादे वीर पसारेहि सभियो वन्दति सत्थुनो'ति ॥३८॥

अथ खो सभियो परिब्बाजको भगवतो पादेसु सिरसा निपतित्वा भगवन्तं एतदवोच—अभिक्कन्तं भो गोतम....पे०....धम्मं च भिक्खु-संघं च, लभेय्याहं भन्ते भगवतो सन्तिके पब्बज्जं, लभेय्यं उप-संपदं'ति । यो खो सभिय अञ्ञतित्थियपुब्बो इमस्मिं धम्मविनये

१ म०—मायाभिभू. २ सी०, म०—उपधि. ३ म०—उपलिम्पति. ४ म०— लिम्पसि.

५४५. तू बुद्ध, तू शास्ता, तू माराचा पराभव करणारा मुनि, तू अनुशय तोडून तरून गेलेल्या या लोकांना तारीत आहेस. ( ३६ ).

५४६. तू उपाधि मागें टाकली आहेस. तू आस्रव तोडले आहेस. तू उपादानविरहित, भयभैरवविहीन सिंह आहेस. ( ३७ ).

५४७. सुन्दर पुण्डरीक (कमळ) जसें पाण्यांत बद्ध होत नाहीं, तसा तू पुण्य आणि पाप या दोहोंत बद्ध होत नाहींस ! हे वीरा, पाय पुढें कर. हा सभिय तुला शास्त्याला वन्दन करतो. ( ३८ ).

त्यावर सभिय परिव्राजक भगवंताच्या पायावर डोकें ठेऊन भगवंताला म्हणाला—धन्य ! धन्य भो गोतम ........इत्यादि........भिक्षु-संघाला शरण जातों. मला भगवन्तापाशीं प्रव्रज्या मिळावी व उपसंपदा मिळावी. " हे सभिया, जो दुसऱ्या पंथांतील परिव्राजक या धर्म-

आकङ्खति पब्बज्जं, आकङ्खति उपसम्पदं, सो चत्तारो मासे परिवसति, चतुन्नं मासानं अच्चयेन आरद्धचित्ता भिक्खू पब्बाजेन्ति, उपसम्पादेन्ति भिक्खुभावाय। अपि च मे त्थ पुग्गलवेमत्तता विदिता ति। सचे भन्ते अञ्ञतित्थियपुब्बा, इमस्मिं धम्मविनये आकङ्खन्ता पब्बज्जं आकङ्खन्ता उपसम्पदं, चत्तारो मासे परिवसन्ति चतुन्नं मासानं अच्चयेन आरद्धचित्ता भिक्खू पब्बाजेन्ति, उपसम्पादेन्ति भिक्खुभावाय, अहं चत्तारि वस्सानि परिवसिस्सामि, चतुन्नं वस्सानं अच्चयेन आरद्धचित्ता भिक्खू पब्बाजेन्तु, उपसम्पादेन्तु भिक्खुभावाया ति। अलत्थ खो सभियो परिब्बाजको भगवतो सन्तिके पब्बज्जं अलत्थ उपसम्पदं • पे० अञ्ञतरो खो पनायस्मा सभियो अरहतं अहोसी ति।

सभियसुत्तं निट्ठितं।

---

१ सी० -तेसु

विनयात प्रव्रज्या व उपसम्पदा घेऊ इच्छितो, तो चार महिने उमेदवारी करतो चार महिने होऊन त्याच्या आचरणानें भिक्षूंचें समाधान झालें असता, ते त्याला प्रव्रज्या देतात व भिक्षु होण्यासाठीं उपसम्पदा देतात. परन्तु विशिष्ट व्यक्तीबद्दल विशिष्ट धोरण ठेवणें बरें हें मी जाणतों." "भदन्त, जर आपल्या धर्मविनयात प्रव्रज्या व उपसम्पदा घेऊ इच्छिणारे अन्य पथातील परिव्राजक चार महिने उमेदवारी करतात, व चार महिन्यानंतर भिक्षूंचें समाधान झालें असता ते त्याना प्रव्रज्या देतात, व भिक्षु होण्यासाठीं उपसम्पदा देतात, तर मी चार वर्षें उमेदवारी करतों, चार वर्षांनंतर भिक्षूंचें समाधान झालें असता, ते मला प्रव्रज्या देवोत व भिक्षु होण्यासाठीं उपसम्पदा देवोत." सभिय परिव्राजकाला भगवंतापाशीं प्रव्रज्या मिळाली, उपसम्पदा मिळाली इत्यादि आयुष्मान् सभिय अर्हन्तापैकीं एक झाला।

सभियसुत्त समाप्त

३२

[ ७. सेलसुत्तं ]

एवं मे सुतं । एकं समयं भगवा अंगुत्तरापेसु चारिकं चरमानो महता भिक्खुसंघेन सद्धिं अड्ढतेळसेहि भिक्खुसतेहि येन आपणं नाम अंगुत्तरापानं निगमो तदवसरि । अस्सोसि खो केणियो जटिलो– समणो खलु भो गोतमो सक्यपुत्तो सक्यकुला पब्बजितो अंगुत्तरापेसु चारिकं चरमानो महता भिक्खुसंघेन सद्धिं अड्ढतेळसेहि भिक्खुसतेहि आपणं अनुप्पत्तो; तं खो पन भवन्तं गोतमं एवं कल्याणो कित्तिसद्दो अब्भुग्गतो–इतिःपि सो भगवा अरहं सम्मासंबुद्धो विज्जाचरण-संपन्नो सुगतो लोकविदू अनुत्तरो पुरिसदम्मसारथि सत्था देवमनु-स्सानं बुद्धो भगवा। सो इमं लोकं सदेवकं समारकं सब्रह्मकं सस्समण-ब्राह्मणिं पजं सदेवमनुस्सं सयं अभिञ्ञा सच्छिकत्वा पवेदेति, सो

३२

[ ७. सेलसुत्त ]

असें मीं ऐकलें आहे. एके समयीं भगवान् अंगुत्तराप देशांत मोठ्या भिक्षुसंघासह म्हणजे साडेबाराशें भिक्षूंसह प्रवास करीत असतां ' आपण ' नांवाच्या अंगुत्तरापाच्या शहराजवळ आला. केणिय जटिलानें असें ऐकलें कीं, श्रमण गोतम शाक्यपुत्र शाक्यकुळांतून परिव्राजक झालेला अंगुत्तराप देशांत मोठ्या भिक्षुसंघासह म्हणजे साडेबाराशें भिक्षूंसह, प्रवास करीत असतां 'आपणा'ला आला आहे आणि त्या भवान् गोतमाची अशी कल्याणकारक कीर्ति फैलावली आहे–" याप्रमाणें तो भगवान्, अर्हन्, सम्यक्-संबुद्ध, विद्याचरण-संपन्न, सुगत, लोकविद्, श्रेष्ठ, दमन करण्यास योग्य अशा पुरुषांचा सारथी, देवांचा आणि मनुष्यांचा गुरु, बुद्ध भगवान् आहे. तो हें

धम्म देसेति आदिकल्याण मज्झेकल्याण परियोसानकल्याण सात्थं सब्यञ्जन केवलपरिपुण्ण परिसुद्ध ब्रह्मचरिय पकासेति, साधु खो पन तथारूपान अरहत दस्सन होती ति ।

अथ खो केणियो जटिलो येन भगवा तेनुपसङ्कमि, उपसङ्कमित्वा भगवता सद्धिं सम्मोदि, सम्मोदनीय कथ सारणीय वीतिसारेत्वा एकमन्त निसीदि । एकमन्त निसिन्न खो केणिय जटिल भगवा धम्मिया कथाय सन्दस्सेसि समादपेसि समुत्तेजेसि सपहंसेसि । अथ खो केणियो जटिलो भगवता धम्मिया कथाय सन्दस्सितो समादपितो समुत्तेजितो सपहंसितो भगवन्त एतदवोच— अधिवासेतु मे भव गोतमो स्वातनाय भत्तं सद्धिं भिक्खुसघेना ति । एव वुत्ते भगवा केणिय जटिल एतदवोच—महा खो केणिय भिक्खुसघो अड्ढ तेळसानि भिक्खुसतानि, त्व च खो ब्राह्मणेसु अभिप्पसन्नो ति ।

---

सदेवक, समारक, सब्रह्मक जग आणि सश्रमण ब्राह्मणी सदेवमनुष्य-प्रजा स्वत ज्ञानानें साक्षात्कार करून घेऊन जाणतो व उपदेशितो, तो आदिकल्याण, मध्यकल्याण, पर्यवसानकल्याण असा धर्म उपदेशितो व सार्थ, सव्यजन, केवल परिपूर्ण ब्रह्मचर्य प्रकाशित करतो अशा अर्हन्ताचें दर्शन लाभदायक आहे ''

तेव्हा केणिय जटिल भगवन्तापाशीं आला, येऊन त्यानें भगवन्ताला कुशल प्रश्न विचारले, आणि कुशल प्रश्नादिक संभाषण आटोपून तो एका बाजूला बसला एका बाजूस बसलेल्या केणिय जटिलाला धार्मिक भाषणाच्या द्वारें भगवन्तानें सन्मार्ग दाखविला, उपदेश केला, उत्तेजित केलें व सप्रहर्षित केलें तेव्हा भगवन्ताकडून धार्मिक भाषणाच्या-द्वारें सन्मार्ग दाखविला गेलेला, उपदेश केला गेलेला, उत्तेजित केला गेलेला व सप्रहर्षित केला गेलेला असा केणिय जटिल भगवन्ताला म्हणाला—

दुतियऽपि खो केणियो जटिलो भगवन्त एतदवोच–किंचापि भो गोतम महाभिक्खुसघो अड्ढतेळसानि भिक्खुसतानि, अह च ब्राह्मणेसु अभिप्पसन्नो, अधिवासेतु मे भव गोतमो स्वातनाय भत्त सद्धिं भिक्खुसघेना ति ।दुतियऽपि खो भगवा केणिय जटिल एतदवोच–महा खो केणिय भिक्खुसघो अड्ढतेळसानि भिक्खुसतानि, त्व च खो ब्राह्मणेसु अभिप्पसन्नो ति । ततिय पि खो केणियो जटिलो भगवन्त एतदवोच–किंचापि भो गोतम महाभिक्खुसघो अड्ढतेळसानि भिक्खुसतानि, अह च खो ब्राह्मणेसु अभिप्पसन्नो, अधिवासेत्वेव मे भव गोतमो स्वातनाय भत्त सद्धिं भिक्खुसघेना ति । अधिवासेसि भगवा तुण्हीभावेन । अथ खो केणियो जटिलो भगवतो अधिवासन विदित्वा उट्ठायासना येन सको अस्समो तेनुपसकमि । उपसकमित्वा मित्तामच्चे ञातिसालोहिते

---

भवान् गोतमानें भिक्षुसघासह उद्यासा माझें आमन्त्रण स्वीकारावें त्यावर भगवान् केणिय जटिलाला म्हणाला, हे केणिय, भिक्षुसघ मोठा, साडेबारार्शे भिक्षू आणि तू तर ब्राह्मणाचा भक्त दुसऱ्यादाही केणिय जटिल भगवन्ताला म्हणाला—भो गोतमा, जरी मोठा भिक्षुसघ, साडेबारार्शे भिक्षू, आणि मी ब्राह्मणाचा भक्त, तरी भवान् गोतमानें भिक्षुसघासह माझें आमन्त्रण स्वीकारावें दुसऱ्यादाही भगवान् केणिय जटिलाला म्हणाला–हे केणिय, भिक्षुसघ मोठा, साडेबारार्शे भिक्षू आणि तू तर ब्राह्मणाचा भक्त तिसऱ्यादाही केणिय जटिल भगवन्ताला म्हणाला–भो गोतमा, जरी मोठा भिक्षुसघ, साडेबारार्शे भिक्षू आणि मी ब्राह्मणाचा भक्त, तरी भवान् गोतमानें भिक्षुसघासह उद्या माझें आमन्त्रण स्वीकारावें. यावेळीही न बोलतां तें भगवन्तानें स्वीकारलें तेव्हा भगवन्तानें आपलें आमन्त्रण

आमन्तेसि—सुणन्तु मे भोन्तो मित्तामच्चा ञातिसालोहिता, समणो मे गोतमो निमन्तितो स्वातनाय भत्तं सद्धिं भिक्खुसंघेन, येन मे कायवेय्यावटिकं करेय्याथा ति। एवं भो ति खो केणियस्स जटिलस्स मित्तामच्चा ञातिसालोहिता केणियस्स जटिलस्स पटिस्सुत्वा अप्पेकच्चे उद्धनानि[1] खणन्ति, अप्पेकच्चे कट्ठानि फालेन्ति, अप्पेकच्चे भाजनानि धोवन्ति, अप्पेकच्चे उदकमणिकं पतिट्ठापेन्ति, अप्पेकच्चे आसनानि पञ्ञापेन्ति, केणियो पन जटिलो सामं येव मण्डलमाळं पटियादेति।

तेन खो पन समयेन सेलो ब्राह्मणो आपणे पटिवसति, तिण्णं वेदानं पारगू सनिघण्डुकेटुभानं साक्खरप्पभेदानं इतिहासपञ्चमानं पदको वेय्याकरणो लोकायतमहापुरिसलक्खणेसु अनवयो तीणि माणवकसतानि मन्ते वाचेति। तेन खो पन समयेन केणियो जटिलो सेलो

१ म०—भन्तो

स्वीकारलें असें जाणून केणिय जटिल आसनावरून उठला व आपल्या आश्रमाकडे गेला आश्रमात जाऊन तो आपल्या मित्राना व सग्यासोयऱ्याना म्हणाला—माझे मित्र आणि सगेसोयरेहो, ऐका उद्या मी श्रमण गोतमाला भिक्षुसघासह जेवण्याचें आमन्त्रण दिलें आहे, त्यासाठीं तुम्ही मला काया झिजवून मदत करा " ठीक आहे " असें म्हणून त्या केणिय जटिलाच्या मित्रापैकीं आणि सग्यासोयऱ्यापैकीं काहीं चुली तयार करू लागले, काहीं लाकडे फोडू लागले, काहीं भाडीं साफ करू लागले, काहीं पाणी भरू लागले, व काहीं आसनें माडू लागले परतु केणिय जटिल स्वत च मडप तयार करू लागला

त्या काळीं सेल (शैल) नावाचा ब्राह्मण 'आपणा'त राहत असे. तो

ब्राह्मणे अभिप्पसन्नो होति । अथ खो सेलो ब्राह्मणो तीहि माणवकसतेहि परिवुतो जङ्घाविहार अनुचङ्कममानो अनुविचरमानो येन केणियस्स जटिलस्स अस्समो तेनुपसङ्कमि । अद्दसा खो सेलो ब्राह्मणो केणियस्सामिये जटिले अप्पेकच्चे उद्धनानि खणन्ते पे० अप्पेकच्चे आसनानि पञ्ञापेन्ते, केणिय पन जटिल साम येव मण्डलमाळ पटियादेन्त । दिस्वान केणिय जटिल एतदवोच–किन्नु भोतो केणियस्स आवाहो वा भविस्सति, विवाहो वा भविस्सति, महायञ्ञो वा पच्चुपट्ठितो, राजा वा मागधो सेनियो बिम्बिसारो निमन्तितो स्वातनाय सद्धिं बलकायेना ति । न मे सेल आवाहो भविस्सति, नऽपि विवाहो भविस्सति, नऽपि राजा मागधो सेनियो बिम्बिसारो निमन्तितो स्वातनाय सद्धिं बलकायेन, अपि च खो मे महायञ्ञो पच्चुपट्ठितो अत्थि । समणो गोतमो सक्यपुत्तो

१ म०–केणियस्स जटिलस्स अस्समे.

निघटुकेटुभांसह अक्षरप्रभेदासह व पाचव्या इतिहासासह, तीन वेदात पारंगत, पदें जाणणारा, वैयाकरण, लोकायत व महापुरुषाची लक्षणें यात निष्णात असून तीनशें विद्यार्थ्यांना वेद शिकवीत होता त्या वेळीं केणिय जटिल सेल ब्राह्मणाचा भक्त होता तेव्हा सेल ब्राह्मण तीनशें विद्यार्थ्यासह फिरावयास निघाला असता, फिरत फिरत केणिय जटिलाच्या आश्रमाच्या बाजूस आला सेल ब्राह्मणानें केणियाच्या आश्रमातील कांहीं जटिल चुली तयार करीत आहेत इत्यादि परन्तु केणिय जटिल स्वत च मंडप तयार करीत आहे, हें पाहिलें. पाहून तो केणिय जटिलाला म्हणाला–" भवान् केणियाच्या आश्रमात मुलाचा किंवा मुलीचा विवाह व्हावयाचा आहे काय? किंवा मोठा यज्ञ होणार काय? अथवा उद्या सैन्यासह मगधराजा

१ कवींना उपयोगी पडणारें शास्त्र ( टीका )

सक्यकुला पब्बजितो अंगुत्तरापेसु चारिकं चरमानो महता भिक्खुसंघेन सद्धिं अड्ढतेळसेहि भिक्खुसतेहि आपण अनुप्पत्तो। तं खो पन भवन्तं गोतमं....पे०....बुद्धो भगवा'ति। सो मे निमन्तितो स्वातनाय सद्धिं भिक्खुसंघेना ति।

बुद्धो'ति खो केणिय वदेसि। बुद्धो'ति भो सेल वदामि। बुद्धो'ति भो केणिय वदेसि। बुद्धो'ति भो सेल वदामी ति। अथ खो सेलस्स ब्राह्मणस्स एतदहोसि—घोसोऽपि खो एसो दुल्लभो लोकस्मिं यदिदं बुद्धो'ति। आगतानि खो पन अस्माकं मन्तेसु द्वत्तिंस-महापुरिसलक्खणानि येहि समन्नागतस्स द्वे'व गतियो भवन्ति, अनञ्ञा। सचे अगारं अज्झावसति, राजा होति चक्कवत्ती धम्मिको धम्मराजा चातुरन्तो विजितावी जनपदत्थावरियप्पत्तो सत्तरतनसमन्नागतो। तस्सिमानि सत्त रतनानि भवन्ति, सेय्यथीदं चक्करतनं,

---

श्रेणिय बिंबिसार ह्याला आमंत्रण आहे काय ?" "हे सेला, माझ्याकडे मुलाचें किंवा मुलीचें लग्न नाहीं, किंवा सैन्यासह मगधराजा श्रेणिय बिंबिसार ह्यालाही येथें उद्या आमन्त्रण नाहीं; परंतु येथें मोठा यज्ञ आहे खरा. श्रमण गोतम शाक्यपुत्र शाक्य कुलातून परिव्राजक झालेला अंगुत्तराप देशात मोठ्या भिक्षुसंघासह म्हणजे साडेबाराशें भिक्षूंसह प्रवास करीत असतां 'आपणा'ला आला आहे, आणि त्या भवान् गोतमाची अशी कीर्ति....इत्यादि. ..बुद्ध भगवान् आहे. त्याला भिक्षुसंघासह उद्याला मीं आमंत्रण दिलें आहे."

"हे केणिया, बुद्ध म्हणतोस ?" "भो सेला, होय; मी बुद्ध म्हणतों." हे केणिया, बुद्ध म्हणतोस ?" भो सेला, होय; मी बुद्ध म्हणतों." त्यावर सेल ब्राह्मणाला असें वाटलें कीं, बुद्ध हा शब्द देखील इहलोकीं दुर्लभ आहे. आमच्या अध्ययनांत महापुरुषांचीं

हत्थिरतनं, अस्सरतनं, मणिरतनं, इत्थिरतनं, गहपतिरतनं, परिणायकरतनमेव सत्तमं। परोसहस्सं खो पनऽस्स पुत्ता भवन्ति सूरा वीरङ्गरूपा परसेनप्पमद्दना। सो इमं पठविं सागरपरियन्तं अदण्डेन असत्थेन धम्मेन अभिविजिय अज्झावसति। सचे खो पनागारस्मा अनगारियं पब्बजति अरहं होति सम्मासम्बुद्धो लोके विवत्तच्छद्दो[1]।

अह पन भो केणिय एतरहि सो भवं गोतमो विहरति अरहं सम्मासम्बुद्धो ति। एवं वुत्ते केणियो जटिलो दक्खिणं बाहं पग्गहेत्वा सेलं ब्राह्मणं एतदवोच—येन सा भो सेल नीलवनराजी ति। अथ खो सेलो ब्राह्मणो तीहि माणवकसतेहि सद्धिं येन भगवा तेनुपसङ्कमि। अथ खो सेलो ब्राह्मणो ते माणवके आमन्तेसि—अप्पसद्दा भोन्तो आगच्छन्तु पदे पदं निक्खिपन्ता, दुरासदा हि ते भगवन्तो सीहा व एकचरा, यदा चाहं

१ म०-विवट्टच्छदो १०००–१००२ गाथा पहा.

बत्तीस लक्षणें येतात त्यांहीं संपन्न अशा महापुरुषाच्या दोनच गती होतात, तिसरी होत नाहीं जर तो गृहस्थाश्रमी राहिला तर धार्मिक, धर्मराजा, चारही दिशांचा मालक, जयशाली, सर्व राज्यावर स्वामित्व मिळविलेला व सात रत्नांनी संपन्न असा चक्रवर्ती राजा होतो त्याचीं हीं सात रत्नें असतात तीं अशीं —चक्ररत्न, हस्तिरत्न, अश्वरत्न, मणिरत्न, स्त्रीरत्न, गृहपतिरत्न व सातवें परिणायकरत्न. त्याला शूर, वीर, परसेनेचें मर्दन करणारे असे एक हजाराहून जास्त पुत्र असतात तो दण्डावाचून, शस्त्रावाचून ही सागरापर्यंतची पृथ्वी धर्मानें जिंकून राहतो पण जर तो घर सोडून अनागारिक प्रव्रज्या घेईल तर जगात (अज्ञानाचा) पडदा दूर सारणारा अर्हन् सम्यक्सम्बुद्ध होईल.

१ प्रमुख अमात्याला 'परिणायक' असें म्हणतात

भो समणेन गोतमेन सद्धिं मन्तेथ्य, मा मे भोन्तो अन्तरन्तरा कथं ओपातेथ, कथापरियोसानं मे भवन्तो आगमेन्तू ति। अथ खो सेलो ब्राह्मणो येन भगवा तेनुपसङ्कमि। उपसङ्कमित्वा भगवता सद्धिं सम्मोदि, सम्मोदनीयं कथं साराणीयं वीतिसारेत्वा एकमन्तं निसीदि। एकमन्तं निसिन्नो खो सेलो ब्राह्मणो, भगवतो काये द्वत्तिंसमहापुरिसलक्खणानि सम्मन्नेसि। अद्दसा खो सेलो ब्राह्मणो भगवतो काये द्वत्तिंसमहापुरिसलक्खणानि येभुय्येन ठपेत्वा द्वे, द्वीसु महापुरिसलक्खणेसु कङ्खति विचिकिच्छति नाधिमुच्चति न सम्पसीदति—कोसोहिते च वत्थगुय्हे, पहूतजिव्हताय च। अथ खो भगवतो एतदहोसि—पस्सति खो मे अयं

"भो केणिया, तो भवान् गोतम अर्हन् सम्यक्संबुद्ध कोठें राहतो?" असें म्हटल्यावर केणिय जटिल उजवा हात पुढें करून सेल ब्राह्मणाला म्हणाला—"भो सेल, ही जी नील वनराजि दिसते तिकडे" त्यावर तीनशें विद्यार्थ्यांसह सेल ब्राह्मण भगवंतापाशीं आला. तेव्हा सेल ब्राह्मण त्या विद्यार्थ्यांना म्हणाला—तुम्ही आवाज न करता पावलामागें पावलें टाकून चला, कारण ते भगवंत सिंहासारखे एकचर असून दुर्गम आहेत, आणि मी जेव्हा श्रमण गोतमाबरोबर बोलेन, तेव्हा तुम्ही मध्यें बोलूं नका, आमच्या संभाषण संपण्याची वाट पहा. तेव्हा सेल ब्राह्मण भगवंताजवळ आला. येऊन त्यानें भगवंताला कुशल प्रश्न विचारले. कुशल प्रश्नादिक संभाषण आटोपून तो एका बाजूस बसला. एका बाजूला बसून सेल ब्राह्मण भगवन्ताच्या शरीरावर महापुरुषाचीं बत्तीस लक्षणें पाहूं लागला. सेल ब्राह्मणानें भगवंताच्या शरीरावर बत्तीसपैकीं दोन वगळून बाकीचीं महापुरुषाचीं लक्षणें पाहिलीं पण कोशावहित वस्त्रगुह्य व प्रभूतजिह्वा या दोन महापुरुषलक्षणांविषयीं

सेलो ब्राह्मणो द्वत्तिंसमहापुरिसलक्खणानि येभुय्येन उपेत्वा द्वे, द्वीसु महापुरिसलक्खणेसु कङ्खति विचिकिच्छति नाधिमुच्चति न सम्पसीदति— कोसोहिते च वत्थगुय्हे पहूतजिव्हताय चा ति। अथ खो भगवा तथारूपं इद्धाभिसङ्खारं अभिसङ्खासि यथा अद्दस सेलो ब्राह्मणो भगवतो कोसोहितं वत्थगुय्हं। अथ खो भगवा जिव्हं निन्नामेत्वा उभोऽपि कण्णसोतानि अनुमसि पटिमसि, उभोऽपि नासिकसोतानि अनुमसि पटिमसि, केवलंऽपि नलाटमण्डलं जिव्हाय छादेसि। अथ खो सेलस्स ब्राह्मणस्स एतदहोसि—समन्नागतो खो समणो गोतमो द्वत्तिंसमहापुरिसलक्खणेहि परिपुण्णेहि, नो अपरिपुण्णेहि, नो च खो नं जानामि बुद्धो वा नो वा। सुतं खो पन मे तं ब्राह्मणानं वुद्धानं महल्लकानं आचरियपाचरियानं भासमानानं—ये ते भवन्ति अरहन्तो सम्मासम्बुद्धा ते सके

---

त्याला शंका येऊ लागली त्याची खात्री होईना तेव्हा भगवंताला वाटलें कीं, हा सेल ब्राह्मण बत्तीसपैकीं दोन खेरीज करून बाकीचीं साञ्ञीं महापुरुषलक्षणें पाहतो, पण कोशावहित वस्त्रगुह्य व प्रभूत-जिह्वा या दोन महापुरुषलक्षणाविषयीं त्याला शंका येते, विश्वास वाटत नाहीं. तेव्हा भगवन्तानें असा काहीं ऋद्धिचमत्कार केला कीं, जेणेंकरून सेल ब्राह्मण भगवन्ताचें कोशावहित वस्त्रगुह्य पाहू शकला, आणि भगवन्तानें जीभ बाहेर काढून जिभेनें दोन्ही कानांना स्पर्श केला व दोन्ही नाकपुड्यांना स्पर्श केला, व सर्व कपाळ जिभेनें झाकलें तेव्हा सेल ब्राह्मणाला वाटलें कीं, हा श्रमण गोतम अपरि-पूर्णांनीं नव्हे तर परिपूर्ण बत्तीस महापुरुषलक्षणांनीं युक्त आहे पण तो बुद्ध आहे कीं नाहीं हें मला समजत नाहीं परंतु वयोवृद्ध म्हातारे आचार्य प्राचार्य ब्राह्मण बोलत असता मीं ऐकलें आहे कीं, जे अर्हन् सम्यक्सम्बुद्ध असलात, त्याची स्तुति केली असता ते

वण्णे भञ्जमाने अत्तानं पातुकरोन्ती ति, यन्नूनाहं समणं गोतमं सम्मुखा सारुप्पाहि गाथाहि अभित्थवेय्यं ति । अथ खो सेलो ब्राह्मणो भगवन्तं सम्मुखा सारुप्पाहि गाथाहि अभित्थवि--

५४८ परिपुण्णकायो सुरुचि सुजातो चारुदस्सनो ।
सुवण्णवण्णोऽसि भगवा सुसुक्कदाठोऽसि विरियवा ॥१॥

५४९ नरस्स हि सुजातस्स ये भवन्ति वियञ्जना ।
सब्बे ते तव कायस्मिं महापुरिसलक्खणा ॥ २ ॥

५५० पसन्ननेत्तो सुमुखो ब्रहा उजु पतापवा ।
मज्झे समणसङ्घस्स आदिच्चो व विरोचसि ॥ ३ ॥

५५१ कल्याणदस्सनो भिक्खु कंचनसन्निभत्तचो ।
किं ते समणभावेन एवं उत्तमवण्णिनो ॥ ४ ॥

---

स्वतःला प्रकट करतात. म्हणून मी श्रमण गोतमाची योग्य गाथांनी समक्ष स्तुति करावी हें चांगलें. तेव्हा सेल ब्राह्मणानें भगवंताची योग्य गाथांनी समक्ष स्तुति केली--

५४८ हे भगवन्, तू परिपूर्णकाय, सुरुचि, सुजात, चारुदर्शन, सुवर्णवर्ण, सुशुभ्रदन्त व वीर्यवान् आहेस ! ( १ )

५४९. सुजात मनुष्याची जी लक्षणें असतात, तीं सर्व महापुरुषलक्षणें तुझ्या देहावर आहेत ! ( २ )

५५०. प्रसन्ननेत्र, सुमुख, भव्य, सरळ आणि प्रतापवान् असा तूं श्रमणसंघाच्या मध्यें सूर्यासारखा प्रकाशतोस ! ( ३ )

५५१. तू कल्याणदर्शनकारक व सोन्यासारख्या कांतीचा भिक्षु आहेस. अशा उत्तम कान्तिसंपन्नाला तुला हें श्रामण्य कशाला हवें ? ( ४ )

५५२ राजा अरहसि भवितु चक्कवत्ती रथेसभो ।
चातुरन्तो विजितावी जम्बुसण्डस्स[1] इस्सरो ॥ ५ ॥
५५३ खत्तिया भोजराजानो अनुयुत्ता भवन्ति ते ।
राजाभिराजा मनुजिन्दो रज्जं कारेहि गोतम ॥ ६ ॥
५५४ राजाऽहमस्मि सेला ( ति भगवा ) धम्मराजा अनुत्तरो ।
धम्मेन चक्कं वत्तेमि चक्कं अप्पटिवत्तियं ॥ ७ ॥
५५५ सम्बुद्धो पटिजानासि ( इति सेलो ब्राह्मणो ) धम्मराजा अनुत्तरो ।
धम्मेन चक्कं वत्तेमि इति भाससि गोतम ॥ ८ ॥
५५६ को नु सेनापति भोतो सावको सत्थुदन्वयो[2] ।
को ते इमं अनुवत्तेति धम्मचक्कं पवत्तितं[3] ॥ ९॥

१ म०—जम्बुमण्डस्स. २ म०—सत्थुअन्वयो, ये० गा०—सत्थुरन्वयो
३ म०—पवत्तियं

५५२ तू रथर्षभ, चारही दिशावर सत्ता चालविणारा, विजयी, जम्बुद्वीपाचा ईश्वर असा चक्रवर्ती राजा होण्यास योग्य आहेस. ( ५ )

५५३. हे गोतमा, क्षत्रिय आणि मांडलिक राजे ( भोजराजे ) तुझे अंकित होवोत, राजाधिराज मनुजेन्द्र होऊन तू राज्य कर ! ( ६ )

५५४. हे सेला, मी राजा आहें—असें भगवान् म्हणाला—मी अनुत्तर धर्मराजा आहें. पूर्वी कोणीही न चालू केलेलें असें चक्र मी धर्मानुसार चालू करीत आहें. ( ७ )

५५५ तू आपणाला संबुद्ध म्हणवतोस— असें सेल ब्राह्मण म्हणाला—तू आपणाला अनुत्तर धर्मराजा म्हणवतोस, व हे गोतमा, आणि धर्मानुसार चक्र चालू करतों, असें म्हणतोस, ( ८ )

५५६ तर मग शास्त्याच्या मागोमाग जाणारा सेनापति म्हणता येईल असा तुझा श्रावक कोण ? जें तू धर्मचक्र चालू केलेंस, तें तुझ्या मागोमाग कोण चालू ठेवील ? ( ९ )

५५७ मया पवत्तितं चक्कं ( सेला ति भगवा ) धम्मचक्कं अनुत्तर ।
सारिपुत्तो अनुवत्तेति अनुजातो तथागतं ॥ १० ॥
५५८ अभिञ्ञेय्यं अभिञ्ञातं भावेतब्बं च भावितं ।
पहातब्बं पहीनं मे तस्मा बुद्धोऽस्मि ब्राह्मण ॥ ११ ॥
५५९ विनयस्सु मयि कंखं अधिमुच्चस्सु ब्राह्मण ।
दुल्लभं दस्सनं होति संबुद्धानं अभिण्हसो ॥ १२ ॥
५६० येसं वे दुल्लभो लोके पातुभावो अभिण्हसो ।
सोऽहं ब्राह्मण संबुद्धो सल्लकत्तो अनुत्तरो ॥ १३ ॥
५६१ ब्रह्मभूतो अतितुलो मारसेनप्पमद्दनो ।
सब्बामित्ते वसी कत्वा मोदामि अकुतोभयो ॥ १४ ॥

१ रो०-मयी. २ रो०, सी०-चो.

५५७. मी जें चक्र— हे सेला, असें भगवान् म्हणाला— जें अनुत्तर धर्मचक्र प्रवर्तित केलें, तें तथागताच्या मागोमाग जाणारा शारिपुत्र चालू ठेवील. ( १० )

५५८. हे ब्राह्मणा, जें अभिज्ञेय तें मीं जाणलें, जें भावनीय त्याची भावना केली, व जें त्याज्य त्याचा मी त्याग केला, आणि म्हणून मी बुद्ध आहें. ( ११ )

५५९. हे ब्राह्मणा, माझ्याविषयीं शंका सोड, आणि श्रद्धा धर; कारण, संबुद्धांचें दर्शन वारंवार होणें कठिण आहे. ( १२ )

५६०. हे ब्राह्मणा, ज्यांचा या जगात वारंवार प्रादुर्भाव दुर्लभ अशापैकीं, मी एक अनुत्तर, ( हृदयातील ) शल्य काढणारा संबुद्ध आहे. ( १३ )

५६१. ब्रह्मभूत, अनुपम व मारसेनेचें मर्दन करणारा असा मी सर्व शत्रूंवर जय मिळवून व अकुतोभय होऊन आनंदांत आहें. (१४)

नीच आसन गहेत्वा एकमन्त निसीदि । एकमन्त निसिन्न खो केणिय जटिल भगवा इमाहि गाथाहि अनुमोदि—

५६८ अग्गिहुत्तमुखा यञ्जा सावित्ती छन्दसो मुख ।
राजा मुख मनुस्सान नदीन सागरो मुख ॥२१॥

५६९ नक्खत्तान मुख चन्दो आदिच्चो तपत मुख ।
पुञ्ञ आकखमानान सघो वे यजत मुख ति ॥२२॥

अथ खो भगवा केणिय जटिल इमाहि गाथाहि अनुमोदित्वा उट्ठाय आसना पक्कामि । अथ खो आयस्मा सेलो सपरिसो एको वूपकट्ठो अप्पमत्तो आतापी पहितत्तो विहरन्तो न चिरस्सेव यस्सऽत्थाय कुलपुत्ता सम्मदेव अगारस्मा अनगारिय पब्बजन्ति तदनुत्तर ब्रह्मचरिय-परियोसान दिट्ठे व धम्मे सय अभिञ्ञा सच्छिकत्वा उपसपज्ज विहासि ।

असता, केणिय जटिल त्याच्याजवळ एका बाजूस एक हलकी दर्जाचें आसन मांडून त्यावर बसला. एका बाजूस बसलेल्या केणिय जटिलाचें भगवतानें या गाथांनीं अनुमोदन केलें—

५६८. यज्ञात अग्निहोत्र प्रमुख, छन्दांत सावित्री प्रमुख, मनुष्यांत राजा प्रमुख, आणि नद्यांत सागर प्रमुख होय ( २१ )

५६९. नक्षत्रांत प्रमुख चन्द्र, प्रकाशणाऱ्यांत सूर्य प्रमुख, व पुण्याची इच्छा धरून ज्यांना दान दिलें जातें, त्यांत सघ प्रमुख होय.(२२)

तेव्हां भगवान् केणिय जटिलाचें या गाथांनीं अनुमोदन करून आसनावरून उठून तेथून निघाला. तदनंतर आयुष्मान् सेल, आपल्या विद्यार्थ्यांसह एकाकी, एकांतवासी, सावधान, उत्साही व प्रहितात्मा असा राहून थोड्याच अवकाशात ज्याच्यासाठीं कुलीन लोक घरातून निघून अनागारिक प्रव्रज्या घेतात, तें अनुत्तर ब्रह्मचर्याचें पर्यवसान याच जन्मीं स्वत जाणून साक्षात्कार करून घेऊन राहू लागला.

खीणा जाति, वुसितं ब्रह्मचरियं, कतं करणीयं, नापरं इत्थत्ताया ति अब्भञ्ञासि। अञ्ञतरो च खो पनायस्मा सेलो सपरिसो अरहतं अहोसि। अथ खो आयस्मा सेलो सपरिसो येन भगवा तेनुपसङ्कमि। उपसङ्कमित्वा एकंसं चीवरं कत्वा येन भगवा तेनऽञ्जलिं पणामेत्वा भगवन्तं गाथाहि अज्झभासि—

५७० यं तं सरणमागम्म इतो अट्ठमि चक्खुमे[1]।
सत्तरत्तेन भगवा दन्तम्ह तव सासने ॥२३॥
५७१ तुवं बुद्धो तुवं सत्था तुवं माराभिभू मुनि।
तुवं अनुसये छेत्वा तिण्णो तारेसिमं पजं ॥२४॥
५७२ उपधी ते समतिक्कन्ता आसवा ते पदालिता।
सीहोऽसि अनुपादानो पहीनभयभेरवो ॥२५॥

१ रो०, सी०—चक्खुमा

जन्म क्षीण झाला, ब्रह्मचर्य आचरिलें, कर्तव्य केलें व पुनरपि इहलोकीं येणें नाहीं हें त्यानें जाणलें आणि तो आयुष्मान् सेल आपल्या विद्यार्थ्यांसह अरहन्तांपैकीं एक झाला त्यावर आयुष्मान् सेल आपल्या विद्यार्थ्यांसह भगवन्तापाशीं आला, येऊन एका खांद्यावरून चीवर परिधान करून भगवन्ताला हात जोडून गाथांनी बोलला—

५७० हे चक्षुष्मन्, तुला शरण घेऊन हा आठवा दिवस. हे भगवन्, सात दिवसांत आम्ही या तुझ्या पंथात दान्त झालों आहोंत. (२३)

५७१ तू बुद्ध आहेस, तू शास्ता आहेस, तू माराचा पराभव करणारा मुनि आहेस तू अनुशय छेदून व उत्तीर्ण होऊन या लोकांना तारीत आहेस (२४)

५७२ तू उपाधि उल्लंघिली आहेस, तू आस्रव तोडले आहेत उपादानविरहित व भयभैरवविरहित असा तू सिंह आहेस. (२५)

५७३ भिक्खवो तिसता इमे तिट्ठन्ति पञ्जलीकता ।
पादे वीर पसारेहि नागा वन्दन्तु सत्थुनो' ति ॥२६॥

सेलसुत्तं निट्ठितं ।

३४

[ ८. सल्लसुत्तं ]

५७४ अनिमित्तमनञ्ञातं मच्चानं इध जीवितं ।
कसिरं च परित्तं च तं च दुक्खेन सञ्ञुतं ॥ १ ॥
५७५ न हि सो उपक्कमो अत्थि येन जाता न मिय्यरे ।
जरंऽपि पत्वा मरणं एवंधम्मा हि पाणिनो ॥ २ ॥

---

१ म०—संयुतं.

---

५७३ हे तीनशें भिक्षू हात जोडून उभे आहेत हे वीरा पाय पुढें कर; या नागांना शास्त्याला तुला वंदन करूं दे. ( २६ )

सेलसुत्त समाप्त

३४

[ ८. सल्लसुत्त ]

५७४. मर्त्यांचें इहलोकींचें जीवित बेभरवशाचें आणि अज्ञात आहे. तें कष्टमय, अल्प व दुःखानें मिश्रित आहे. ( १ )

५७५. कारण, असा काहीं उपाय नाहीं कीं जेणेंकरून जन्मलेले ( प्राणी ) मरणार नाहींत. म्हातारे होऊन तरी ते मरणारच. कारण, हा प्राण्यांचा स्वभाव आहे. ( २ )

१ ज्याच्यासंबंधीं निश्चिति किंवा खात्री कोणत्याही प्रकारें देतां येत नाहीं; 'इतके दिवस रहा, तोंपर्यंत मरूं नकोस' असें काहीं त्याला म्हणतां येण्याजोगें नाहीं. [ टीका ]

५७६ फलानमिव पक्कानं पातो पपततो भयं ।
एवं जातान मच्चानं निच्च मरणतो भयं ॥ ३ ॥
५७७ यथाऽपि कुंभकारस्स कता मत्तिकभाजना ।
सब्बे भेदनपरियन्ता एवं मच्चान जीवितं ॥ ४ ॥
५७८ दहरा च महन्ता च ये बाला ये च पण्डिता ।
सब्बे मच्चुवसं यन्ति सब्बे मच्चुपरायणा ॥ ५ ॥
५७९ तेसं मच्चुपरेतानं गच्छतं परलोकतो ।
न पिता तायते पुत्तं ञाति वा पन ञातके ॥ ६ ॥
५८० पेक्खतं येव ञातीनं पस्स लालपतं पुथु ।[१]
एकमेको च मच्चानं गो वज्झो[२] विय निय्यति ॥ ७ ॥

१ म०—पपततो, अ०—पपततो. २ म०—वज्झो.

५७६. पिकलेल्या फळांना जसें सकाळीं सकाळीं पडण्याचें भय, तसें जन्मलेल्या मर्त्यांना नेहमीच मरणाचें भय आहे. (३)

५७७. कुंभारानें केलेल्या मातीच्या भांड्यांचें जसें फुटण्यांत पर्यवसान होतें, तसें मर्त्यांच्या जीविताचें (मृत्यूत) होतें. (४)

५७८. लहान व मोठे, मूर्ख आणि पंडित हे सर्व मृत्यूच्या वश होतात. हे सर्व मृत्युपरायण आहेत. (५)

५७९. मृत्यूनें मारलेले ते परलोकीं जात असतां पिता पुत्राचें किंवा आप्त आप्ताचें रक्षण करूं शकत नाहीं. (६)

५८०. पहा, आप्त पाहत असतां व अनेक प्रकारें शोक करीत असतां मर्त्यांपैकीं प्रत्येक जण वध्य गाईप्रमाणें नेला जातो. (७)

५८१ एवमब्भाहतो लोको मच्चुना च जराय च ।
तस्मा धीरा न सोचन्ति विदित्वा लोकपरियाय ॥ ८ ॥

५८२ यस्स मग्गं न जानासि आगतस्स गतस्स वा ।
उभो,अन्ते असपस्स निरत्थ परिदेवसि ॥ ९ ॥

५८३ परिदेवयमानो चे काचिदत्थं उदब्बहे ।
सम्मूळ्हो हिंसमत्तानं कयिर चेन विचक्खणो ॥ १० ॥

५८४ न हि रुण्णेन सोकेन सन्तिं पप्पोति चेतसो ।
भिय्यस्सुप्पज्जते दुक्खं सरीरं उपहञ्ञति ॥ ११ ॥

५८५ किसो विवण्णो भवति हिंसमत्तानमत्तना ।
न तेन पेता पालेन्ति निरत्था परिदेवना ॥ १२ ॥

१ म०–निधि अत्थ. २ सी०–ब्बेन.

५८१ याप्रमाणें मृत्यूनें आणि जरेनें हा लोक अभ्याहत झाला आहे. म्हणून हा एक लोक-प्रकार आहे हें जाणून सुज्ञ शोक करीत नसतात. ( ८ )

५८२ ज्याचा आलेला किंवा गेलेला मार्ग तुला ठाऊक नाहीं व ज्याचे दोन्ही अन्त दिसत नाहींत, ( अशाविषयीं ) तू वृथा शोक करतोस. ( ९ )

५८३ शोकापासून जर काहीं फायदा होण्यासारखा असेल, तर समूढ होऊन व आपणाला कष्टवून, शाहण्या माणसानें शोक करावा ( १० )

५८४. पण रडण्यानें आणि शोकानें त्याच्या चित्ताला शान्ति मिळत नाहीं, दुःख वाढतें व शरिरावर वाईट परिणाम होतो. (११)

५८५ आपणच आपणाला त्रास देणारा तो कृश आणि निस्तेज होतो त्यायोगें मृताना काहीं संरक्षण प्राप्त करून घेता येत नाहीं. म्हणून शोक व्यर्थ होय. ( १२ )

५८६ सोकमप्पजहं जन्तु भिय्यो दुक्खं निगच्छति ।
अनुत्थुनन्तो कालकतं सोकस्स वसमन्वगू ॥ १३ ॥
५८७ अञ्ञेऽपि पस्स गमिने यथाकम्मूपगे नरे ।
मच्चुनो वसमागम्म फन्दन्ते चिध पाणिनो ॥ १४ ॥
५८८ येन येन हि मञ्ञन्ति ततो तं होति अञ्ञथा ।
एतादिसो विनाभावो पस्स लोकस्स परियायं ॥ १५ ॥
५८९ अपि चे वस्ससतं जीवे भिय्यो वा पन मानवो ।
ञातिसंघा विना होति जहाति इध जीवितं ॥ १६ ॥
५९० तस्मा अरहतो सुत्वा विनेय्य परिदेवितं ।
पेतं कालकतं दिस्वा न सो लब्भा मया इति ॥ १७ ॥

---

५८६. शोक न सोडणारा प्राणी, मेलेल्याची आठवण काढीत, शोकाला वश होऊन अतिशय दुःख भोगतो ( १३ )

५८७ मृत्यूला वश होऊन तडफडणाऱ्या व आपल्या कर्मानुसार जाणाऱ्या दुसऱ्याहि मनुष्य-प्राण्यांकडे पहा. ( १४ )

५८८. आपणाला हें असें असावेंसें वाटतें. पण तें भलतेंच होतें अशा ह्या विपरीत गोष्टी होतात. हा एक लोक-प्रकारच आहे हें पहा. ( १५ )

५८९ जरी मनुष्य शंभर वर्षें किंवा त्याहूनही जास्त जगला, तरी आप्तसमूहापासून निराळा होतोच, इहलोकींच प्राण सोडतो (१६)

५९० म्हणून अर्हन्तांचें वचन ऐकून, मेलेल्याकडे पाहून व हा आता मला मिळणें कठिण असें जाणून शोक सोडून द्यावा (१७)

५९१ यथा सरणमादित्तं वारिना परिनिब्बये[1] ।
एवऽपि धीरो सप्पञ्ञो पण्डितो कुसलो नरो
खिप्पमुप्पतितं सोकं वातो तूलं व धंसये ॥ १८ ॥
५९२ परिदेवं पजप्पं च दोमनस्सं च अत्तनो ।
अत्तनो सुखमेसानो अब्बहे[2] सल्लमत्तनो ॥ १९ ॥
५९३ अब्बूळ्हसल्लो असितो सन्तिं पप्पुय्य चेतसो ।
सब्बसोकं अतिक्कन्तो असोको होति निब्बुतो ति ॥ २० ॥

सल्लसुत्तं निट्ठितं ।

---

१ म०, सी०–परिनिब्बुतो. २ म०–अब्बुहे.

५९१. जसें पेटलेलें घर पाण्यानें विझवावें, त्याप्रमाणें धैर्यवान् सुज्ञ, पंडित आणि कुशल माणसानें उत्पन्न झालेला शोक——वारा कापसाला उडवितो तद्वत्——झटदिशी नाहींसा करावा (१८)

५९२. आपणास सुख व्हावें अशी इच्छा धरणाऱ्यानें आपला शोक, प्रजल्प आणि दौर्मनस्य हें जें अन्तःकरणाचें शल्य तें उपटून टाकावें (१९)

५९३ हें शल्य ज्यानें काढून टाकलेलें आहे व जो अनासक्त आहे, तो चित्ताची शान्ति मिळून व सर्व शोकांचें अतिक्रमण करून अशोक होतो आणि परिनिर्वाण पावतो (२०)

सल्लसुत्त समाप्त

# ३५

## [ ९. वासेट्ठसुत्तं ]

एवं मे सुतं। एकं समयं भगवा इच्छानंगले विहरति इच्छानंगलवनसण्डे। तेन खो पन समयेन सम्बहुला अभिञ्ञाता अभिञ्ञाता ब्राह्मणमहासाळा इच्छानंगले पटिवसन्ति, सेय्यथीदं—चंकी ब्राह्मणो, तारुक्खो ब्राह्मणो, पोक्खरसाति ब्राह्मणो, जानुस्सोणि ब्राह्मणो, तोदेय्यब्राह्मणो, अञ्ञे च अभिञ्ञाता अभिञ्ञाता ब्राह्मणमहासाला। अथ खो वासेट्ठभारद्वाजानं माणवानं जंघाविहारं अनुचंकममानानं अनुविचरमानानं अयमन्तरा-कथा उदपादि—कथं भो ब्राह्मणो होती ति। भारद्वाजो माणवो एवमाह—यतो खो उभतो सुजातो होति मातितो च पितितो च, संसुद्धगहणिको, याव सत्तमा पितामहयुगा अक्खित्तो अनुपक्कुट्ठो

१ रो०—इच्छानकले. २ रो०, म०—जाणुस्सोणि. ३ म०—अनुपकुट्ठो.

# ३५

## [ ९. वासेट्ठसुत्त ]

असें मी ऐकलें आहे. एके समयीं भगवान् इच्छानगल येथें इच्छानगल उपवनात राहत होता. त्या वेळीं इच्छानगलात कित्येक प्रसिद्ध श्रीमंत ब्राह्मण राहत असत. ते हे—चंकी ब्राह्मण, तारक्ष ब्राह्मण, पुष्करसादी ब्राह्मण, जानुश्रोणी ब्राह्मण, तौदेय ब्राह्मण आणि तसेंच दुसरे काहीं प्रसिद्ध श्रीमंत ब्राह्मण राहत. तेव्हा वासेष्ठ आणि भारद्वाज हे दोन विद्यार्थी फिरावयास निघाले असता त्यांच्यात ब्राह्मण कसा होतो, ही गोष्ट निघाली. भारद्वाज विद्यार्थी म्हणाला—आईच्या व बापाच्या बाजूनें अशीं दोन्हीं कुळें शुद्ध असल्यामुळें ज्याचा जन्म पवित्र, सात पिढ्यापर्यंत ज्याच्या कुळा[1] जातिप्रवाद दोष लावता

१ ग्रहणी जन्मासंबंधीचा प्रवाद.

जातिवादेन, एत्तावता खो ब्राह्मणो होती ति। वासेट्ठो माणवो एवमाह— यतो खो भो सीलवा च होति वतसम्पन्नो च, एत्तावता खो ब्राह्मणो होती ति। नेव खो असक्खि भारद्वाजो माणवो वासेट्ठं माणवं सञ्ञापेतुं, न पन असक्खि वासेट्ठो माणवो भारद्वाजं माणवं च सञ्ञापेतुं। अथ खो वासेट्ठो माणवो भारद्वाजं माणवं आमन्तेसि— अयं खो भारद्वाज समणो गोतमो सक्यपुत्तो सक्यकुला पब्बजितो इच्छानङ्गले विहरति इच्छानङ्गलवनसण्डे, तं खो पन भवन्तं गोतमं एवं कल्याणो कित्तिसद्दो अब्भुग्गतो पे० बुद्धो भगवा ति, आयाम भो भारद्वाज, येन समणो गोतमो तेनुपसङ्कमिस्साम, उप-सङ्कमित्वा समणं गोतमं एतमत्थं पुच्छिस्साम, यथा नो समणो गोतमो ब्याकरिस्सति तथा नं धारेस्सामा ति। एवं भो ति खो भारद्वाजो

१ सी०—वत्तसम्पन्नो

येत नाहीं, तोच ब्राह्मण होय वासेष्ठ विद्यार्थी म्हणाला—जो शीलवान् व व्रतसपन्न तोच ब्राह्मण होय भारद्वाज विद्यार्थी वासेष्ठ विद्यार्थ्याची समजूत घालू शकला नाहीं, आणि वासेष्ठ विद्यार्थीही भारद्वाज विद्या-र्थ्याची समजूत घालू शकला नाहीं तेव्हा वासेष्ठ विद्यार्थी भारद्वाज विद्यार्थ्याला म्हणाला—हे भारद्वाजा, हा श्रमण गोतम शाक्य पुत्र शाक्य कुलातून परिव्राजक झालेला इच्छानंगल येथें इच्छानंगल उप-वनात राहत आहे, आणि त्या भवान् गोतमाची अशी कल्याणकारक कीर्ति फैलावली आहे कीं, इत्यादि बुद्ध भगवान् आहे, हे भारद्वाजा, चल, आपण श्रमण गोतमापाशीं जाऊं, जाऊन श्रमण गोतमाला ही गोष्ट विचारूं, व श्रमण गोतम जशी त्याची फोड करील तसा अर्थ समजूं "ठीक आहे" असें भारद्वाज विद्यार्थी वासेष्ठ

१ मज्झिम ( अनु० ३३ ), पहिलाच परिच्छेद पहा.

माणवो वासेट्ठस्स माणवस्स पच्चस्सोसि। अथ खो वासेट्ठ-भारद्वाजा माणवा येन भगवा तेनुपसकमिंसु, उपसकमित्वा भगवता सद्धिं सम्मोदिंसु, सम्मोदनीय कथं साराणीय वीतिसारेत्वा एकमन्त निसीदिंसु। एकमन्त निसिन्नो खो वासेट्ठो माणवो भगवन्त गाथाय अज्झभासि--

५९४ अनुञ्ञातपटिञ्ञाता तेविज्जा मयमस्मुभो।
अहं पोक्खरसातिस्स तारुक्खस्साय माणवो ॥ १ ॥

५९५ तेविज्जानं यदक्खातं तत्र केवलिनोऽस्मसे।
पदकस्मा वेय्याकरणा जप्पे आचरियसादिसा ॥ २ ॥

१ सी०--मयमस्मुमो. २ अ०--जप्पे.

विद्यार्थ्यास उत्तरादाखल बोलला. त्यावर वासेष्ठ व भारद्वाज विद्यार्थी भगवतापाशीं आले, येऊन त्यानीं भगवन्ताला कुशल प्रश्न विचारले, व कुशलप्रश्नादिक समायण आटोपून ते एका बाजूला बसले. एका बाजूला बसून वासेष्ठ विद्यार्थी भगवन्ताला गाथेनें म्हणाला--

५९४. आम्ही दोघे आचार्याकडून 'त्रैविद्य' म्हणून समत असून त्याप्रमाणें आम्ही प्रकट निवेदनही करतों. मी पुष्करसादीचा व हा तारुक्ष्याचा विद्यार्थी आहे. (१)

५९५. त्रैविद्याचें जें शिक्षण त्यात आम्ही पारगत आहोंत. पदात, व्याकरणात आणि जल्पातं आम्ही आचार्यासारखे (प्रवीण) आहोंत (२)

१ म्हणजे वेदात. [ टीका ]

५९६ तेस नो जातिवादस्मिं विवादो अत्थि गोतम ।
जातिया ब्राह्मणो होति भारद्वाजो'ति भासति ।
अहं च कम्मना ब्रूमि एव जानाहि चक्खुम ॥ ३ ॥
५९७ ते न सक्कोम सञ्ञत्तु अञ्ञमञ्ञ मय उभो ।
भगवन्त पुट्ठुमागम्ह सबुद्ध इति विस्सुत ॥ ४ ॥
५९८ चन्द यथा खयातीत पेच्च पञ्जलिका जना ।
वन्दमाना नमस्सन्ति एव लोकस्मिं गोतमं ॥ ५ ॥
५९९ चक्खु लोके समुप्पन्न मय पुच्छाम गोतम ।
जातिया ब्राह्मणो होति उदाहु भवति कम्मना ।
अजानत नो पब्रूहि, यथा जानेमु ब्राह्मण ॥ ६ ॥

१ म०, सी०–कम्मुना. २ म०–सञ्ञापेतुं.

५९६ हे गोतमा, त्या आमच्या जाति-वादासंबंधानें विवाद आहे जन्मानें ब्राह्मण होतो असें भारद्वाज म्हणतो व, हे चक्षुष्मन्, मी कर्मानें ब्राह्मण होतो असें म्हणतों, हें तू समज. ( ३ )

५९७ ते आम्ही दोघे परस्पराची समजूत घालूं शकत नाहीं, त्यासाठीं संबुद्ध म्हणून प्रसिद्ध असलेल्या भगवन्ताला विचारण्यास आम्ही आलों. ( ४ )

५९८. (अमावास्येच्या) क्षयानंतर पुनरुदित होणाऱ्या (निर्जेष्या)[1] चन्द्राला पाहून लोक जसे हात जोडून नमस्कार करतात तसेच ते या जगीं गोतमालाही करतात. ( ५ )

५९९ तू जगाचा चक्षु म्हणून उत्पन्न झाला आहेस. यासाठीं तुला विचारतों कीं, जन्मानें ब्राह्मण होतो कीं कर्मानें होतो ? आम्हास हें समजत नाहीं. तेव्हां ब्राह्मण कसा होतो हें आम्हास समजावून सांग ( ६ )

१ 'जन्म' या अर्थी हा शब्द वापरलेला दिसतो. २–२ दोन्ही–परिपूर्ण

६०० तेसं वोऽहं ब्यक्खिस्सं[1] (वासेट्ठा ति भगवा) अनुपुब्बं यथातथं।
जातिविभंगं पाणानं अञ्ञमञ्ञा हि जातियो ॥ ७ ॥

६०१ तिणरुक्खेऽपि जानाथ न चापि पटिजानरे।
लिंगं जातिमयं तेसं अञ्ञमञ्ञा हि जातियो ॥ ८ ॥

६०२ ततो कीटे पतङ्गे च याव कुन्थकिपिल्लिके।
लिंगं जातिमयं तेसं अञ्ञमञ्ञा हि जातियो ॥ ९ ॥

१ सा०—ब्याखिस्सं, म०—अहं ब्याकिस्सं.

६००. त्या तुम्हांला—हे वासेट्ठा, असें भगवान् म्हणाले—मी अनुक्रमें यथार्थतया प्राण्यांचा जातिविभाग (निरनिराळे प्रकार) समजावून देतों. कारण (प्राणि-)जाती भिन्न भिन्न आहेत. (७)

६०१. तुम्ही गवत आणि झाडें पहा. जरी तीं आपण भिन्न आहोंत असें म्हणत नाहीत, तरी त्यांचा जातिविशिष्ट आकार आहे. कारण त्यांच्यांत भिन्न भिन्न जाती आहेत. (८)

६०२. त्यानंतर किडे, पतंग आणि मुंग-मुंग्या पर्यंतचे (लहान जीव) पहा. त्यांचा जातिविशिष्ट आकार आहे. कारण त्यांच्यांत भिन्न भिन्न जाती आहेत. (९)

१ टीकेच्या अभिप्रायानुसार हा अर्थ दिला आहे. पण दुसरा अर्थ ही शक्य आहे—त्यांची वैशिष्ट्यें 'जातिमय' म्हणजे जन्मतः सिद्ध असे आहेत. कारण हा प्राणि-जाती एकमेकांपासून भिन्न आहेत. टीकाकार देतात हा अर्थ एके ठिकाणीं (६११ च्या गाथेवरील टीकेंत) दुसरे असें देतो—(यथा तिरच्छानानं लिङ्गसण्ठानवसेन जातिनानत्तं मनुस्सेसु ब्राह्मणादीनं अञ्ञो अञ्ञो सरीरेसु न विज्जति.)

६०३ चतुप्पदेऽपि जानाथ खुद्दके च महल्लके।
लिंग जातिमय तेस अञ्ञमञ्ञा हि जातियो ॥ १० ॥
६०४ पादूदरेऽपि जानाथ उरगे दीघपिट्ठिके।
लिंग जातिमय तेस अञ्ञमञ्ञा हि जातियो ॥ ११ ॥
६०५ ततो मच्छेऽपि जानाथ उदके वारि-गोचरे।
लिंग जातिमय तेस अञ्ञमञ्ञा हि जातियो ॥ १२ ॥
६०६ ततो पक्खीऽपि[1] जानाथ पत्तयाने विहगमे।
लिंग जातिमय तेस अञ्ञमञ्ञा हि जातियो ॥ १३ ॥
६०७ यथा एतासु जातीसु लिंग जातिमय पुथु। distinction from b
एव नत्थि मनुस्सेसु लिंग जातिमय पुथु ॥ १४ ॥

१ रो०–ओरके. २–२ रो०–पक्खी विजानाथ.

६०३ ल्हान आणि मोठे चतुष्पदही पहा. त्याचा जातिविशिष्ट आकार आहे. कारण त्याच्यात भिन्न भिन्न जाती आहेत (१०)

६०४. पोटानें सरपटणारे लांब पाठीचे सर्पही पहा. त्याचा जातिविशिष्ट आकार आहे कारण त्याच्यात भिन्न भिन्न जाती आहेत (११)

६०५ तदनंतर पाण्यात वास करणारे जलचर मासेही पहा त्याचा जातिविशिष्ट आकार आहे कारण त्याच्यात भिन्न भिन्न जाती आहेत. (१२)

६०६ त्यानंतर पखांनी उडणारे आकाशमार्गी पक्षीही पहा त्याचा जातिविशिष्ट आकार आहे कारण त्याच्यात भिन्न भिन्न जाती आहेत (१३)

६०७. जसा या प्राणी-जातींत जातिविशिष्ट भिन्न भिन्न आकार सापडतो, तसा मनुष्यात जातिविशिष्ट भिन्न भिन्न आकार सापडत नाहीं (१४)

६०८ न केसेहि न सीसेन न कण्णेहि न अक्खिहि ।
न मुखेन न नासाय ओट्ठेहि भमूहि वा ॥ १५ ॥
६०९ न गीवाय न अंसेहि न उदरेन न पिट्ठिया ।
न सोणिया न उरसा न सम्बाधे न मेथुने ॥ १६ ॥
६१० न हत्थेहि न पादेहि नाङ्गुलीहि नखेहि वा ।
न जङ्घाहि न ऊरूहि न वण्णेन सरेन वा ।
लिंग जातिमय नेव यथा अञ्ञासु जातिसु ॥ १७ ॥
६११ पच्चत्त स-सरीरेसु मनुस्सेस्वेत न विज्जति ।
वोकार च मनुस्सेसु समञ्ञाय पवुच्चति ॥ १८ ॥
६१२ यो हि कोचि मनुस्सेसु गोरक्ख उपजीवति ।
एव वासेट्ठ जानाहि कस्सको सो न ब्राह्मणो ॥ १९ ॥

६०८ केसांनीं, डोक्यानें, कानानीं, डोळ्यानीं, तोंडानें, नाकानें, ओठानीं किंवा भिवयानीं, ( १५ )

६०९ मानेनें, खांद्यानीं, पोटानें, पाठीनें, कमरेनें, छातीनें, लिंगानें किंवा स्त्रीपुरुषसंगानें, ( १६ )

६१०. हातानीं, पायानीं, बोटानीं किंवा नखानीं, जघानीं, मांड्यानीं, वर्णानें किंवा स्वरानें, जसा इतर जातींत जातिविशिष्ट आकार सापडतो, तसा मनुष्यांत नाहींच नाहीं. ( १७ )

६११. हा जातिविशिष्ट आकार माणसा-माणसांच्या शरिरांत भिन्नपणें आढळत नाहीं. मनुष्यजातींतील भेद हा केवळ वाग्-प्रचारावर अवलंबून असतो. ( १८ )

६१२. मनुष्यांत जो कोणी गाई राखून उपजीविका करतो तो, हे वासेट्ठा, शेतकरी आहे, ब्राह्मण नव्हे, असें समज. ( १९ )

१. घोट्यापासून गुडघ्यापर्यंतचा भाग २. ६०१ गाथेवरील टीप पहा

६१३ यो हि कोचि मनुस्सेसु पुथु सिप्पेन जीवति ।
एवं वासेट्ठ जानाहि सिप्पिको सो न ब्राह्मणो ॥ २० ॥
६१४ यो हि कोचि मनुस्सेसु वोहारं उपजीवति ।
एवं वासेट्ठ जानाहि वाणिजो सो न ब्राह्मणो ॥ २१ ॥
६१५ यो हि कोचि मनुस्सेसु परपेस्सेन[1] जीवति ।
एवं वासेट्ठ जानाहि पेस्सिको[2] सो न ब्राह्मणो ॥ २२ ॥
६१६ यो हि कोचि मनुस्सेसु अदिन्नं उपजीवति ।
एवं वासेट्ठ जानाहि चोरो एसो न ब्राह्मणो ॥ २३ ॥
६१७ यो हि कोचि मनुस्सेसु इस्सत्थं उपजीवति ।
एवं वासेट्ठ जानाहि योधाजीवो न ब्राह्मणो ॥ २४ ॥
६१८ यो हि कोचि मनुस्सेसु पोरोहिच्चेन जीवति ।
एवं वासेट्ठ जानाहि याजको सो न ब्राह्मणो ॥ २५ ॥

१ म०—परवेसेन. २ म०—पेस्सको.

६१३. मनुष्यांत जो कोणी भिन्न भिन्न कारागिरीनें उपजीविका करतो तो, हे वासेट्ठा, कारागीर आहे, ब्राह्मण नव्हे, असें समज. (२०)

६१४. मनुष्यांत जो कोणी व्यापारावर उपजीविका करतो तो, हे वासेट्ठा, वाणी आहे, ब्राह्मण नव्हे, असें समज. (२१)

६१५. मनुष्यांत जो कोणी शिपायाचें काम करतो तो, हे वासेट्ठा, शिपाई आहे, ब्राह्मण नव्हे, असें समज. (२२)

६१६. मनुष्यांत जो कोणी चोरीवर उपजीविका करतो तो, हे वासेट्ठा, चोर आहे, ब्राह्मण नव्हे, असें समज. (२३)

६१७. मनुष्यांत जो कोणी धनुर्विद्येवर उपजीविका करतो तो, हे वासेट्ठा, योद्धा आहे, ब्राह्मण नव्हे, असें समज. (२४)

६१८. मनुष्यांत जो कोणी पुरोहितपणावर उपजीविका करतो तो, हे वासेट्ठा, याजक आहे, ब्राह्मण नव्हे, असें समज. (२५)

६१९ यो हि कोचि मनुस्सेसु गामं रट्ठं च भुञ्जति ।
एवं वासेट्ठ जानाहि राजा एसो न ब्राह्मणो ॥ २६ ॥
६२० न चाहं ब्राह्मणं ब्रूमि योनिजं मत्तिसंभवं ।
भोवादि नाम सो होति सचे होति सकिञ्चनो ।
अकिंचनं अनादानं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥ २७ ॥
६२१ सब्बसंयोजनं छेत्वा यो वे न परितस्सति ।
सङ्गातिगं विसंयुत्तं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥ २८ ॥
६२२ छेत्वा नन्धिं[1] वरत्तं च सन्दानं सहनुक्कमं ।
उक्खित्तपलिघं बुद्धं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥ २९ ॥

१ सी०—नद्धिं.

६१९. मनुष्यांत जो कोणी गावावर आणि राष्ट्रावर सत्ता चालवितो तो, हे वासेट्ठा, राजा आहे, ब्राह्मण नव्हे, असें समज. (२६)

६२० आईच्या उदरांतून जन्मणाऱ्याला मी ब्राह्मण म्हणत नाहीं. जर त्याजपाशीं संपत्ति असली, तर तो (इतर जनांस) 'भो'[1] शब्दानें संबोधण्यास योग्य पात्र होतो पण जो संपत्ति-विरहित व आदानविरहित, त्याला मी ब्राह्मण म्हणतों (२७)

६२१ सर्व संयोजनें तोडून जो त्रास पावत नाहीं जो संगाच्या पार जातो, व जो विसंयुक्त त्याला मी ब्राह्मण म्हणतों (२८)

६२२ नधी (क्रोध), वरत्रा (तृष्णा) आणि (अनुशयरूपी) अनुक्रमासहित वागुरा (सांप्रदायिक बुद्धि) तोडून व अर्गल फेकून जो बुद्ध होतो, त्याला मी ब्राह्मण म्हणतों (२९)

१ इतर लोकांशीं बोलतांना, त्यांना हाक मारतांना 'भो', 'भो' असें बोलणारा ब्राह्मणांचे म्हणतो. २-२ नधी आणि वरत्रा म्हणजे एक प्रकारच्या चामड्याच्या वाद्या, ज्यांनी वागुरा करतात, अनुक्रम = क्रमवार गोष्टी.

६२३ अक्कोस वधवन्ध च अदुट्ठो यो तितिक्खति ।
खन्तीबल बलानीक तमहं ब्रूमि ब्राह्मण ॥ ३० ॥
६२४ अक्कोधन वतवन्त सीलवन्त अनुस्सद ।
दन्त अन्तिमसारीर तमहं ब्रूमि ब्राह्मण ॥ ३१ ॥
६२५ वारि पोक्खरपत्ते व आरग्गेरिव सासपो ।
यो न लिप्पति कामेसु तमहं ब्रूमि ब्राह्मण ॥ ३२ ॥
६२६ यो दुक्खस्स पजानाति इधेव खयमत्तनो ।
पन्नभार विसयुत्त तमहं ब्रूमि ब्राह्मण ॥ ३३ ॥
६२७ गभीरपञ्ञ मेधावि मग्गामग्गस्स कोविद ।
उत्तमत्थ अनुप्पत्त तमहं ब्रूमि ब्राह्मण ॥ ३४ ॥

---

६२३. जो द्वेषरहित राहून शिवीगाळी, वध आणि बन्धन संहन करतो, क्षान्तिबळ हेंच ज्याचें सैन्यबळ, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. ( ३० )

६२४. अक्रोधी, व्रतवान्, शीलवान्, ( लोभानें ) न फुगलेला, दान्त व अन्तिम शरीर धारण करणारा, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. ( ३१ )

६२५. कमळ पत्रावरील पाण्याप्रमाणें, व आरीच्या अग्रावरील मोहरीच्या दाण्याप्रमाणें जो विषयोपभोगांत लिप्त होत नाहीं, त्याला मी ब्राह्मण म्हणतों ( ३२ )

६२६ जो याच जन्मीं आपल्या दुःखाचा अन्त जाणतो, ज्यानें आपलें ओझें खालीं टाकलें व जो सयोगविरहित झाला, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. ( ३३ )

६२७ गभीरप्रज्ञ, मेधावी, मार्गामार्ग जाणण्यांत प्रवीण व उत्तमार्थ पावलेला, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. ( ३४ )

६२८ असंसट्ठं गहट्ठेहि अनागारेहि चूभय ।
अनोकसारिं अप्पिच्छं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥ ३५ ॥[1]
६२९ निधाय दण्डं भूतेसु तसेसु थावरेसु च ।
यो न हन्ति न घातेति तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥ ३६ ॥
६३० अविरुद्धं विरुद्धेसु अत्तदण्डेसु निब्बुतं ।
सादानेसु अनादानं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥ ३७ ॥
६३१ यस्स रागो च दोसो च मानो मक्खो च पातितो[2]
सासपोरिव आरग्गा तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥ ३८ ॥
६३२ अकक्कसं विञ्ञापनिं गिरं सच्चं उदीरये ।[3]
याय नाभिसजे कञ्चि तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥ ३९ ॥

१ म०—अनोक्चारि २ म०—ओहितो. ३ म०, अ०—विञ्ञापनिं.

६२८. गृहस्थ आणि परिव्राजक या उभयतांच्या संसर्गापासून मुक्त, गृहबुद्धीपासून दूर राहणारा व अल्पेच्छ, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. ( ३५ )

६२९. त्रस आणि स्थावर भूतमात्राविषयीं दण्डबुद्धि सोडून जो हिंसा करीत नाहीं, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. ( ३६ )

६३०. विरोधी लोकांत अविरोधी, आत्मदमन करणाऱ्यांत शांत व आदान करणाऱ्यांत ( लोभी जनांत ) अनादान, त्याला मी ब्राह्मण म्हणतों ( ३७ )

६३१. ज्याचे काम, क्रोध, अहंकार आणि ( परगुणांबद्दल ) तिरस्कार—हे आरीच्या अग्रावरील मोहरीच्या दाण्याप्रमाणें गळाले, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. ( ३८ )

६३२. अकर्कश, आर्जवी, सत्य व जें कोणालाही दुखणार नाहीं असेंच वचन बोलणारा, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. ( ३९ )

६३३ यो च दीघं व रस्सं वा अणुं थूलं सुभासुभं ।
लोके अदिन्नं नादियति तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥ ४० ॥
६३४ आसा यस्स न विज्जन्ति अस्मिं लोके परम्हि च ।
निरासयं[1] विसंयुत्तं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥ ४१ ॥
६३५ यस्सालया न विज्जन्ति अञ्ञाय अकथंकथी ।
अमतोगधं अनुप्पत्तं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥ ४२ ॥
६३६ यो'ध पुञ्ञं च पापं च उभो सङ्गं उपच्चगा ।
असोकं विरजं सुद्धं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥ ४३ ॥
६३७ चन्दं'व विमलं सुद्धं विप्पसन्नमनाविलं । undisturbed
नन्दीभवपरिक्खीणं[2] तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥ ४४ ॥

१ म०-निरासयं. २ म०-नन्दीराग°

६३३. आणि जो या जगात दीर्घ किंवा ह्रस्व, अणु किंवा स्थूल, सुन्दर किंवा असुंदर वस्तु चोरीत नाहीं, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. (४०)

६३४. ज्याला इह किंवा परलोकाविषयीं आसक्ति नाहीं, जो अनासक्त व विसंयुक्त, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. (४१)

६३५. ज्याला आलय नाहींत, जो ज्ञान पावून निःशंक झाला व जो अमृतापत (निर्वाणप्रत) पोहोंचून त्यांत अवगाहन करतो, त्याला मी ब्राह्मण म्हणतों (४२)

६३६. जो इहलोकीं पुण्य आणि पाप या दोघांचाही संग सोडून गेला, जो अशोक, विमल आणि शुद्ध, त्याला मी ब्राह्मण म्हणतों (४३)

६३७. जो चंद्रासारखा विमल, शुद्ध, प्रसन्न, अनाविल, व ज्याची भवतृष्णा नष्ट झाली, त्याला मी ब्राह्मण म्हणतों (४४)

६३८ यो इम पलिपथ दुग्ग ससार मोहमच्चगा ।
तिण्णो पारगंतो[1] झायी अनेजो अकथकथी ।
अनुपादाय निब्बुतो तमह ब्रूमि ब्राह्मण ॥ ४५ ॥
६३९ यो'ध कामे पहत्वान अनागारो परिब्बजे ।
कामभवपरिक्खीण तमह ब्रूमि ब्राह्मण ॥ ४६ ॥
६४० यो'ध तण्ह पहत्वान अनागारो परिब्बजे ।
तण्हाभवपरिक्खीण तमह ब्रूमि ब्राह्मण ॥ ४७ ॥
६४१ हित्वा मानुसक योग दिब्ब योग उपच्चगा ।
सब्बयोगविसंयुत्त तमह ब्रूमि ब्राह्मण ॥ ४८ ॥
६४२ हित्वा रतिं च अरतिं च सीतिभूत निरूपधिं ।
सब्बलोकाभिभु वीर तमह ब्रूमि ब्राह्मण ॥ ४९ ॥

१ म०–पारगतो.

६३८. जो या विषममार्गी, दुर्गम, मोहमय ससाराच्या पलीकडे गेला, जो उत्तीर्ण, पार गेलेला, ध्यानरत, निष्कम्प, नि शक व उपादानरहित होऊन शात झालेला, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. (४५)

६३९. या जगीं जो विषयोपभोग सोडून अनागारिक प्रव्रज्या घेतो, व ज्याची कामवासना व भववासना नष्ट झाली, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. (४६)

६४०. या जगीं जो तृष्णा सोडून अनागारिक प्रव्रज्या घेतो, ज्याची तृष्णा व भववासना नष्ट झाली, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. (४७)

६४१ जो मानवी बंधन सोडून दिव्यबंधनाच्या पलीकडे गेला, व सर्व बंधनातून मोकळा झाला, त्याला मी ब्राह्मण म्हणतों (४८)

६४२. रति आणि अरति सोडून शात झालेला, निरुपाधि व सर्व लोकविजयी शूर, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. (४९)

६४३ चुतिं यो वेदि सत्तान उपपत्तिं च सब्बसो।
अस्सत्त सुगत बुद्ध तमहं ब्रूमि ब्राह्मण ॥ ५० ॥
६४४ यस्स गतिं न जानन्ति देवा गन्धब्बमानुसा ।
खीणासव अरहन्त तमहं ब्रूमि ब्राह्मण ॥ ५१ ॥
६४५ यस्स पुरे च पच्छा च मज्झे च नत्थि किंचन ।
अकिंचन अनादान तमहं ब्रूमि ब्राह्मण ॥ ५२ ॥
६४६ उसभ पवर धीर महेसिं विजिताविन । महेसि
अनेज नहातक बुद्ध तमहं ब्रूमि ब्राह्मण ॥ ५३ ॥
६४७ पुब्बे-निवास यो वेदि सग्गापाय च पस्सति ।
अथो जातिक्खय पत्तो तमहं ब्रूमि ब्राह्मण ॥ ५४ ॥

१ म०–धीर २ म०–न्हातक

६४३ जो प्राण्यांचें मरण व उत्पत्ति सर्वथैव जाणतो, जो अनासक्त, सुगत आणि बुद्ध, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. ( ५० )

६४४. ज्याची गति देवांना, गन्धर्वांना किंवा मनुष्यांना माहीत नाहीं, जो क्षीणाश्रव, अर्हन्, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. ( ५१ )

६४५ ज्याला पूर्व पदार्थांविषयीं, भावी पदार्थांविषयीं, किंवा वर्तमान पदार्थांविषयीं काहींच वासना नाहीं, जो अकिंचन व आदान-रहित, त्याला मी ब्राह्मण म्हणतों ( ५२ )

६४६. ऋषभ, प्रवर, वीर, महर्षि, विजयी, अप्रकम्प्य, स्नातक आणि बुद्ध, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. ( ५३ )

६४७. जो पूर्वजन्म स्मरतो, सद्गति आणि असद्गति जाणतो, आणि जन्मक्षय ( निर्वाण ) प्राप्त करून घेतो, त्याला मी ब्राह्मण म्हणतों. ( ५४ )

६४८ समञ्ञा हेसा लोकस्मिं नामगोत्तं पकप्पितं ।
सम्मुच्चा समुदागतं तत्थ तत्थ पकप्पितं ॥ ५५ ॥

६४९ दीघरत्तमनुसयितं दिट्ठिगतमजानतं ।
अजानन्ता नो पब्रुन्ति जातिया होति ब्राह्मणो ॥ ५६ ॥

६५० न जच्चा ब्राह्मणो होति न जच्चा होति अब्राह्मणो ।
कम्मना ब्राह्मणो होति कम्मना होति अब्राह्मणो ॥ ५७ ॥

६५१ कस्सको कम्मना होति सिप्पिको होति कम्मना ।
वाणिजो कम्मना होति पेस्सिको होति कम्मना ॥ ५८ ॥

६५२ चोरोऽपि कम्मना होति योधाजीवोऽपि कम्मना ।
याजको कम्मना होति राजाऽपि होति कम्मना ॥ ५९ ॥

१ म०–समञ्ञा. २ रो०– पब्रुवन्ति. ३ म०–कम्मुना.

६४८. नाव आणि गोत्र हा एक जगातला वाक्-प्रचार आहे. लोकसमतीनें तें ठरलें, व त्या त्या ठिकाणीं तसें तसें कल्पिलें जातें. (५५)

६४९. अज्ञान माणसाच्या अन्तःकरणात चिरकाळ वास करणारें असें हें एक मिथ्यादर्शन आहे. अज्ञ जन 'जन्मानें ब्राह्मण होतो' असें आम्हास सागतात. (५६)

६५० जन्मानें ब्राह्मण होत नाहीं व जन्मानें अब्राह्मण होत नाहीं, कर्मानें ब्राह्मण होतो व कर्मानें अब्राह्मण होतो. (५७)

६५१. शेतकरी कर्मानें होतो, कारागीर कर्मानें होतो, वाणी कर्मानें होतो व शिपाई कर्मानें होतो. (५८)

६५२. चोरही कर्मानें होतो, योद्धाही कर्मानें होतो, याजक कर्मानें होतो व राजाही कर्मानें होतो. (५९)

६५३ एवमेतं यथाभूतं कम्मं पस्सन्ति पण्डिता ।
पटिच्चसमुप्पादद्‌दसा कम्मविपाककोविदा ॥ ६० ॥

६५४ कम्मना वत्तती लोको कम्मना वत्तती पजा ।
कम्मनिबन्धना सत्ता रथस्साणीव यायतो ॥ ६१ ॥

६५५ तपेन ब्रह्मचरियेन सयमेन दमेन च । Temperance
एतेन ब्राह्मणो होति एतं ब्राह्मणमुत्तमं ॥ ६२ ॥

६५६ तीहि विज्जाहि सपन्नो सन्तो खीणपुनब्भवो ।
एवं वासेट्ठ जानाहि ब्रह्मा सक्को विजानतं'ति ॥ ६३ ॥

---

१ म०—पटिच्चसमुप्पादस्स. २ म०—वत्तति. ३ अ०—'ब्रह्मानं'लिडति.

६५३. प्रतीत्यसमुत्पाद जाणणारे व कर्मफल जाणण्यात कुशल पंडित याप्रमाणें यथार्थतया कर्म जाणतात. ( ६० )

६५४. कर्मानें जग चालतें, प्राणी कर्मानें जगतात. चालणारा रथ जसा अणीवर अवलंबून असतो, तसे प्राणी कर्मबन्धनावर अवलंबून राहतात ( ६१ )

६५५. तपानें, ब्रह्मचर्यानें, सयमानें आणि दमानें ब्राह्मण होतो. हें ब्राह्मण्य उत्तम होय ( ६२ )

६५६ ( पूर्वजन्म जाणणें, सद्गति दुर्गति जाणणें व जन्म-क्षय प्राप्त करून घेणें या ) तीन विद्यानीं सपन्न, शान्त व ज्याला पुनर्जन्म नाहीं तो, हे वासेष्ठा, सुज्ञाचा शक्र आणि ब्रह्मा आहे, असें समज ( ६३ )

---

१. हें एक बौद्धतत्त्वज्ञानातील महत्त्वाचें अग आहे. स्पष्टीकरणार्थ 'बुद्ध, धर्म आणि सघ' ( द्वितीय आवृत्ति ) पान ४६-४७ पहा.

एवं वुत्ते वासेट्ठभारद्वाजा माणवा भगवन्तं एतदवोचुं—अभिक्कन्त भो गोतम . पे० एते मयं भगवन्तं गोतमं सरणं गच्छाम धम्मं च भिक्खुसंघं च, उपासके नो भवं गोतमो धारेतु अज्जतग्गे पाणुपेते सरणं गते'ति ।

वासेट्ठसुत्तं निट्ठितं ।

३८

[ १०. कोकालियसुत्तं ]

एवं मे सुतं । एकं समयं भगवा सावत्थियं विहरति जेतवने अनाथपिण्डिकस्स आरामे । अथ खो कोकालियो भिक्खु येन भगवा तेनुपसङ्कमि, उपसङ्कमित्वा भगवन्तं अभिवादेत्वा एकमन्तं निसीदि ।

१–१ रो०—सरणागते.

असें म्हटल्यावर वासेष्ठ आणि भारद्वाज विद्यार्थी भगवन्ताला म्हणाले—धन्य ! धन्य! भो गोतमा, इत्यादि ते आम्ही भगवान् गोतमाला शरण जातों, धर्माला व भिक्षुसंघाला शरण जातों आम्ही आजपासून आमरण शरण गेलेले उपासक आहोंत, असें भवान् गोतमानें समजावें.

वासेट्ठसुत्त समाप्त

३८

[ १०. कोकालिकसुत्त ]

असें मी ऐकलें आहे. एके समयीं भगवान् श्रावस्ती येथें जेतवनांत अनाथपिंडिकाच्या आरामात राहत होता. त्या वेळीं कोकालिक भिक्षु भगवन्तापाशीं आला येऊन भगवन्ताला वंदन करून एका बाजूला

१ मुळात कोकालिय असा पाठ आहे, पण अट्ठकथेंत कोकालिक असा आढळतो, व तोच येथें ( भाषान्तरांत ) स्वीकारला आहे.

एकमन्तं निसिन्नो खो कोकालियो भिक्खु भगवन्तं एतद्वोच–पापिच्छा भन्ते सारिपुत्तमोग्गल्लाना, पापिकानं इच्छानं वसं गता ति । एवं वुत्ते भगवा कोकालियं भिक्खुं एतद्वोच– मा हेवं कोकालिय, मा हेवं कोकालिय, पसादेहि कोकालिय सारिपुत्तमोग्गल्लानेसु चित्तं, पेसला सारिपुत्तमोग्गल्लाना ति । दुतियऽपि खो कोकालियो भिक्खु भगवन्तं एतद्वोच–किञ्चापि मे भन्ते भगवा सद्धायिको पच्चयिको, अथ खो पापिच्छा व सारिपुत्तमोग्गल्लाना, पापिकानं इच्छानं वसं गता ति । दुतियऽपि खो भगवा कोकालियं भिक्खुं एतद्वोच–मा हेवं कोकालिय मा हेवं कोकालिय, पसादेहि कोकालिय सारिपुत्तमोग्गल्लानेसु चित्तं, पेसला सारिपुत्तमोग्गल्लाना ति । ततियऽपि खो कोकालियो भिक्खु भगवन्तं एतद्वोच–किञ्चापि मे भन्ते भगवा सद्धायिको पच्चयिको, अथ खो पापिच्छा व सारिपुत्त-

---

बसला एका बाजूस बसून कोकालिक भिक्षु भगवन्ताला म्हणाला—भदन्त शारिपुत्र आणि मौद्गल्यायन हे पापेच्छ असून पापी वासनांना वश झाले आहेत. असें म्हटल्यावर भगवान् कोकालिक भिक्षूला म्हणाला – हे कोकालिका, असें म्हणू नकोस, कोकालिका, शारिपुत्र-मौद्गल्यायनावर विश्वास ठेव शारिपुत्र-मौद्गल्यायन सद्गुणी (पेशल) आहेत दुसऱ्यादाही कोकालिक भिक्षू भगवन्ताला म्हणाला — भदन्त, जरी भगवन्तावर माझी श्रद्धा आणि विश्वास आहे, तरी शारिपुत्र व मौद्गल्यायन हे पापेच्छच असून पापी वासनांना वश झाले आहेत दुसऱ्यादाही भगवान् कोकालिक भिक्षूला म्हणाला–हे कोकालिका, असें म्हणू नकोस, असें म्हणू नकोस, शारिपुत्र मौद्गल्यायनावर विश्वास ठेव, शारिपुत्र-मौद्गल्यायन सद्गुणी आहेत तिसऱ्यादाही कोकालिक भिक्षु भगवन्ताला म्हणाला— भदन्त,

मोग्गल्लाना, पापिकान इच्छान वसगता ति। ततियऽपि खो भगवा कोकालिय भिक्खुं एतदवोच—मा हेवं कोकालिय, मा हेवं कोकालिय, पसादेहि कोकालिय सारिपुत्तमोग्गल्लानेसु चित्तं, पेसला सारिपुत्त-मोग्गल्लाना ति। अथ खो कोकालियो भिक्खु उट्ठायासना भगवन्तं अभि-वादेत्वा पदक्खिणं कत्वा पक्कामि। अचिरपक्कन्तस्स च कोकालियस्स भिक्खुनो सासपमत्तीहि पिळकाहि सब्बो कायो फुटो अहोसि, सासप-मत्तियो हुत्वा मुग्गमत्तियो अहेसुं, मुग्गमत्तियो हुत्वा कळायमत्तियो अहेसुं, कळायमत्तियो हुत्वा कोळट्ठिमत्तियो अहेसुं, कोळट्ठिमत्तियो हुत्वा कोलमत्तियो अहेसुं, कोलमत्तियो हुत्वा आमलकमत्तियो अहेसुं, आमलकमत्तियो हुत्वा बेळुवसलाटुकमत्तियो अहेसुं, बेळुवसलाटुकामत्तियो हुत्वा बिल्लिमत्तियो अहेसुं, बिल्लिमत्तियो हुत्वा पभि-ज्जिंसु, पुब्बं च लोहितं च पग्घरिंसु। अथ खो कोकालियो भिक्खु

---

जरी भगवन्तावर माझी श्रद्धा आणि विश्वास आहे, तरी शारिपुत्र-मौद्गल्यायन हे पापेच्छ असून पापी वासनांना वश झाले आहेत तिसऱ्यादाही भगवान् कोकालिक भिक्षूला म्हणाला— हे कोकालिका, असें म्हणू नकोस, असें म्हणू नकोस, कोकालिका, शारिपुत्र-मौद्गल्यायना-वर विश्वास ठेव, शारिपुत्र-मौद्गल्यायन सद्गुणी आहेत.

तेव्हा कोकालिक भिक्षु आसनावरून उठला, व भगवन्ताला नमस्कार करून व प्रदक्षिणा करून तेथून निघाला. तेथून निघाल्या-बरोबर कोकालिक भिक्षूच्या सर्व शरीरावर मोहरीएवढे फोड उठले. ते मोहरीएवढे होऊन मुगाएवढे झाले, मुगाएवढे होऊन वाटाण्याएवढे झाले, वाटाण्याएवढे होऊन बोराच्या बी एवढे झाले, बोराच्या बीएवढे होऊन बोराएवढे झाले; बोराएवढे होऊन आवळ्या-एवढे झाले, आवळ्याएवढे होऊन कोंवळ्या बेलफळाएवढे झाले;

तेनेवाबाधेन कालं अकासि । कालङ्कतो च कोकालियो भिक्खु पदुमनिरयं उपपज्जि सारिपुत्तमोग्गल्लानेसु चित्तं आघातेत्वा

अथ खो ब्रह्मा सहम्पति अभिक्कन्ताय रत्तिया अभिक्कन्तवण्णो केवलकप्पं जेतवनं ओभासेत्वा येन भगवा तेनुपसङ्कमि, उपसङ्कमित्वा भगवन्तं अभिवादेत्वा एकमन्तं अट्ठासि । एकमन्तं ठितो खो ब्रह्मा सहम्पति भगवन्तं एतदवोच—कोकालियो भन्ते भिक्खु कालङ्कतो, कालङ्कतो च भन्ते कोकालियो भिक्खु पदुमनिरयं उपपन्नो सारिपुत्तमोग्गल्लानेसु चित्तं आघातेत्वा'ति । इदं अवोच ब्रह्मा सहम्पति, इदं वत्वा भगवन्तं अभिवादेत्वा पदक्खिणं कत्वा तत्थेव अन्तरधायि ।

अथ खो भगवा तस्सा रत्तिया अच्चयेन भिक्खू आमन्तेसि—इमं भिक्खवे रत्तिं ब्रह्मा सहम्पति अभिक्कन्ताय रत्तिया ..पे०. आघातेत्वा ति,

---

कोंवळ्या बेलफळाएवढे होऊन (पिकलेल्या) बेलफळाएवढे झाले, आणि पिकलेल्या बेलफळाएवढे होऊन फुटले. त्यातून पू, रक्त वाहू लागलें, आणि त्याच रोगानें कोकालिक भिक्षु मरण पावला. मरण पावल्यावर कोकालिक भिक्षु मनातील शारिपुत्रमौद्गल्यायनाच्या द्वेषामुळें पद्मनरकात जन्मला.

तेव्हा रात्र संपत आली असता, अत्यंत सुन्दर, सहम्पति ब्रह्मा सर्व जेतवन प्रकाशित करून, भगवन्तापाशीं आला, येऊन भगवन्ताला वंदन करून एका बाजूला उभा राहिला. एका बाजूस उभा राहून सहम्पति ब्रह्मा भगवन्ताला म्हणाला—भदन्त, कोकालिक भिक्षु मरण पावला, मरण पावून कोकालिक भिक्षु मनातील शारिपुत्रमौद्गल्यायनाच्या द्वेषामुळें पद्मनरकात जन्मला. असें सहम्पति ब्रह्मा

इदं अवोच ब्रह्मा सहंपति, इदं वत्वा मं अभिवादेत्वा पदक्खिणं कत्वा तत्थेव अन्तरधायी ति। एवं वुत्ते अञ्ञतरो भिक्खु भगवन्तं एतदवोच–कीवदीघं नु खो भन्ते पदुमे निरये आयुप्पमाणं'ति। दीघं खो भिक्खु पदुमे निरये आयुप्पमाणं, तं न सुकरं संखातुं एत्तकानि वस्सानी ति वा, एत्तकानि वस्ससतानी ति वा, एत्तकानि वस्ससतसहस्सानी ति वा'ति। सक्का पन भन्ते उपमं कातुं'ति। सक्का भिक्खू ति भगवा अवोच–सेय्यथाऽपि भिक्खु वीसतिखारिको कोसलको तिलवाहो, ततो पुरिसो वस्ससतस्स अच्चयेन एकं एकं तिलं उद्धरेय्य, खिप्पतरं खो सो भिक्खु वीसतिखारिको कोसलको तिलवाहो इमिना उपक्कमेन परिक्खयं परियादानं गच्छेय्य, न त्वेव एको अब्बुदो निरयो।

१ म०-उपमं.

म्हणाला. असें म्हणून भगवताला वंदन करून व प्रदक्षिणा करून तेथेंच अन्तर्धान पावला.

तदनंतर रात्र संपल्यावर भगवान् भिक्षूंना म्हणाला—भिक्षूंनो, गेल्या रात्री, रात्र संपत आली असतां........इत्यादि........असें सहं-पति ब्रह्मा म्हणाला, असें म्हणून मला वंदन करून व प्रदक्षिणा करून तेथेंच अन्तर्धान पावला.

असें म्हटल्यावर एक भिक्षु भगवंताला म्हणाला—"भदन्त, किती दीर्घ काळ पद्म नरकांत आयुष्याचें मान असतें?" "हे भिक्षु, पद्म नरकांत आयुष्याचें मान फार मोठें आहे; तें इतकी वर्षे, इतकी शतकें, इतकी हजार वर्षे किंवा इतकी लक्ष वर्षे असें गणना करून सांगणें सोपें नाहीं." "भदन्त, पण त्या बाबतींत उपमा देणें शक्य आहे काय?" भगवान् म्हणाला– "हे भिक्षु, तें शक्य आहे. हे भिक्षु, कोसल देशांतील वीस खारी[१] तिळांचा गाडा (वाह) असतो

१ चार आढकांचा द्रोण व १६ द्रोणांची एक खार.

१८ सेय्यथाऽपि भिक्खु वीसति अब्बुदा निरया एवं एको निरब्बुदो निरयो, सेय्यथाऽपि भिक्खु वीसति निरब्बुदा निरया एवं एको अबबो निरयो, सेय्यथाऽपि भिक्खु वीसति अबबा निरया एवं एको अहहो निरयो, सेय्यथाऽपि भिक्खु वीसति अहहा निरया एवं एको अटटो निरयो, सेय्यथाऽपि भिक्खु वीसति अटटा निरया एवं एको कुमुदो निरयो, सेय्यथाऽपि भिक्खु वीसति कुमुदा निरया, एवं एको सोगन्धिको निरयो, सेय्यथाऽपि भिक्खु वीसति सोगन्धिका निरया एवं एको उप्पलको निरयो, सेय्यथाऽपि भिक्खु वीसति उप्पलका निरया एवं एको पुण्डरीको निरयो, सेय्यथाऽपि भिक्खु वीसति पुण्डरीका निरया, एवं एको पदुमो निरयो। पदुमं खो पन भिक्खु निरयं कोकालियो भिक्खु उपपन्नो सारिपुत्तमोग्गल्लानेसु चित्तं आघातेत्वा'ति। इदं अवोच भगवा, इदं वत्वा सुगतो अथापरं एतदवोच सत्था—

व त्यातून एकादा मनुष्य दर शंभराव्या वर्षी एक तीळ काढीत राहील तर, या क्रमाने तो कोशल देशातील वीस खारींच्या तिळाचा गाडा लवकर खलास होईल, पण अर्बुद नरकातील आयुष्य खलास होणार नाही. हे भिक्षु अर्बुदाच्या वीसपट निरर्बुद नरकात आयुष्य, निरर्बुदाच्या वीसपट अबब नरकात आयुष्य, अबबच्या वीसपट अहह नरकांत आयुष्य, हे भिक्षु, अहहच्या वीसपट अटट नरकात आयुष्य, हे भिक्षु, अटटच्या वीसपट कुमुद नरकात आयुष्य. हे भिक्षु, कुमुदाच्या वीसपट सौगन्धिक नरकांत आयुष्य. हे भिक्षु, सौगन्धिकाच्या वीसपट उत्पलक नरकांत आयुष्य. हे भिक्षु, उत्पलकाच्या वीसपट पुण्डरीक नरकात आयुष्य, हे भिक्षु, पुण्डरीकाच्या वीसपट पद्म नरकात आयुष्य. हे भिक्षु, मनातील सारिपुत्र-मोद्गल्यायनांच्या द्वेषामुळें कोकालिक भिक्षु त्या पद्म नरकात जन्मला आहे, असें भगवान् म्हणाले. असें म्हणून तदनंतर तो सुगत शास्ता म्हणाला—

६५७ पुरिसस्स हि जातस्स कुठारी जायते मुखे।
यार छिन्दति अत्तानं बालो दुब्भासितं भणं ॥ १ ॥

६५८ यो निन्दियं पसंसति। तं वा निन्दति यो पसंसियो।
विचिनाति मुखेन सो कलिं। कलिना तेन सुखं न विन्दति ॥ २ ॥

६५९ अप्पमत्तो अयं कलि। यो अक्खेसु धनपराजयो।
सब्बस्सापि सहापि अत्तना। अयमेव महत्तरो कलि।
यो सुगतेसु मनं पदोसये ॥ ३ ॥

६६० सतं सहस्सानं निरब्बुदान। छत्तिंस च पञ्च च अब्बुदानि।
यं अरियगरही निरयं उपेति। वाचं मनं च पणिधाय पापकं ॥४॥

१-१ म०-छत्तिंसति पंच च अब्बुदानं.

६५७. मनुष्य जन्मताच त्याच्या तोंडात कुऱ्हाड उत्पन्न होत असते, जिच्या योगानें मूर्ख दुर्भाषित वाक्य बोलून तो आपणाला तोडतो. ( १ )

६५८. जो निन्द्य माणसाची प्रशंसा करतो, किंवा प्रशंसार्ह माणसाची निंदा करतो, तो आपल्या तोंडानें आपली हानि करतो, व त्या हानीच्या योगें सुख पावत नाही. ( २ )

६५९. जुगारात पैसा गमावणें ही हानि ( कलि ) थोडी आहे. पण सुगताविषयीं मन कलुषित करणें ही स्वत सह सर्वस्वाची हानि म्हणून फार मोठी हानि होय. ( ३ )

६६०. मन आणि वाचा पापकारक बनवून आर्यांची ( साधूंची ) निंदा करणारा एक लक्ष निरर्बुद व छत्तीस आणि पांच अर्बुद वर्षे नरकांत पचतो. ( ४ )

६६१ अभूतवादी निरयं उपेति । यो वाऽपि कत्वा न करोमी ति चाह।
उभोऽपि ते पेच्च समा भवन्ति । निहीनकम्मा मनुजा परत्थ ॥ ५॥

६६२ यो अप्पदुट्ठस्स नरस्स दुस्सति । सुद्धस्स पोसस्स अनङ्गणस्स।
तमेव बालं पच्चेति पापं । सुखुमो रजो पटिवातं'व खित्तो ॥ ६ ॥

६६३ यो लोभगुणे अनुयुत्तो । सो वचसा परिभासति अञ्ञे ।
अस्सद्धो कदरियो अवदञ्ञू । मच्छरि पेसुणियस्मिं अनुयुत्तो ॥७॥

६६४ मुखदुग्ग विभूतमनरिय । भूनहु पापक दुक्कतकारि ।
पुरिसन्तकलि अवजात । मा बहु भाणि'ध नेरयिकोऽसि ॥ ८ ॥

---

६६१. न घडलेली गोष्ट घडली असें म्हणणारा व आपण कृत्य करून तें केलें नाहीं असें म्हणणारा दोघेही नरकाला जातात, ती दोघेही हीनकर्मी माणसें मरणोत्तर परलोकीं एकच गति पावतात. ( ५ )

६६२ निर्दोष, शुद्ध आणि निष्पाप माणसाला जो दोष देतो, त्याच्यावरच तें पापकृत्य वाऱ्यावर फेंकलेल्या सूक्ष्म धुळीप्रमाणें उलटतें. ( ६ )

६६३. लोभात बद्ध झालेला, श्रद्धाविहीन, कृपण, अवदान्य, मत्सरी आणि चहाडी करण्यात गुंतलेला असा जो, तो आपल्या वाणीनें इतरांना दोष लावतो. ( ७ )

६६४. हे विषममुखा, असत्यवादी, अनार्या, भ्रूणहा, पाप्या, दुष्कृत्यकारी, पुरुषाधमा, कली, नीचा, येथें जास्त बोलू नकोस, तू नरयगामी आहेस ( ८ )

---

१ ३१ व्या सुत्तातील पहिली ( ४८७ गाथेवरील ) टीप पहा.

६६५ रजमाकिरसि अहिताय । सन्ते गरहसि किब्बिसकारि ।
बहूनि च दुच्चरितानि चरित्वा । गच्छिसि खो पपतं चिररत्तं ॥९॥

६६६ न हि नस्सति कस्सचि कम्म । एति हे नं लभते'व सुवामि ।
दुक्ख मन्दो परलोके । अत्तनि पस्सति किब्बिसकारी ॥ १० ॥

६६७ अयोसङ्कुसमाहतट्ठान । तिण्हधार अयसूलमुपेति ।
अथ तत्तअयोगुळसन्निभ । भोजनमत्थि तथा पतिरूप ॥ ११ ॥

१ म०—गच्छसि. २ म०—पततिं, अ०—'पपट, पपद' ति पि ३ म०—हनं, अ०—हन्त, अथवा हन्त ४ म०—तत्थ.

६६५ हे कल्मषकाऱ्या, तू सताची निंदा करतोस, व आपल्या अहितासाठी धूळ फेंकतोस, पुष्कळ कुकर्मे करून तू खड्ड्यात जाण्याकरिता चिरकालपर्यंत एकसारखा पडत राहशील[1] (९)

६६६ कारण, केलेलें कर्म फळ दिल्यावाचून नष्ट होत नाहीं. तें कर्त्याच्या मागें लागतें कर्ता त्याचें फळ भोगतोच. तो कल्मषकारी मन्दबुद्धि स्वत परलोकीं दुःख अनुभवितो. ( १० )

६६७. (पायाना बोंचणारे) लोखंडी खिळे मारून तयार केलेल्या जमिनीवर व तीक्ष्ण धारेच्या लोखंडी सुळावर तो जातो, आणि त्याला तेथें योग्य असें तापलेल्या लोखंडाच्या गोळ्यासारखें भोजन मिळतें (११)

१. इतक्या खोल नरकात जाणार आहेस कीं, तेथें जाण्याकरितांच तुला चिरकालपर्यंत खालीं पडत जावें लागेल. टीकाकार (कड्यावरून खालीं असणारा) खड्डा असा अर्थ घेतो.

६६८ न हि वग्गु वदन्ति वदन्ता । नाभिजवन्ति न ताणमुपेन्ति ।
अंगारे सन्थते सेन्ति । अग्गिनिसम जलित पविसन्ति ॥ १२ ॥

६६९ जालेन च ओनहियाना । तत्थ हनन्ति अयोमयकूटेहि ।
अन्धं'व तिमिसमायन्ति । त विततं हि यथा महिकायो ॥१३॥

६७० अथ लोहमय पन कुम्भि । अग्गिनिसम जलित पविसन्ति ।
पच्चन्ति हि तासु चिररत्त । अग्गिनिसमासु समुप्पिलवासो ॥१४॥

६७१ अथ पुब्बलोहितमिस्से । तत्थ किं पचति किब्बिसकारी ।
य यं दिसत अधिसेति । तत्थ किलिस्सति सम्फुसमानो ॥१५॥

१ म०-वितत. २ रो०-नं. ३ रो०, अ०-किलिज्जति.

६६८. तेथें गोड बोलणारे नसतात. रक्षण करण्याला कोणी धावून येत नाहींत, व कोणी त्राण करीत नाहींत. तेथें जमिनीवर पसरलेल्या जळत्या कोळशावर निजावें लागतें व धगधगीत अग्नींत प्रवेश करावा लागतो. ( १२ )

६६९. तेथें त्यांना जाळ्यात बांधून लोखंडी घणांनी ठोकतात, व ते धुक्याप्रमाणें पसरलेल्या अन्धतमांत जातात. ( १३ )

६७०. आणि आगीप्रमाणें प्रज्वलित लोखंडी कढईंत ते पडतात, व त्या आगीसारख्या कढईंत खालीं वर जात येत ते दीर्घकाळ शिजतात. ( १४ )

६७१ आणि तेथें पू आणि रक्त यांनीं भरलेल्या कढईंत कल्मषकारी मनुष्य पडतो. तो ज्या ज्या दिशेला जातो, तेथें तेथें त्या पदार्थांनीं माखला जाऊन कष्ट पावतो. ( १५ )

६७२ पुब्बावसथे सलिलम्हि । तत्थ किं पचति किब्बिसकारी ।
गन्तु न हि तीरमपत्थि[1] । सब्बसमा हि समन्तकपल्ला ॥१६॥
६७३ असिपत्तवनं पन तिण्हं[2] तं पविसन्ति समच्छिदगत्ता ।
जिव्हं बळिसेन गहेत्वा । आरचयारचया विहनन्ति ॥ १७ ॥
६७४ अथ वेतरणिं पन दुग्गं । तिण्हधारं खुरधारमुपेति ।
तत्थ मन्दा पपतन्ति । पापकरा पापानि करित्वा[4] ॥ १८ ॥
६७५ खादन्ति हि तत्थ रुदन्ते । सामा सबला काकोलगणा च ।
सोणा सिगाला पटिगिज्झा । कुलला वायसा च वितुदन्ति ॥१९॥

१ अ०—तीरवमस्तीति पि पाठो. २ म०—समुच्छिसकगत्ता ३ अ०—आरजयारजया ४ म०—पापानि च कत्वा

६७२. तो पापी मनुष्य तेथें किड्यांनीं भरलेल्या पाण्यात पडतो. चारी बाजूस उच काठ असल्यामुळें त्याला बाहेर पडण्यास तीर सापडत नाहीं ( १६ )

६७३. तेथें प्राणी तीक्ष्ण असिपत्रवनात शिरतात त्यांचीं गात्रें छिन्न होतात त्यांच्या जिभा गळानें ओढून काढतात डोक्याभोंवतीं गरगर फिरवून ( जमिनीवर ) आपटले जातात. ( १७ )

६७४. आणि तीक्ष्ण धारेच्या क्षुरधारांनीं भरलेल्या बिकट वैतरणी नदीला ते जातात, व ते मन्दबुद्धि पापी पापें आचरून त्या नदीत पडतात ( १८ )

६७५ तेथें रडत असताना त्याना काळे व कबरे डोम-कावळे, कुत्रे, कोल्हे, सेनपक्षी व कावळे अत्यंत आसक्तीनें टोंचीत असतात. ( १९ )

६७६ किच्छा वतायं इध वुत्ति । यं जनो पस्सति किब्बिसकारी ।
तस्मा इध जीवितसेसे । किच्चकरो सिया नरो न च मज्जे ॥२०॥

६७७ ते गणिता विदूहि तिलवाहा । ये पदुमे निरये उपनीता ।
नहुतानि हि कोटियो पञ्च भवन्ति । द्वादस कोटिसतानि
पुनऽञ्ञा ॥ २१ ॥

६७८ यावदुक्खा निरया इध वुत्ता । तत्थऽपि ताव चिरं वसितब्बं ।
तस्मा सुचिपेसलसाधुगुणेसु । वाचं मनं सततं परिरक्खे'ति॥२२॥

कोकालियसुत्तं निट्ठितं ।

---

६७६. अशा नरकांत वास कठिण, जो कल्मषकारी माणसाला भोगावा लागतो. म्हणून या जगांत शिल्लक असलेलें आयुष्य आहे तोंपर्यंत माणसानें आपलें कर्तव्य करावें व बेसावधपणें वागूं नये. (२०)

६७७. पांच कोटी नहुत ( दशसहस्र ) आणि बाराशें कोटी तिळांच्या गाड्यातील तिळाइतकीं वर्षें पद्मनरकांतील आयुष्य आहे अशी विद्वान् गणना करतात. (२१)

६७८. याप्रमाणें दु:खकारक नरक आहेत आणि त्यात तितका काळ पडावें लागतें. म्हणून शुद्ध, शीलवान् व सद्गुणी जनाविषयीं वाचा आणि मन सतत समाळलें पाहिजे. (२२)

कोकालिकसुत्त समाप्त

३७

## ( ११. नालकसुत्तं )

६७९ आनन्दजाते तिदसगणे पतीते । सक्कच्च इन्दं सुचिवसने च देवे ।
दुस्सं गहेत्वा अतिरिव थोमयन्ते। असितो इसि अद्दसं दिवाविहारे । १

६८० दिस्वान देवे मुदितमने उदग्गे । चित्तिं करित्वा इदं अवोचासि तत्थ
कि देवसंघो अतिरिव कल्यरूपो ।- दुस्सं गहेत्वा ममयथ किं पटिच्च ।। २ ।।

६८१ यदा पि आसि असुरेहि सङ्गमो । जयो सुरानं असुरा पराजिता।
तदाऽपि नेतादिसो लोमहंसनो।किं अब्भुतं दट्ठु मरू पमोदिता ॥३

१ म०–पणीते. २ म०–प्पमुदितमने. ३ सी०–चित्तिं. ४ म०–अवोचा पि. ५ म०– रमथथ.

३७

## [ ११. नालकसुत्त ]

६७९. शुद्ध वस्त्रें परिधान करणारे त्रिदशगण देव आनंदित आणि हर्षित होऊन व इन्द्राचा सत्कार करून वस्त्र उडवीत अत्यंत स्तुति करीत असतां त्यांना 'असित' ऋषीनें दिवसां बसण्याच्या आपल्या स्थानांतून पाहिलें. ( १ )

६८०. तेव्हां मुदितमन आणि उल्लसित अशा देवांना पाहून तो ( ऋषि ) आदरपूर्वक म्हणाला—देवसंघ अत्यंत हर्षित कां ? हें वस्त्र घेऊन तुम्ही ( लोक्यामोंवती ) कां फिरवितां ? ( २ )

६८१. जेव्हां तुमचें असुरांबरोबर युद्ध झालें, व सुरांचा जय आणि असुरांचा पराजय झाला, तेव्हांही तुम्ही इतके हर्षित झालां नाहीं, आज कोणती अद्भुत गोष्ट पाहून; देवहो, तुम्ही आनंदित झालांत ? (३)

६८२ सेळेन्ति गायन्ति च वादयन्ति च। भुजानि पोठेन्ति च नच्चयन्ति च
पुच्छामि वोऽहं मेरुमुद्धवासिने। धुनाथ मे संसयं खिप्प मारिसा। ४
६८३ सो बोधिसत्तो रतनवरो अतुल्यो। मनुस्सलोके हितसुखताय जातो।
सक्यान गामे जनपदे लुम्बिनेय्ये। तेनऽम्ह तुट्ठा अतिरिव कल्यरूपा ॥५॥
६८४ सो सब्बसत्तुत्तमो अग्गपुग्गलो। नरासभो सब्बपजानमुत्तमो।
वत्तेस्सति चक्कं इसिव्हये वने। नदं व सीहो बलवा मिगाभिभू ॥६
६८५ तं सद्दं सुत्वा तुरितं अवसरी सो। सुद्धोदनस्स तद भवनं उपागमि।
निसज्ज तत्थ इदं अवोचासि सक्ये। कुहिं कुमारो अहमपि दट्ठुकामो ॥७॥

१ म०-न्यो २ रो०-मिगाधिभू

६८२. काही शीळ वाढीव आहेत, काही गात आहेत, काही वाजवीत आहेत, काही दंड थोपटीत आहेत आणि काही नाचत आहेत, तें का? हें मी तुम्हा मेरुपर्वतावर राहणाऱ्यांना विचारतो. हे मारिषानो, तुम्ही माझा संशय लौकर दूर करा. (४)

६८३ (देव-) तो वररत्नासारखा अतुल बोधिसत्त्व मनुष्यलोकीं लुंबिनीप्रदेशात शाक्यांच्या गावीं जगताच्या कल्याणासाठीं जन्मला आहे. त्यामुळे आम्ही अत्यंत हृष्ट तुष्ट झालों आहोत (५)

६८४ तो सर्व प्राण्यांत उत्तम, अग्रपुरुष, मनुष्यर्षभ, व सर्व लोकांत श्रेष्ठ, आपल्या गर्जनेनें सर्व मृगांचा पराभव करणाऱ्या बलवान् सिंहाप्रमाणें, (सर्वांचा पराभव करून) ऋषिपत्तन नांवाच्या वनांत धर्मचक्र प्रवर्तित करील. (६)

६८५. तेव्हा तें देवांचें वचन ऐकून, तो (ऋषि) त्वरीं उतरला (व) शुद्धोदनाच्या घरीं आला, व तेथें बसून शाक्यांना म्हणाला—कुमार कोठें आहे? मीही त्याला पाहू इच्छितो. (७)

६८६ ततो कुमार जलित इव सुवण्ण । उक्कामुखे व सुकुसलसम्पहट्ठ ।
दद्दल्लमान सिरिया अनोमवण्ण । दस्संसु[1] पुत्त असितव्हयस्स
सक्या ॥८॥

६८७ दिस्वा कुमार सिखिमिव पज्जलन्त । तारासभ व नभसिगम विसुद्ध ।
सुरिय तपन्त सरदरिवे[2] अब्भमुत्त । आनन्दजातो विपुलमलत्थ
पीतिं ॥९॥

६८८ अनेकसाखे च सहस्समण्डल । छत्त मरू धारयु अन्तलिक्खे ।
सुवण्णदण्डा वीतिपतन्ति चामरा । न दिस्सरे चामरछत्त-
गाहका ॥१०॥

१ म०–दस्सिसु २-२ म०–सारदिरावब्भमुत्त.

६८६ त्यावर शाक्यांनी, हुशार सोनारानें मुशींत घालून प्रज्वलित करून ठोकून तयार केलेल्या सोन्याप्रमाणें कान्तीनें देदीप्यमान व उत्तमवर्णी, अशा त्या बालक पुत्राला 'असित' नावाच्या ( ऋषीला ) दाखविलें ( ८ )

६८७. अग्नीप्रमाणें प्रज्वलणाऱ्या, आकाशात संचार करणाऱ्या तारापति चन्द्राप्रमाणें विशुद्ध, आणि शरदृतूत अभ्रापासून मुक्त झालेल्या सूर्याप्रमाणें प्रकाशणाऱ्या त्या बालकाला पाहून ऋषि आनंदित झाला व विपुल प्रेम पावला ( ९ )

६८८ देवानीं अंतरिक्षात अनेक काड्यांचें आणि हजार मंडलांचें छत्र धरलें, व सोन्याच्या दांड्याचीं चामरें उडू लागलीं, पण चामरें आणि छत्र धारण करणारे दिसत नव्हते. ( १० )

६८९ दिस्वा जटी कण्हसिरिव्हयो इसि । सुवण्णनेक्खं विय पण्डुकम्बले ।
सेतं च छत्तं धरियंत[1] मुद्धनि । उदग्गचित्तो सुमनो पटिग्गहे ॥ ११ ॥

६९० पटिग्गहे वा पन सक्यपुङ्गवं । जिगिंसको[2] लक्खणमन्तपारगू ।
पसन्नचित्तो गिरमब्भुदीरयि । अनुत्तरायं दिपदानमुत्तमो ॥ १२ ॥

६९१ अथऽत्तनो गमनमनुस्सरन्तो । अकल्यरूपो गल्येति[3] अस्सुकानि ।
दिस्वान सक्या इसिमवोचुं रुदन्तं । नो चे कुमारे भविस्सति अन्तरायो ॥ १३ ॥

१ म०—धारयन्त. २ म०—जिगीसको ३ म०—गरयति, अ०—'गरयति' इति पि

६८९ पांढऱ्या शालीवर ठेवलेल्या सोन्याप्रमाणें शोभणाऱ्या व ज्याच्या मस्तकावर श्वेत छत्र धरलें आहे, अशा त्याला पाहून हर्षित आणि संतुष्ट झालेल्या त्या जटाधारी 'कृष्णश्री' नांवाच्या ऋषीनें त्याला आपल्या हातात घेतलें (११)

६९० आणि लक्षणें आणि मंत्र जाणण्यात पारंगत असलेल्या (त्या ऋषीनें) शाक्यपुंगवाला (बोधिसत्त्वाला) घेऊन व त्याची परीक्षा करून प्रसन्न चित्तानें असे उद्गार काढले—"हा लोकोत्तर बालक द्विपदात उत्तम आहे" (१२)

६९१ आणि आपलें इहलोकातून (भविष्य कालातील) जाणें ध्यानात आणून व दुःखित होऊन तो आसवें गाळू लागला त्या रुदन करणाऱ्या ऋषीला पाहून शाक्य म्हणाले, या कुमाराला काहीं अंतराय नाहीं ना? (१३)

१ ६९४ वी गाथा पहा

६९२ दिस्वान सक्ये इसिमवोच अकल्ये । नाहं कुमारे अहितमनुस्सरामि ।
न चापि'मस्स भविस्सति अन्तरायो । न ओरकायं अधिमनसा भवाथ ॥१४॥

६९३ संबोधियग्गं फुसिस्सताय कुमारो। सो धम्मचक्कं परमविसुद्धदस्सी।
वत्तेस्सतायं बहुजनहितानुकम्पी । वित्थारिकऽस्स भविस्सति ब्रह्मचरियं ॥१५॥

६९४ ममं च आयु न चिरमिधावसेसो । अथऽन्तरा मे भविस्सति कालकिरिया ।
सो'हं न सुस्सं अ-सम-धुरस्स धम्मं । तेनऽम्हि अट्टो व्यसनगतो अघावी ॥१६॥

१ म०—अट्ठो.

६९२ दुःखित झालेल्या शाक्यांना पाहून ऋषि म्हणाला—या कुमाराला काहीं अहित आहे असें मला वाटत नाहीं, किंवा याला कोणताही अन्तराय होणार नाहीं. हा सामान्य नव्हे. यासाठीं तुम्ही आनंदित रहा. ( १४ )

६९३. हा कुमार श्रेष्ठ असा संबोध प्राप्त करून घेईल. परम विशुद्ध ( निर्वाणाचा ) साक्षात्कार करून घेणारा तो बहुजनांच्या कल्याणाबद्दल कळवळा येऊन धर्मचक्राचें प्रवर्तन करील. यानें प्रवर्तिलेला ब्रह्मचर्याचा संप्रदाय लोकांत विस्तार पावेल. (१५)

६९४. पण माझें इहलोकीं आयुष्य थोडें राहिलें आहे, आणि तो ( बुद्ध ) होण्यापूर्वी मी मरणार आहे. तो मी त्या अप्रतिम धुरीणाचा धर्म ऐकूं शकणार नाहीं. त्यामुळें मी आर्त, व्यसनप्राप्त व दुःखी झालों आहें. ( १६ )

६९५ सो साकियान विपुल जनेत्वे पीतिं । अन्तेपुरम्हा निरगमा ब्रह्मचारी ।
सो भागिनेय्यं सयमनुकम्पमानो । समादपेसि अ-मम धुरस्स धम्मे ॥१७॥
६९६ बुद्धो[1] ति घोसं यद परतो सुणासि । सम्बोधिपत्तो विचरति धम्ममग्गं ।
गन्त्वान तत्थ समयं परिपुच्छियानो । चरस्सु तस्मिं भगवति ब्रह्मचरियं ॥१८॥
६९७ तेनानुसिट्ठो हितमनसेन तादिना । अनागते परमविसुद्धदस्सिना ।
सो नालको उपचितपुञ्ञसञ्चयो । जिनं पतिक्खं परिवसि रक्खितिन्द्रियो ॥१९॥

१ म०—जनेत्वा । बहि अन्तेपुरम्हा . २ म०—विचरति
३—म०—परिपुच्छमानो

६९५ तो ब्रह्मचारी शाक्यांच्या ठिकाणीं विपुल प्रेम उत्पादन करून अंतःपुरातून निघाला आपल्या भाच्यावर दया करणाऱ्या त्यानें भाच्याला अप्रतिम धुरीणाच्या धर्माचा बोध करून घेण्यासाठीं (असा) उपदेश केला—(१७)

६९६ "जेव्हां तू 'बुद्ध' हा शब्द इतरांकडून ऐकशील व जेव्हां बुद्ध संबोधि-ज्ञान मिळवून श्रेष्ठ धर्माचा जनांत प्रचार करील, तेव्हां तेथें जाऊन धर्माविषयीं प्रश्न विचार, व भगवंताच्या पंथांत ब्रह्मचर्याचें आचरण कर" (१८)

६९७ भविष्यकाळीं (नालकाला) परम विशुद्ध (निर्वाणाचा) लाभ होणार आहे, असें जाणणाऱ्या तशा त्या हितबुद्धि ऋषीनें उपदेश केल्यावर, तो कृतपुण्यसंचय नालक आपल्या इन्द्रियांचें रक्षण करणारा तापस होऊन जिनाची (बुद्धाची) प्रतीक्षा करीत राहिला (१९)

६९८ सुत्वान घोसं जिनवरचक्कवत्तने । गन्त्वान दिस्वा इसिनिसभं पसन्नो ।
मोनेय्यसेट्ठं मुनिपवरं अपुच्छि । समागते असितव्हयस्स सासने' ति ॥२०॥

वत्थुगाथा निट्ठिता ।

६९९ अञ्ञातमेतं वचनं असितस्स यथातथं ।
तं तं गोतम पुच्छाम सब्बधम्मान पारगुं ॥ २१॥
७०० अनगारियुपेतस्स भिक्खाचरियं जिगिंसतो ।
मुनि पब्रूहि मे पुट्ठो मोनेय्यं उत्तमं पदं ॥ २२ ॥
७०१ मोनेय्यं ते उपञ्ञिस्सं ( ति भगवा) दुक्करं दुरभिसम्भवं ।
हन्द ते नं पवक्खामि सन्थम्भस्सु दळ्हो भव ॥ २३ ॥

१ म०—असिताह्वयस्स २ म०—उपञ्ञस्सं

६९८. असित नावाच्या ऋषीनें सांगितलेली वेळ आली तेव्हां, जिनश्रेष्ठानें धर्मचक्र प्रवर्तित केल्याची ख्याति ऐकून, तेथें जाऊन ऋषिसत्तमाला पाहून प्रसन्न झालेल्या त्या नालकानें मुनिप्रवराला श्रेष्ठ मौनेय कोणतें तें विचारलें. ( २० )

[ ( वरील ) गाथा प्रास्ताविक आहेत ]

६९९. असिताचें हें यथार्थ वचन मी जाणतों म्हणून सर्व धर्मांत पारंगत अशा गोतमाला मी विचारतों ( २१ )

७००. हे मुने, गृहविरहित झालेल्याला व भिक्षेवर निर्वाह करणाऱ्याला उत्तम पद असें मौनेय कोणतें तें विचारतों, तें मला सांग (२२)

७०१ मौनेय कोणतें तें मी तुला सांगतों असें भगवान् म्हणाला— तें दुष्कर आणि दुरभिसंभव आहे. आतां तुला तें सांगतों तू नेट धर व दृढ हो. ( २३ )

७०२ समानभीत्तं कुब्बेथ गामे अक्कुट्ठवन्दितं।
मनोपदोसं रक्खेय्य सन्तो अनुण्णतो चरे ॥ २४ ॥
७०३ उच्चावचा निच्छरन्ति दाये अग्गिसिखूपमा।
नारियो मुनिं पलोभेन्ति ता सु तं मा पलोभयुं ॥ २५ ॥
७०४ विरतो मेथुना धम्मा हित्वा कामे परोवरे[२]।
अविरुद्धो असारत्तो पाणेसु तसथावरे ॥ २६ ॥
७०५ यथा अहं तथा एते, यथा एते तथा अहं।
अत्तानं उपमं कत्वा न हनेय्य न घातये ॥ २७॥
७०६ हित्वा इच्छं च लोभं च यत्थ सत्तो पुथुज्जनो।
चक्खुमा पटिपज्जेय्य तरेय्य नरकं इमं ॥ २८ ॥

१ अ०, म०—समानभागं, २ म०—परोपरे.

७०२. गावात गेलें असता वन्दन आणि निन्दा यांजविषयी समभावानें वागावें, मनांतील प्रद्वेष आवरावा, व शांत होऊन निगर्वी व्हावें. (२४)

७०३. अरण्यांतील अग्निज्वालाप्रमाणें लहान मोठीं (प्रलोभनें इतस्ततः) संचार करीत असतात. स्त्रिया मुनीला लोभवूं पाहतात. त्यांनीं तुला मोहांत न पाडावें (याबद्दल सावध रहा). (२५)

७०४. लहान मोठे कामोपभोग सोडून स्त्रीसंगापासून विरत हो आणि स्थिर-चर प्राण्यांवर अविरुद्ध व अनासक्त होऊन रहा. (२६)

७०५. 'जसा मी तसे हे, व जसे ते तसा मी' असें आपल्या उदाहरणानें जाणून कोणाला मारूं नये व मारवूं नये. (२७)

७०६. ज्या इच्छेंत आणि लोभांत सामान्य जन बद्ध होतो, त्या इच्छेचा आणि लोभाचा त्याग करून चक्षुष्मन्तानें वागावें, व हे नरक तरून जावें. (२८)

७०७ ऊनूदरो मिताहारो अप्पिच्छस्स अलोलुपो ।
स वे इच्छाय निच्छातो अनिच्छो होति निब्बुतो ॥ २९ ॥
७०८ स पिण्डचारं चरित्वा वनन्तं अभिहारये ।
उपट्ठितो रुक्खमूलस्मिं आसनूपगतो मुनि ॥ ३० ॥
७०९ स झानपसुतो धीरो वनन्ते रमितो सिया ।
झायेथ रुक्खमूलस्मिं अत्तानं अभितोसयं ॥ ३१ ॥
७१० ततो रत्या विवसने गामन्तं अभिहारये ।
अव्हानं नाभिनन्देय्य अभिहारं च गामतो ॥ ३२ ॥
७११ न मुनी गाममागम्म कुलेसु सहसा चरे ।
घासेसनं छिन्नकथो न वाचं पयुतं भणे ॥ ३३ ॥

---

१ म०— मुनि.

---

७०७. त्यानें थोडें खाणारा, मिताहारी, अल्पेच्छ व अलोलुप व्हावें. तो इच्छेपासून मुक्त होऊन अनिच्छ व शांत होतो. ( २९ )

७०८ त्या मुनीनें भिक्षाटन करून अरण्यांत जावें. तेथें झाडाखाली जाऊन आसनावर बसावें. ( ३० )

७०९. त्या ध्यानरत धीर पुरुषानें वनांत आनंद मानावा, व झाडाखालीं बसून आपणाला सन्तोषित करून ध्यान करावें. ( ३१ )

७१०. त्यानंतर रात्र सरल्यावर गावाच्या टोकाशीं असलेल्या निवासस्थानीं यावें. गावांतून आलेल्या आमन्त्रणाचें किंवा भेटीचें (आपल्या मनांत) अभिनंदन करू नये (३२)

७११. गावांत येऊन तेथील कुटुंबांशीं मुनीनें सलगी करू नये भिक्षा मिळविण्याच्या बाबतींत मौन धरावें व सूचक शब्द बोलूं नयेत. ( ३३ )

७१२ अलत्थ यदिदं साधु नालत्थ कुसलामिति ।
उभयेनेव सो तादि रुक्खं व उपनिवत्तति ॥ ३४ ॥
७१३ स पत्तपाणि विचरन्तो अमूगो मूगसम्मतो ।
अप्पं दानं न हीळेय्य दातारं नावजानिय ॥ ३५ ॥
७१४ उच्चावचा हि पटिपदा समणेन पकासिता ।
न पारं दिगुणं यन्ति न इदं एकगुणं मुतं ॥ ३६ ॥
७१५ यस्स च विसता नत्थि छिन्नसोतस्स भिक्खुनो ।
किच्चाकिच्चप्पहीनस्स परिळाहो न विज्जति ॥ ३७ ॥
७१६ मोनेय्यं ते उपञ्ञिस्सं ( ति भगवा ) खुरधारूपमो भवे ।
जिव्हाय तालुं आहच्च उदरे संयतो सिया ॥ ३८ ॥

१ रो०— तादी २ अ०— दुगुणं

७१२. 'जर भिक्षा मिळाली तर चांगलें, न मिळाली तरी चांगलें' दोन्हींविषयीं तो समान राहतो, व (राहण्याच्या) झाडाखालीं येतो. (३४)

७१३. हातात भिक्षापात्र घेऊन फिरणारा व मुका नसून मुक्यासारखा समजला जाणारा, अशा त्यानें अल्प भिक्षेचा तिरस्कार व दात्याचा अनादर करूं नये (३५)

७१४. श्रमणानें (बुद्धानें) लहानमोठा रस्ता दाखविला आहे. संसाराच्या पार दोनदा जात नसतात, तरीपण तो पार एकाच टप्प्यात प्राप्त होतो असें समजूं जाऊं नाहीं (३६)

७१५ ज्या भिक्षूला आसक्ति नाहीं, ज्यानें संसारस्रोत तोडले, व जो कृत्याकृत्यापासून मुक्त झाला, त्याला परिदाह राहत नाहीं (३७)

७१६ मी तुला मौनेय सांगतों—असें भगवान् म्हणाला—क्षुरधारेपासून (आपली जीभ राखून वस्तऱ्यावरील मध चाटणाऱ्या माणसाप्रमाणें) सावध व्हावें, जीभ टाळूला लावून जेवणात संयम बाळगावा (३८)

७१७ अलीनचित्तो च सिया न चापि बहु चिन्तये ।
निरामगन्धो असितो ब्रह्मचरियपरायणो ॥ ३९ ॥

७१८ एकासनस्स सिक्खेथ समणोपासनस्स च ।
एकत्तं मोनमक्खातं एको चे अभिरमिस्सति ॥ ४० ॥

७१९ अथ भासिहि दस दिसा
सुत्वा धीरानं निग्घोसं झायीनं कामचागिनं ।
ततो हिरिं च सद्धं च भिय्यो कुब्बेथ मामको ॥ ४१ ॥

७२० तं नदीहि विजानाथ सोब्भेसु पदरेसु च ।
सणन्ता यन्ति कुस्सोब्भा तुण्ही याति महोदधि ॥४२॥

१ अ०–अभिरमस्सति, २ रो०–कामचागीन.

७१७. चित्त जागृत ठेवावें पण फार चिन्तनही करू नये; निरामगंध, अनाश्रित आणि ब्रह्मचर्यपरायण व्हावें. ( ३९ )

७१८. एकांतवासाची व श्रमण ज्याची उपासना करतात अशा ( ध्यानचिंतनाची ) शिकवण मनांत बाळगावी. एकाकीपणाला मौन म्हणतात. जर एकाकी राहण्यांत तुला आनंद वाटू लागेल, ( ४० )

७१९. तर ध्यानरत कामत्यागी धीरांचें भाषण ऐकून तू दशदिशा प्रकाशित करशील. तरी (त्या स्थितीस पोहोंचलेल्या) माझ्या श्रावकानें ह्री ( पापलज्जा ) आणि श्रद्धा वाढवावी ( ४१ )

७२०. तें नदीच्या ( उपमेनें ) जाणावें. ओढे खाचखळग्यांतून व खिंडींतून मोठा आवाज करीत वाहतात, पण मोठ्या नद्या स्तब्धपणें वाहतात. ( ४२ )

७२१ यदूनकं त सणति यं पूरं सन्तमेव तं ।
अड्ढकुंभूपमो बालो रहदो पूरो'व पण्डितो ॥ ४३ ॥

७२२ यं समणो बहु भासति उपेत अत्थसंहितं ।
जानं सो धम्मं देसेति जानं सो बहु भासति ॥ ४४ ॥

७२३ यो च जानं यतत्तो जानं न बहु भासति ।
स मुनि मोनमरहति स मुनि मोनमज्झगा'ति ॥ ४५ ॥

नालकसुत्तं निट्ठितं ।

---

१ सी०—संयतत्तो २ म०—मुन.

७२१. जें उथळ तें खळखळतें, पण जें गंभीर तें संथच असतें. मूर्ख अर्ध्या घड्याप्रमाणें ( खळखळतो ); पण सुज्ञ गंभीर जलह्रदाप्रमाणें ( शांत असतो ). ( ४३ )

७२२. श्रमण ( बुद्ध ) जें पुष्कळ बोलतो, तें हितयुक्त आणि अर्थयुक्त आहे असें जाणून बोलतो. जाणून तो धर्मोपदेश करतो, व जाणून पुष्कळ बोलतो. ( ४४ )

७२३. जो संयतात्मा जाणत असतां पुष्कळ बोलत नाहीं, तो मुनि मौनार्ह होय; त्या मुनीनें मौन प्राप्त केलें आहे. ( ४५ )

नालकसुत्त समाप्त

consideration

समुदयो ति अय एकानुपस्सना, अय दुक्खनिरोधो अय दुक्खनिरोधगामिनी पटिपदा ति अय दुतियानुपस्सना। एव सम्माद्वयतानुपस्सिनो खो भिक्खवे भिक्खुनो अप्पमत्तस्स आतापिनो पहितत्तस्स विहरतो द्विन्न फलान अञ्ञतर फल पाटिकङ्ख–दिट्ठे व धम्मे अञ्ञा, सति वा उपादिसेसे अनागामिता ति। इदमवोच भगवा, इद वत्वा सुगतो अथापर एतदवोच सत्था—

७२४ ये दुक्ख नप्पजानन्ति अथो दुक्खस्स सम्भव।
यत्थ च सब्बसो दुक्ख असेस उपरुज्झति।
त मग्ग न जानन्ति दुक्खूपसमगामिन ॥ १ ॥

---

म्हणातें की, द्वैत धर्माचें ( पदार्थांचें ) यथार्थ ज्ञान करून घेणें हा फायदा होय तें द्वैत कोणतें म्हणता ? हें दु ख व हा दु खसमुदय मिळून एक अनुपश्यना, आणि हा दु खनिरोध व हा दु खनिरोधगामी मार्ग मिळून दुसरी अनुपश्यना भिक्षूनो, याप्रमाणें द्वैताची सम्यक् अनुपश्यना करणाऱ्या, अप्रमत्त, उत्साही व दृढचित्त होऊन वागणाऱ्या भिक्षूला याच जन्मीं अर्हत्त्व किंवा, उपादानशेष राहिल्यास, अनागामिता—या दोहोंपैकीं एक फळ मिळण्याची अपेक्षा करतां येईल असें भगवान् म्हणाला असें म्हणून तदनंतर तो सुगत शास्ता म्हणाला—

७२४ जे दु ख आणि दु खाचा उगम जाणत नाहींत, आणि तें दु ख जेथें नि शेष विरोध पावतें तें स्थान ( निर्वाण ), व त्या दु खनिरोधाप्रत जाणारा मार्ग जाणत नाहींत, ( १ )

७२५ चेतोविमुत्तिहीना ते अथो पञ्ञाविमुत्तिया।
अभब्बा ते अन्तकिरियाय ते वे जातिजरूपगा ॥ २ ॥

७२६ ये च दुक्खं पजानन्ति अथो दुक्खस्स सम्भवं।
यत्थ च सब्बसो दुक्खं असेसं उपरुज्झति।
तं च मग्गं पजानन्ति दुक्खूपसमगामिनं ॥ ३ ॥

७२७ चेतोविमुत्तिसम्पन्ना अथो पञ्ञाविमुत्तिया।
भब्बा ते अन्तकिरियाय न ते जातिजरूपगा ति ॥ ४ ॥

सिया अञ्ञेन पि परियायेन सम्माद्वयतानुपस्सना ति, इति चे भिक्खवे पुच्छितारो अस्सु, सिया ति ऽस्सु वचनीया। कथं च सिया। यं किंचि दुक्खं सम्भोति, सब्बं उपधिपच्चया ति अयं एकानुपस्सना,

७२५ त्यांना चित्ताची विमुक्ति आणि प्रज्ञेनें मिळालेली विमुक्ति नाहीं, ते (संसारदुःखाचा) अंत करूं शकत नाहींत, आणि तेच जन्मजरा पावतात (२)

७२६ जे दुःख आणि दुःखाचा उगम जाणतात, आणि तें दुःख जेथें निःशेष निरोध पावतें तें स्थान व त्या दुःखनिरोधाप्रत जाणारा मार्ग जाणतात, (३)

७२७ ते चित्तविमुक्तीनें व प्रज्ञेनें मिळविलेल्या विमुक्तीनें संपन्न होत, ते (संसारदुःखाचा) अंत करण्यास समर्थ होत आणि ते जन्मजरा पावत नाहींत. (४)

दुसऱ्याही पर्यायानें सम्यक् द्वैतानुपश्यना असेल काय असें जर, भिक्षूंनो, तुम्हास कोणी विचारणारे भेटतील तर, अशी असेल, असें त्यास म्हणावें. ती कशी? जें काहीं दुःख उद्भवतें, तें सर्व उपाधींपासून, ही एक अनुपश्यना, आणि उपाधींचा वैराग्यानें अशेष

उपधीनं त्वेव असेसविरागनिरोधा नत्थि दुक्खस्स सम्भवो'ति अयं दुतियानुपस्सना। एवं सम्मा....पे०....अथापरं एतदवोच सत्था—

७२८ उपधीनिदाना पभवन्ति दुक्खा। ये केचि लोकस्मिं अनेकरूपा।
यो वे अविद्वा उपधिं करोति। पुनप्पुनं दुक्खमुपेति मन्दो।
तस्मा पजानं उपधिं न कयिरा। दुक्खस्स जातिप्पभवानुपस्सी ति५

सिया अञ्ञेन पि परियायेन सम्माद्वयतानुपस्सना'ति, इति चे भिक्खवे पुच्छितारो अस्सु, सिया'तिऽस्सु वचनीया। कथं च सिया। यं किंचि दुक्खं सम्भोति, सब्बं अविज्जापच्चया'ति अयं एकानुपस्सना अविज्जाय त्वेव असेसविरागनिरोधा नत्थि दुक्खस्स सम्भवो'ति अयं दुतियानुपस्सना। एवं सम्मा....पे०....अथापरं एतदवोच सत्था—

१ म०—उपधि.

निरोध केल्यानें दु:खाचा उद्भव होत नाहीं, ही दुसरी अनुपश्यना. भिक्षूंनो, याप्रमाणें द्वैताची....इत्यादि....तो सुगत शास्ता म्हणाला—

७२८. जीं कांहीं जगांत अनेक प्रकारचीं दुःखें आहेत, तीं सारीं उपाधींपासून होतात. जो अविद्वान् उपाधि जोडतो, तो मन्दबुद्धि पुनः पुन. दु:ख भोगतो. म्हणून दुःखाचें उत्पत्तिकारण पाहणाऱ्या जाणत्या मनुष्यानें उपाधि जोडूं नये. (५)

दुसऱ्याही पर्यायानें सम्यक्-द्वैतानुपश्यना असेल काय असें जर, भिक्षूंनो, तुम्हास विचारणारे भेटतील तर, अशी असेल, असें त्यांस म्हणावें. ती कशी? जें कांहीं दु:ख उद्भवतें, तें सर्व अविद्येपासून ही एक अनुपश्यना, आणि अविद्येचा वैराग्यानें अशेष निरोध केल्यानें दु:खाचा उद्भव होत नाहीं ही दुसरी अनुपश्यना. भिक्षूंनो, याप्रमाणें द्वैताची....इत्यादि ...तो सुगत शास्ता म्हणाला—

७२९ जातिमरणसंसारं ये वजन्ति पुनप्पुनं ।
इत्थभावञ्ञथाभावं अविज्जा येव सा गति ॥ ६ ॥

७३० अविज्जा ह्य महामोहो येनिदं संसितं चिरं ।
विज्जागता च ये सत्ता नागच्छन्ति पुनब्भवं ति ॥ ७ ॥

सिया अञ्ञेन पि पे० कथं च सिया । यं किञ्चि दुक्खं सम्भोति सब्बं सङ्खारपच्चया ति अयं एकानुपस्सना, सङ्खारानं त्वेव असेसविरागनिरोधा नत्थि दुक्खस्स सम्भवो ति अयं दुतियानुपस्सना । एवं सम्मा अथापरं एतदवोच सत्था—

७३१ यं किञ्चि दुक्खं सम्भोति सब्बं सङ्खारपच्चया । Plastic force
सङ्खारानं निरोधेन नत्थि दुक्खस्स सम्भवो ॥ ८ ॥

---

७२९ जन्ममरणमय संसारात जे पुनः पुनः पडतात, व मनुष्यत्व किंवा मनुष्येतरभाव पावतात, ते केवळ अविद्येमुळें ही गति भोगतात (६)

७३० अविद्या हा महामोह आहे, ज्याच्यामुळें माणूस चिरकाळ संसारात पडतो पण जे विद्यालाभी प्राणी आहेत, ते पुनर्जन्म पावत नाहींत (७)

दुसऱ्याही पर्यायानें इत्यादि ती कशी ? जें काहीं दुःख उद्भवतें तें सर्व संस्कारापासून, ही एक अनुपश्यना आणि संस्काराचा वैराग्यानें अशेष निरोध केल्यानें दुःखाचा उद्भव नाहीं, ही दुसरी अनुपश्यना भिक्षूंनो, याप्रमाणें द्वैताची इत्यादि तो सुगत शास्ता म्हणाला—

७३१ जें काहीं दुःख उद्भवतें, तें सर्व संस्कारापासून, संस्काराच्या निरोधानें दुःख उद्भवत नाहीं (८)

७३२ एत आदीनव ञत्वा दुक्ख सङ्खारपच्चया ।
सब्बसङ्खारसमथा सञ्ञाय उपरोधना ।
एव दुक्खक्खयो होति एत ञत्वा यथातथ ॥ ९ ॥

७३३ सम्मद्दसा वेदगुनो सम्मदञ्ञाय पण्डिता ।
अभिभुय्य मारसयोग नागच्छन्ति[1] पुनब्भव'ति ॥ १० ॥

सिया अञ्ञेन पि ... कथ च सिया ? य किञ्चि दुक्ख सम्भोति, सब्ब विञ्ञाणपच्चया ति-अयमेकानुपस्सना, विञ्ञाणस्स त्वेव असेस-विरागनिरोधा नत्थि दुक्खस्स सम्भवो'ति अय दुतियानुपस्सना । एव सम्मा ... अथापर एतदवोच सत्था—

७३४ य किञ्चि दुक्ख सम्भोति सब्ब विञ्ञाणपच्चया ।
विञ्ञाणस्स निरोधेन नत्थि दुक्खस्स सम्भवो ॥ ११ ॥

१ म०—न गच्छन्ति.

७३२. सस्कारापासून दु ख उद्भवतें, हा ( सस्कारातील ) दोप जाणून सर्व सस्कार नाहींसे करून व सञ्ञेचा निरोध करून, आणि याप्रमाणें दु खनाश होतो हें यथार्थतया जाणून, ( ९ )

७३३ सम्यग्दर्शी, वेदपारग, पण्डित सम्यक्-ज्ञानाच्या योगें मारबन्धन तोडून पुनर्जन्म पावत नाहींत. (१०)

दुसऱ्याही पर्यायानें ... इत्यादि ... ती कशी ? जें काहीं दु ख उद्भवतें, तें सर्व विज्ञानापासून, ही एक अनुपश्यना, आणि विज्ञानाचा वैराग्यानें अशेष निरोध केल्यानें दु खाचा उद्भव नाहीं, ही दुसरी अनुपश्यना. भिक्षूनो, याप्रमाणें ... इत्यादि ... तो सुगत शास्ता म्हणाला—

७३४. जें काहीं दु ख उद्भवतें तें सर्व विज्ञानापासून. विज्ञानाच्या निरोधानें दु ख उद्भवत नाहीं (११)

७३५ एत आदीनव ञत्वा दुक्ख विञ्ञाणपच्चया।
विञ्ञाणूपसमा भिक्खु निच्छातो परिनिब्बुतो ति ॥ १२ ॥

सिया अञ्ञेन पि कथ च सिया। य किञ्चि दुक्ख सम्भोति, सब्ब फस्सपच्चया ति अयमेकानुपस्सना, फस्सस्स त्वेव असेसविराग-निरोधा नत्थि दुक्खस्स सम्भवो ति अय दुतियानुपस्सना। एव सम्मा०
अथापर एतदवोच सत्था–

७३६ तेस फस्सपरेतान भवसोतानुसारिन।
कुम्मग्गपटिपन्नान आरा सयोजनक्खयो ॥ १३ ॥

७३७ ये च फस्स परिञ्ञाय अञ्ञाय उपसमे रता।
ते वे फस्साभिसमया निच्छाता परिनिब्बुता ति ॥ १४ ॥

---

७३५ विज्ञानापासून दु ख उद्भवतें, हा (विज्ञानातील) दोष जाणून विज्ञानाच्या उपशमानें वीततृष्ण भिक्षु परिनिर्वाण पावतो (१२)

दुसऱ्याही पर्यायानें इत्यादि ती कशी? जें काहीं दु ख उद्भवतें तें सर्व स्पर्शापासून, ही एक अनुपश्यना; आणि स्पर्शाचा वैराग्यानें अशेष निरोध केल्यानें दु खाचा उद्भव नाहीं, ही दुसरी अनुपश्यना भिक्षूनो, याप्रमाणें इत्यादि तो सुगत शास्ता म्हणाला—

७३६ जे ससारप्रवाहात वाहत जाणारे, कुमार्गानें चालणारे, स्पर्शपरायण असे प्राणी त्याजपासून सयोजनाचा क्षय फार दूर आहे (असें समजावें) (१३)

७३७. पण जे स्पर्श जाणून ज्ञानवान् होउन निर्वाणात रत होतात, ते वीततृष्ण स्पर्शाच्या निरोधानें परिनिर्वाण पावतात (१४)

सिया अञ्ञेन पि परियायेन सम्मा द्वयतानुपस्सना ति, इति चे भिक्खवे पुच्छितारो अस्सु, सिया ति'स्सु वचनीया। कथ च सिया। य किञ्चि दुक्ख सम्भोति सब्ब वेदनापच्चया ति अयमेकानुपस्सना, वेदनान त्वेव असेसविराग-निरोधा नत्थि दुक्खस्स सम्भवो ति अय दुतियानुपस्सना। एव सम्मा ... अथापर एतदवोच सत्था—

७३८ सुख वा यदि वा दुक्ख अदुक्खमसुख सह।
अज्झत्त च बहिद्धा च य किञ्चि अत्थि वेदित ॥ १५ ॥

७३९ एत दुक्ख ति ञत्वान मोसधम्म पलोकिन।
फुस्स फुस्स वय पस्स एव तत्थ विरज्जति।
वेदनान खया भिक्खु निच्छातो परिनिब्बुतो ति ॥ १६ ॥

सिया अञ्ञेन पि परियायेन ... कथ च सिया। य किञ्चि दुक्ख सम्भोति सब्ब तण्हापच्चया ति अयमेकानुपस्सना, तण्हाय त्वेव असेसविराग-

१ रो०—सद्दा

दुसऱ्याही पर्यायानें ... इत्यादि ... ती कशी? जें काहीं दु:ख उद्भवतें तें सर्व वेदनापासून, ही एक अनुपश्यना, आणि वेदनाचा वैराग्यानें अशेष निरोध केल्यानें दु:खाचा उद्भव नाहीं, ही दुसरी अनुपश्यना भिक्षूनो, याप्रमाणें ... इत्यादि ... तो सुगत शास्ता म्हणाला—

७३८ आध्यात्मिक किंवा बाह्य, सुख, दु:ख किंवा उपेक्षा यापैकीं कोणतीही वेदना, (१५)

७३९ ती नश्वर, लुप्त होणारी व दु:खद आहे व तिचा अनुभव मिळाल्यानंतर अखेर तिचा व्यय होतो असें जाणून भिक्षु तिच्या विषयीं विरक्त होतो, व वेदनाच्या क्षयानें निस्तृष्ण होऊन परिनिर्वाण पावतो (१६)

दुसऱ्याही पर्यायानें ... इत्यादि ... ती कशी? जें काहीं उद्भवतें तें सर्व तृष्णेपासून, ही एक अनुपश्यना, आणि तृष्णेचा

७४२ उपादानपच्चया भवो भूतो दुक्ख निगच्छति ।
जातस्स मरण होति एसो दुक्खस्स सम्भवो ॥ १९ ॥

७४३ तस्मा उपादानक्खया सम्मदञ्ञाय पण्डिता ।
जातिक्खय अभिञ्ञाय नागच्छन्ति पुनब्भव ति ॥ २० ॥

सिया अञ्ञेन पि परियायेन कथ च सिया । य किञ्चि दुक्ख सम्भोति सब्बं आरम्भपच्चया ति अय एकानुपस्सना, आरम्भान त्वेव असेसविरागनिरोधा नत्थि दुक्खस्स सम्भवो ति अयं दुतियानुपस्सना । एव सम्मा ... अथापर एतदवोच सत्था—

७४४ य किञ्चि दुक्ख सम्भोति सब्ब आरम्भपच्चया ।
आरम्भान निरोधेन नत्थि दुक्खस्स सम्भवो ॥ २१ ॥

---

७४२ उपादानापासून भव होतो, उत्पन्न झालेला प्राणी दु ख भोगतो आणि जन्मलेल्याला मरण येतें, हा दु खाचा उद्भव होय (१९)

७४३ म्हणून सम्यक्ज्ञानानें उपादानक्षय करून व जन्मक्षय जाणून, पंडित पुनर्जन्म पावत नाहींत (२०)

दुसऱ्याही पर्यायानें इत्यादि ती कशी ? जें काहीं दु ख उद्भवतें तें कर्मांच्या धडपडीपासून, ही एक अनुपश्यना, आणि कर्मांच्या धडपडीचा वैराग्यानें अशेष निरोध केल्यानें दु खाचा उद्भव नाहीं, ही दुसरी अनुपश्यना भिक्षूनो, याप्रमाणें इत्यादि तो सुगत शास्ता म्हणाला—

७४४ जें काहीं दु ख उद्भवतें, तें सर्व कर्मांच्या धडपडीपासून कर्मांच्या धडपडीच्या निरोधानें दु खाचा उद्भव होत नाहीं (२१)

७४५ एतं आदीनवं ञत्वा दुक्खं आरम्भपच्चया ।
सब्बारम्भं पटिनिस्सज्ज अनारम्भे विमुत्तिनो ॥ २२ ॥
७४६ उच्छिन्नभवतण्हस्स सन्तचित्तस्स भिक्खुनो ।
वितिण्णो जातिसंसारो नत्थि तस्स पुनब्भवो ति ॥ २३ ॥

सिया अञ्ञेन पि पे० कथं च सिया । यं किञ्चि दुक्खं सम्भोति, सब्बं आहारपच्चया ति अयं एकानुपस्सना, आहारानं त्वेव असेसविरागनिरोधा नत्थि दुक्खस्स सम्भवो ति अयं दुतियानुपस्सना । एवं सम्मा अथापरं एतदवोच सत्था—

७४७ यं किञ्चि दुक्खं सम्भोति सब्बं आहारपच्चया ।
आहारानं निरोधेन नत्थि दुक्खस्स सम्भवो ॥ २४ ॥

---

७४५ कर्मांच्या धडपडी पासून दुःख होतें, हा (कर्मांच्या धडपडींतील) दोष जाणून सर्व कर्मांची धडपड सोडून ज्या ठिकाणीं कर्मांची धडपड नाहीं अशा (निर्वाणात) मुक्ति पावणाऱ्या, (२२)

७४६ आणि भवतृष्णेचा उच्छेद करणाऱ्या शांतचित्त भिक्षूची जन्मपरंपरा मार्गे पडली, त्याला पुनर्जन्म राहिला नाहीं (२३)

दुसऱ्याही पर्यायानें इत्यादि ती कशी? जें काहीं दुःख उद्भवतें तें सर्व आहारापासून, ही एक अनुपश्यना, आणि आहाराचा वैराग्यानें अशेष निरोध केल्यानें दुःखाचा उद्भव नाहीं, ही दुसरी अनुपश्यना भिक्षूनो, याप्रमाणें इत्यादि तो सुगत शास्ता म्हणाला—

७४७ जें काहीं दुःख उद्भवतें, तें आहारापासून, आहाराच्या निरोधानें दुःखाचा उद्भव होत नाहीं (२४)

---

१ अन्न, स्पर्श, मन सचेतना व विज्ञान—असे चार प्रकारचे आहार निरनिराळ्या लोकांतील प्राण्यांकरिता सांगितले आहेत.

७४८ एत आदीनव ञत्वा दुक्ख आहारपच्चया ।
सब्बाहार परिञ्ञाय सब्बाहारमनिस्सितो ॥ २५ ॥

७४९ आरोग्य सम्मदञ्ञाय आसवान परिक्खया ।
सखाय सेवी धम्मट्ठो सख न उपेति वेदगू ति ॥ २६ ॥

सिया अञ्ञेन पि पे० कथ च सिया । य किञ्चि दुक्ख सम्भोति, सब्ब इञ्जितपच्चया ति अय एकानुपस्सना, इञ्जितान त्वेव असेसविरागनिरोधा नत्थि दुक्खस्स सम्भवो ति अय दुतियानुपस्सना । एव सम्मा अथापर एतदवोच सत्था—

७५० य किंचि दुक्ख सम्भोति सब्ब इञ्जितपच्चया ।
इञ्जितान निरोधेन नत्थि दुक्खस्स सम्भवो ॥ २७ ॥

---

७४८ आहारापासून दु ख होतें, हा ( आहारातील ) दोष जाणून, व सर्व आहार ओळखून, कोणत्याही आहारावर अवलबून न राहता, (२५)

७४९ सम्यक्प्रज्ञेनें आरोग्य पाहून आश्रवाचा नाश करून जो विचारपूर्वक आहाराचा उपयोग करतो, तो धर्मस्थित वेदपारग पुन नामाभिधान ( जन्म ) पावत नाहीं (२६)

दुसऱ्याही पर्यायानें इत्यादि ती कशी ? जें काहीं दु ख उद्भवतें तें सर्व प्रकपापासून, ही एक अनुपश्यना, आणि प्रकपाचा वैराग्यानें अशेष निरोध केल्यानें दु खाचा उद्भव नाहीं, ही दुसरा अनुपश्यना भिक्षूनो, याप्रमाणें इत्यादि तो सुगत शास्ता म्हणाला—

७५० जें काहीं दु ख उद्भवतें, तें सर्व प्रकपापासून, प्रकपाच्या निरोधानें दु खाचा उद्भव होत नाहीं (२७)

७५१ एतं आदीनवं ञत्वा दुक्खं इञ्जितपच्चया ।
तस्मा एजं वोस्सज्ज संखारे उपरुन्धिय ।
अनेजो अनुपादानो सतो भिक्खु परिब्बजे'ति ॥ २८ ॥

सिया अञ्ञेन पि...पे०....कथं च सिया। निस्सितस्स चलितं होति अयं एकानुपस्सना, अनिस्सितो न चलति अयं दुतियानुपस्सना । एवं सम्मा....अथापरं एतदवोच सत्था—

७५२ अनिस्सितो न चलति निस्सितो च उपादियं ।
इत्थभावञ्ञथाभावं संसारं नातिवत्तति ॥ २९ ॥

७५३ एतं आदीनवं ञत्वा निस्सयेसु महब्भयं ।
अनिस्सितो अनुपादानो सतो भिक्खु परिब्बजे'ति ॥ ३० ॥

सिया अञ्ञेन पि...पे०... कथं च सिया । रूपेहि भिक्खवे

---

७५१. प्रकंपांपासून दुःख होतें, हा (प्रकंपातील) दोष जाणून आणि म्हणून प्रकंप सोडून, व संस्कारांचा निरोध करून अप्रकम्प्य, अनुपादान व स्मृतिमान् होऊन भिक्षु म्हणून प्रव्रज्या घ्यावी. (२८)

दुसऱ्याही पर्यायानें......इत्यादि......ती कशी? आश्रित हा चलन पावतो, ही एक अनुपश्यना; आणि अनाश्रित हा चलन पावत नाहीं, ही दुसरी अनुपश्यना. भिक्षूंनो, याप्रमाणें.........इत्यादि.......तो सुगत शास्ता म्हणाला—

७५२. अनाश्रित चलन पावत नाहीं, पण जो आश्रित तो उपादानामुळें मनुष्यत्व व मनुष्येतरभाव यांनीं बनलेला संसार अतिक्रमू शकत नाहीं. (२९)

७५३. आश्रयामध्यें हा भयंकर दोष जाणून अनाश्रित, अनुपादान व स्मृतिमान् होऊन भिक्षु म्हणून प्रव्रज्या घ्यावी. (३०)

दुसऱ्याही पर्यायानें........इत्यादि ......ती कशी? भिक्षूंनो,

आरुप्पा. सन्ततरा'ति अयं एकानुपस्सना, आरुप्पेहि निरोधो सन्ततरो'ति अयं दुतियानुपस्सना । एवं सम्मा....अथापरं एतदवोच सत्था–

७५४ ये च रूपूपगा सत्ता ये च आरुप्पवासिनो[1] ।
निरोधं अप्पजानन्ता आगन्तारो पुनब्भवं ॥ ३१ ॥

७५५ ये च रूपे परिञ्ञाय अरूपेसु असण्ठिता ।
निरोधे ये विमुच्चन्ति ते जना मच्चुहायिनो'ति ॥ ३२ ॥

सिया अञ्ञेन पि....पे०....कथं च सिया । यं भिक्खवे सदेवकस्स लोकस्स समारकस्स सस्समणब्राह्मणिया पजाय सदेवमनुस्साय इदं सच्चं'ति उपनिज्झायितं, तदमरियानं एतं मुसा'ति सम्मप्पञ्ञाय सुदिट्ठं–अयं एकानुपस्सना; यं भिक्खवे सदेवकस्स....पे०. ..सदेवमनु·

१ म०—आरुप्पट्ठायिनो.

रूपावचर-देवलोकाहून अरूपावचर देवलोक शांततर आहे, ही एक अनुपश्यना; आणि अरूपावचर-देवलोकाहून निरोध ( निर्वाण ) शांततर, ही दुसरी अनुपश्यना. भिक्षूंनो, याप्रमाणें........इत्यादि.... ..., तो सुगत शास्ता म्हणाला—

७५४. जे रूपावचर-देव व अरूपावचर-देव आहेत, ते निरोध जाणत नाहींत म्हणून पुनर्जन्म पावतात. (३१)

७५५. पण जे रूपावचर-देवलोक जाणून व अरूपावचर-देवलोकाविषयीं अनासक्त होऊन निरोधात मुक्ति पावतात, ते जन मृत्यूला सोडून जातात (३२)

दुसऱ्याही पर्यायानें........इत्यादि. ......तो कसा ? भिक्षूंनो, सदेवक समारक लोकांत सश्रमण ब्राह्मणी आणि सदेवमनुष्य प्रजेत जें सत्य समजलें जातें तें खोटें आहे असें आर्य सम्यक्-प्रज्ञेनें यथार्थतया उत्तम रीतीनें पाहतात, ही एक अनुपश्यना; आणि भिक्षूंनो, सदेवक

म्माय इद मुसा ति उपनिज्झायित तदमरियान एत सच्च ति यथाभूत सम्मप्पञ्ञाय सुदिट्ठ—अय दुतियानुपस्सना। एव सम्मा पे०
अथापर एतदवोच सत्था—

७५, अनत्तनि अत्तमान पस्स लोक सदेवक।
निविट्ठ नामरूपस्मि इद सच्च ति मञ्ञति ॥ ३३ ॥

७५७ येन येन हि मञ्ञति ततो त होति अञ्ञथा।
त हि तस्स मुसा होति मोसधम्म हि इत्तर ॥ ३४ ॥

७५८ अमोसधम्म निब्बाण तदरिया सच्चतो विदू।
ते वे सच्चाभिसमया निच्छाता परिनिब्बुता ति ॥ ३५ ॥

सिया अञ्ञेन पि परियायेन सम्माद्वयतानुपस्सना ति इति चे

---

इ यादि   सदेवमनुष्य प्रजेत जें खोटें समजलें जातें तें खरें आहे असें आर्य सम्यक्-प्रज्ञेनें यथार्थतया उत्तम रीतीनें पाहतात, ही दुसरी अनुपश्यना भिक्षूनो याप्रमाणें   यानि   ता सुगत शास्ता म्हणाला—

७५६ अनात्म्यात आ मा आहे असें मानणाऱ्या व नामरूपात बद्ध झालेल्या सदेवक लोकाकडे पहा ते हेंच स य आहे असें समजतात (३३)

७५७ ज्या ज्या रीतीनें ते कल्पना करतात, याहून ती वस्तु निराळीच असते आणि यांची कल्पना खोटी ठरते कारण जें क्षणभंगुर तें नश्वर असतें (३४)

७५८ पण निर्वाण अनश्वर आहे आणि आर्य ' तें स य आहे ' असें जाणतात आणि त्या स याच्या ज्ञानानें निस्तृष्ण होऊन ते निर्वाण पावतात (३५)

दुसऱ्याही प्रकारानें सम्यक्-द्वैतानुपश्यना असेल काय असें जर, भिक्षूनो, तुम्हास कोणी विचारणारे भेटतील तर अशी असेल असें

भिक्खवे पुच्छितारो अस्सु, सिया'ति ऽस्सु वचनीया। कथं च सिया। य भिक्खवे सदेवकस्स पे० सदेवमनुस्साय इदं सुखं ति उपनिज्झायितं, तदमरियानं एतं दुक्खं ति यथाभूतं सम्मप्पञ्ञाय सुदिट्ठं—अयं एकानुपस्सना, यं भिक्खवे सदेवकस्स पे० सदेवमनुस्साय इदं दुक्खं ति उपनिज्झायितं, तदमरियानं एतं सुखं ति यथाभूतं सम्मप्पञ्ञाय सुदिट्ठं—अयं दुतियानुपस्सना। एवं सम्माद्वयतानुपस्सिनो खो भिक्खवे भिक्खुनो अप्पमत्तस्स आतापिनो पहितत्तस्स विहरतो द्विन्नं फलानं अञ्ञतरं फलं पाटिकङ्खं दिट्ठे व धम्मे अञ्ञा, सति वा उपादिसेसे अनागामिता ति। इदमवोच भगवा, इदं वत्वा सुगतो अथापरं एतदवोच सत्था—

७५९ रूपा सद्दा रसा गन्धा फस्सा धम्मा च केवला।
इट्ठा कन्ता मनापा च यावत'त्थीति वुच्चति ॥ ३६ ॥

त्यास म्हणावें ती कशी ? भिक्षूनो, सदेवक इत्यादि सदेवमनुष्य प्रजेत जें सुख समजलें जातें तें दुःख आहे, असें आर्य सम्यक्-प्रज्ञेनें यथार्थतया उत्तम रीतीनें पाहतात, ही एक अनुपश्यना, आणि भिक्षूनो, सदेवक...इत्यादि सदेवमनुष्य प्रजेत जें दुःख समजलें जातें तें सुख आहे, असें आर्य सम्यक्-प्रज्ञेनें यथार्थतया पाहतात, ही दुसरी अनुपश्यना भिक्षूनो, याप्रमाणें द्वैताची सम्यक्-अनुपश्यना करणाऱ्या, अप्रमत्त, उत्साही व दृढचित्त होऊन वागणाऱ्या भिक्षूला याच जन्मीं अर्हत्त्व किंवा, उपादानशेष राहिल्यास, अनागामिता—या दोहोंपैकीं एक फळ मिळण्याची अपेक्षा करता येईल" असें भगवान् म्हणाला असें म्हणून तदनंतर तो सुगत शास्ता म्हणाला—

७५९ रूप, शब्द, रस, गन्ध, स्पर्श आणि धर्म म्हणून जे सगळे आहेत त्यांना इष्ट, कांत आणि मनोहर समजतात ( ३६ )

१ टीकाकार इथा शब्दासह सहा आलम्बनांचा निर्देश करतो

७६० सदेवकस्स लोकस्स एते वो सुखसम्मता।
यत्थ चेते निरुज्झन्ति तं नेसं दुक्खसम्मतं ॥ ३७ ॥
७६१ सुखं'ति दिट्ठमरियेहि सक्कायस्सुपरोधनं।
पच्चनीकं इदं होति सब्बलोकेन पस्सतं ॥ ३८ ॥
७६२ यं परे सुखतो आहु तदरिया आहु दुक्खतो।
यं परे दुक्खतो आहु तदरिया सुखतो विदू।
पस्स धम्मं दुराजानं सम्पमूळ्हेत्थ अविद्दसू । ३९ ॥
७६३ निवुतानं तमो होति अन्धकारो अपस्सतं।
सतं च विवटं होति आलोको पस्सतं इव।
सन्तिके न विजानन्ति मगा धम्मस्सऽकोविदा ॥ ४० ॥

---

७६०. सदेवक लोकाना हे सुखकारक वाटतात, आणि ते जेथ निरोध पावतात तें (स्थान) त्याना दुःखकारक वाटतें. (३७)

७६१. सत्कायबुद्धीचा निरोध सुखकारक आहे असें आर्य जाणतात; पण त्या ज्ञाच्या उलट लोकाची समजूत असते. (३८)

७६२. इतर ज्याला सुख समजतात तें दुःख आहे असें आर्य जाणतात; व जें इतरांना दुःख वाटतें तें सुख आहे असें आर्य जाणतात. ज्यांत मूर्ख लोक मोहित होतात, तो हा दुर्ज्ञेय लोक-स्वभाव पहा! (३९)

७६३. (अविद्येनें) आच्छादिलेल्याना तम व अज्ञानाना हा अन्धकार वाटतो. पण डोळसांना जसा प्रकाश तसा हा प्रकार सन्ताना स्पष्ट दिसतो. धर्मज्ञानविहीन मूढ आपणापाशीच असलेला (अमूल्य ठेवाही) जाणत नाहींत. (४०)

---

१ 'पंचस्कन्धाचा' असा अर्थ टीकाकार घेतो. पण गाथा २३१ मध्यें हा 'सक्काय' शब्द आलेला आहे, तेथें ह्या शब्दाचा अर्थ 'देहांत आत्मा आहे अशी समज'–असा आहे.

७६४ भवरागपरेतेहि भवसोतानुसारिहि।
मारधेय्यानुपन्नेहि[1] नाय धम्मो सुसम्बुधो[2]॥ ४१॥

७६५ को नु अञ्ञत्रमरियेहि पदं सम्बुद्धुमरहति।
यं पदं सम्मदञ्ञाय परिनिब्बन्ति अनासवा ति॥ ४२॥

इदमवोच भगवा। अत्तमना ते भिक्खू भगवतो भासितं अभिनन्दुं। इमस्मिं खो पन वेय्याकरणस्मिं भञ्ञमाने सट्ठिमत्तानं भिक्खून अनुपादाय आसवेहि चित्तानि विमुच्चिंसू ति।

द्वयतानुपस्सनासुत्तं निट्ठितं।

---

१ म०–मारधेय्यानुपन्नेभि २ म०–सुसम्बुद्धो

---

७६४ भवासक्तिपरायण, भवनदींत वाहणारे, व माराच्या तडाख्यात सापडलेले जे, त्यांना या धर्मांचा बोध होणें सोपें नाहीं (४१)

७६५ थोर सम्यक्-ज्ञानानें जें पद जाणून अनाश्रव होऊन परिनिर्वाण पावतात, त्या पदाचा आर्यांवाचुन दुसऱ्या कोणास बोध होणें शक्य आहे? (४२)

असें भगवान् म्हणाला मुदित मनानें त्या भिक्षूंनी भगवन्ताच्या भाषणाचें अभिनन्दन केलें हें व्याख्यान चालू असतां साठ भिक्षूंचीं अन्तःकरणें उपादानरहित होऊन आश्रवापासून मुक्त झालीं

द्वयतानुपस्सनासुत्त समाप्त

---

तस्सुद्दान—
सच्च उपधि अविज्ज च सङ्खारो[1] विञ्ञाणपञ्चम।
फस्सवेदनिया तण्हा उपादानारम्भा[2] आहारा।
इञ्जिते[3] फन्दित रूप सच्चदुक्खेन सोळसा ति॥

## महावग्गो ततियो।

तस्सुद्दान—
पब्बज्जा[4] च पधान[5] च सुभ[6]. . सुन्दरी (तथा)।
माघसुत्त सभियो च सेलो सल्ल पवुच्चति[7]।
वासेट्ठो चापि कोकालि नालको[8] द्वयतानुपस्सना।
द्वादसेतानि[9] सुत्तानि महावग्गो ति वुच्चती ति।

---

१ म०—सङ्खारे विञ्ञाण पञ्चम. २ म०—'रम्भ. ३ म०—इञ्जित. ४ म०—प॰ब्बज्जा. ५ म०—पधाना ६ सी०—सुभासित च सुन्दरि, म०—सुभा सुन्दरिका तथा ७ म०—च वुच्चति. ८ सी०—नाल ९ म०—द्वादस तानि

---

द्वयतानुपस्सनासुत्ताची अनुक्रमणिका—सत्य, उपाधि, अविद्या, संस्कार, पाचवें विज्ञान, स्पर्श, वेदना, तृष्णा, उपादान, कर्मांची धडपड, आहार, प्रकंप, चलित, रूपासक्त, सत्य आणि दुःख, मिळून सोळा

### महावग्ग तिसरा समाप्त

---

महावग्गाची अनुक्रमणिका—
पब्बज्जा, पधान, सुभासित, सुन्दरिक, माघ, सभिय, सेल, सल्ल वासेट्ट, कोकालिक, नालक व द्वयतानुपस्सना—या बारा सुत्तांचा महावग्ग म्हटला जातो

# [ ४. अट्ठकवग्गो ]

## ३९

### [ १. कामसुत्तं ]

७६६ कामं कामयमानस्स तस्स चे तं समिज्झति ।
अद्धा पीतिमनो होति लद्धा मच्चो यदिच्छति ॥ १ ॥
७६७ तस्स चे कामयमानस्स छन्दजातस्स जन्तुनो ।
ते कामा परिहायन्ति सल्लविद्धो'व रुप्पति ॥ २ ॥
७६८ यो कामे परिवज्जेति सप्पस्सेव पदा सिरो ।
सो इमं विसत्तिकं लोके सतो समतिवत्तति ॥ ३ ॥

---

१ रो०, नि०–कामयानस्स. २ म०, नि०–सो'मं.

---

# [ अट्ठकवग्ग, चौथा ]

## ३९

### [ १. कामसुत्त ]

७६६. कामोपभोगाची इच्छा करणाऱ्याचे बेत तडीस गेले, तर जें इच्छितो तें मिळाल्यामुळें तो मर्त्य खात्रीनें आनंदित होतो. ( १ )

७६७. पण इच्छा करणाऱ्या व आसक्त झालेल्या त्या प्राण्याचे जर ते कामोपभोग नष्ट झाले, तर तो बाणानें विद्ध झाल्याप्रमाणें दु:ख पावतो. ( २ )

७६८. सर्पाच्या डोक्यापासून आपलें पाऊल दूर ठेवावें, तद्वत् जो कामोपभोगापासून दूर राहतो, तो स्मृतिमान् या विषक्तिकेला ( तृष्णेला ) मागें टाकून जातो. ( ३ )

७६९ खेत्तं वत्थुं हिरञ्ञं वा गवास्सं दासपोरिसं ।
थियो बन्धू पुथू कामे यो नरो अनुगिज्झति ॥ ४ ॥

७७० अबला नं बलीयन्ति मद्दन्ते नं परिस्सया ।
ततो नं दुक्खमन्वेति नावं भिन्नमिवोदकं ॥ ५ ॥

७७१ तस्मा जन्तु सदा सतो कामानि परिवज्जये ।
ते पहाय तरे ओघं नावं सिञ्चित्व पारगू ति ॥ ६ ॥

कामसुत्तं निट्ठितं ।

---

१ म०–गवस्सं. २ म०–दासपोरिसं ३ म०–थिया. ४ रो०–अबलाऽयं. ५ म०–सिञ्चित्वा, म०, नि०–सित्वाऽव

---

७६९ शेती, घरदार, धन, गाडी-घोडे[1] किंवा दास आणि नोकर, स्त्री आणि बान्धव अशा भिन्न भिन्न कामोपभोगांचा जो मनुष्य अत्यन्त लोभ धरतो, (४)

७७०. त्याला त्याहून जे अबल असतील ते दाबून टाकतात, व विघ्नें त्याला तुडवितात, आणि त्यामुळें फुटक्या होडींत पाणी जसें यावें तसें दुःख त्याच्या मागोमाग येतें. (५)

७७१. म्हणून प्राण्यानें सदोदित स्मृतिमान् राहून कामोपभोगांचा त्याग करावा, व होडींत आलेलें पाणी काढून टाकून पार जावें त्याप्रमाणें ते (कामोपभोग) टाकून ओघ तरून जावें (६)

कामसुत्त समाप्त

---

१ मूळ अर्थ—बैल घोडे.

४०

## [२. गुहट्ठकसुत्तं]

७७२ सत्तो गुहाय बहुनाभिछन्नो । तिट्ठं नरो मोहनस्मिं पगाळ्हो ।
दूरे विवेका हि तथाविधो सो । कामा हि लोके न हि सुप्पहाया १

७७३ इच्छानिदाना भवसातबद्धा । ते दुप्पमुञ्चा न हि अञ्ञमोक्खा ।
पच्छा पुरे वाऽपि अपेक्खमाना । इमे'व कामे पुरिमे'व जप्पं २

७७४ कामेसु गिद्धा पसुता पमूळ्हा । अवदानिया ते विसमे निविट्ठा ।
दुक्खूपनीता परिदेवयन्ति । किं सु भविस्साम इतो चुतासे ३

१ म०-°छन्नो. २ सी०-अपेक्ख° ३-३ म०-पुरिमे पजप्प, ४ म०-अप°. ५ म०-°दत्था, °दिया

४०

## [२. गुहट्ठकसुत्त]

७७२. देहात बद्ध झालेला, पुष्कळ (विकारांनी) आच्छादिलेला व मोहांत रुतून गेलेला असा माणूस एकान्तापासून दूर राहतो, कारण कामोपभोगाचा त्याग करणें सोपें नाहीं. ( १ )

७७३ इच्छेनें प्रेरित व जे संसारसुखांत बद्ध, त्यांना संसारपाशांतून सोडविता येणें कठिण; कारण जे पुढची किंवा मागची आशा धरतात, आणि अतीतकालीन किंवा वर्तमानकालीन कामोपभोगांत लुब्ध होतात, त्यांची मोकळीक दुसऱ्याच्या हातून होणें शक्य नाहीं (२)

७७४. कामोपभोगांत लुब्ध, आसक्त आणि मोहित झालेले व विषम मार्गाला लागलेले ते उपदेशाला योग्य नव्हत. ते ( अन्न-कार्शी ) मेल्यावर आमचें पुढें काय होईल असा विचारानें दुःख भोगतात आणि शोक करितात. ( ३ )

१. अनवदानिया ( अ-वदान्य ). टीकाकार वर मागितल्याप्रमाणें अर्थ करतो. ७८९ गाथेवरील टीप पहा.

७७५ तस्मा हि सिक्खेथ इधेव जन्तु। यं किञ्चि जञ्ञा विसमं ति लोके।
न तस्स हेतु विसमं चरेय्य। अप्पं हि दं[1] जीवितमाहु धीरा ॥४
७७६ पस्सामि लोके परिफन्दमानं। पजं इमं तण्हागतं[2] भवेसु।
हीना नरा मच्चुमुखे लपन्ति। अवीततण्हासे[3] भवाभवेसु ॥५॥
७७७ ममायिते पस्सथ फन्दमाने। मच्छे व अप्पोदके खीणसोते।
एतऽपि दिस्वा[4] अममो चरेय्य। भवेसु आसत्तिमकुब्बमानो॥६
७७८ उभोसु अन्तेसु विनेय्य छन्दं। फस्सं परिञ्ञाय[5] अनानुगिद्धो।
यदत्तगरहा तदकुब्बमानो। न लिप्पती[6] दिट्ठसुतेसु धीरो ॥ ७

१ सी०–हि त, म०–हेत २ सी०–तण्हगत ३ सी०, म०–°सा
४ म०–दिस्वान ५ म०–परिञ्ञा ६ सा०–लिम्पति

७७५ म्हणून ह्या लोकीं जें कांहीं विषम आहे असें प्राणी जाणतो त्यासाठीं विषम वर्तन करतां कामा नये, असें त्यानें इहलोकींच शिकावें कारण, हें जीवित अल्प आहे असें सुज्ञ सांगतात (४)

७७६ या जगात भवासक्त होऊन तडफड करणाऱ्या या प्रजेला मी पाहत आहे भवाभवाच्या तृष्णेंतून मुक्त न झालेली हीन माणसें मरणकाळीं शोक करतात (५)

७७७ पाण्याचा प्रवाह आटलेल्या डबक्यात मासे जसे तडफडतात, तद्वत् ममत्वात तडफडणाऱ्यांकडे पहा! आणि हें पाहून भवात आसक्ति न करतां निर्मम होऊन रहावें (६)

७७८ (उच्छेद आणि शाश्वत या) दोन अन्तांचा छंद सोडून, स्पर्श जाणून त्यांत आसक्त न होता व ज्याच्यामुळें आपल्याला दोष देण्याची पाळी येते, तें कांहीं न करतां सुज्ञ पाहिलेल्या आणि ऐकिलेल्या गोष्टींत लिप्त होत नाहीं (७)

७७९ सञ्ञ परिञ्ञा वितरेय्य ओघं । परिग्गहेसु मुनि नोपलित्तो ।
अब्बूळ्हसल्लो चरमप्पमत्तो । नासिंसती लोकमिमं परं चा ति ८

गुहट्ठकसुत्तं निट्ठितं ।

---

४१

[ ३. दुट्ठट्ठकसुत्तं ]

७८० वदन्ति वे[1] दुट्ठमनाऽपि एके[2] । अथोऽपि[3] वे[4] सच्चमना वदन्ति ।
वादं च जातं मुनि नो उपेति । तस्मा मुनि नत्थि खिलो कुहिञ्चि १

---

१ सी०, म०–°ति. २ म०–चे. ३ सी०–एते. ४ नि०–अञ्ञेऽपि. ५ सी०–चे.

---

७७९. परिग्रहामध्यें उपलिप्त न होणाऱ्या मुनीनें (कामादि)-संज्ञा जाणून ओघ तरून जावा. तो आपल्या हृदयांतील शल्य काढणारा व सावधपणें वागणारा इह किंवा पर लोकाची इच्छा धरीत नाहीं. (८)

गुहट्ठकसुत्त समाप्त

---

४१

[ ३. दुट्ठट्ठकसुत्त ]

७८० कित्येक द्वेष-पूरित मनानें बोलतात, तर कित्येक सत्य-मनानें बोलतात पण अशा रीतीनें उत्पन्न झालेल्या वादांत मुनि शिरत नाहीं. म्हणून मुनीच्या ठिकाणीं कोणत्याही कारणानें काठिन्य उत्पन्न होऊं शकत नाहीं (१.)

---

१ काम, भव, (मिथ्या-) दृष्टि आणि अविद्या असे चार ओघ सांगितले आहेत. २. १९ व्या गाथेंतील टीप पहा.

७८१ सक हि दिट्ठिं कथमच्चयेय्य । छन्दानुनीतो रुचिया निविट्ठो ।
*सयं समत्तानि पकुब्बमानो । यथा हि जानेय्य तथा वदेय्य ॥२*

७८२ यो अत्तनो सीलवतानि जन्तु । अनानुपुट्ठो च परेसं पावा ।
अनरियधम्मं कुसला तमाहु । यो आतुमानं सयमेव पावा ॥३॥

७८३ सन्तो च भिक्खु अभिनिब्बुतत्तो । इतिऽहं ति सीलेसु अकत्थमानो ।
तमरियधम्मं कुसला वदन्ति । यस्सुस्सदा नत्थि कुहिंचि लोके ४

१ म०—छन्दानसीतो २ म०—°कुब्बो ३ म०—परस्स ४ म०—पाव.

७८१ कारण आपल्या पथाच्या ज्याला छंद लागला, आवडीनें जो त्यात बद्ध झाला व आपण स्वीकारलेल्या पथाप्रमाणें वागू लागला, तो त्या पथापलीकडे कसा जाईल? कारण तो जसें जाणेल तसेंच बोलेल (२)

७८२ विचारल्याविना जो प्राणी इतरांना आपल्या संप्रदायाचीं शीलव्रतें सांगतो, व आपल्या संबंधीं गोष्टी बोलतो, त्याला सुज्ञ अनार्यधर्मी म्हणतात (३)

७८३ पण जो शांत आणि अभिनिर्वृत भिक्षु 'माझे हे हे नियम आहेत' अशी बडबड करीत नाहीं व ज्याला या जगांत कोणचेही उत्सद नाहींत, त्याला सुज्ञ आर्यधर्मी म्हणतात (४)

१ ५१ • आा पा स्वर्गेर गीप पहा

७८७ उपयो हि धम्मेसु उपेति वादं । अनूपयं केन कथं वदेय्य ।
अत्तं निरत्तं न हि तस्स अत्थि । अधोसि सो दिट्ठिमिधेव
सब्बा'ति ॥८॥

दुट्ठट्ठकसुत्तं निट्ठितं ।

४२

( ४. सुद्धट्ठकसुत्तं )

७८८ पस्सामि सुद्धं परमं अरोगं । दिट्ठेन[1] संसुद्धि नरस्स होति ।
एताभिजानं परमं ति ञत्वा । सुद्धानुपस्सी ति पच्चेति ञाणं ॥१॥

१ म० अनुपयं. २ म०, Pb-सः . ३ सी०- दिट्ठिन. ४ म०, नि०-पच्चाभि°.

७८७. कारण चंचळ माणूस पदार्थांच्या वादात पडतो; पण निश्चळ माणसाला कोण कशामुळें व कां वादात गुंतवील ? का कीं, त्यानें स्वीकारलेलें किंवा धिक्कारलेलें असें काहीं नाहीं[1]. त्यानें सर्व सांप्रदायिकता धुवून टाकली आहे.

दुट्ठट्ठकसुत्त समाप्त

४२

[ ४. सुद्धट्ठकसुत्त ]

७८८. 'मी अरोग आणि शुद्ध असें परम पाहतों; सांप्रदायिक दृष्टींमुळें मनुष्याची शुद्धि होते '—याप्रमाणें जाणणारा परम काय आहे तें जाणून शुद्धिही जाणतो अशी बुद्धि होते. ( १ )

१ 'त्याला आत्मबुद्धि किंवा अनात्मबुद्धि नाहीं, ' असाही एक अर्थ टीकाकारानें दिला आहे.

७८९ दिट्ठेन चे सुद्धि नरस्स होति । ञाणेन वा सो पजहाति दुक्खं ।
अञ्ञेन सो सुज्झति सोपधीको । दिट्ठी[1] हि नं पाव तथा वदानं ॥२

७९० न ब्राह्मणो अञ्ञतो सुद्धिमाह । दिट्ठे सुते सीलवते[2] मुते वा ।
पुञ्ञे च पापे च अनूपलित्तो[3] । अत्तञ्जहो[4] न यिध पकुब्बमानो ॥३

७९१ पुरिमं पहाय अपरं सितासे । एजानुगा ते[7] न[7] तरन्ति सङ्गं ।
ते उग्गहायन्ति निरस्सजन्ति[8] । कपीव साखं पमुखं[9] गहाय[10] ॥४॥

१ म०–दिट्ठि २ सी०–सीलब्बते ३ सी०, म०–अनु॰. ४ सी०–अत्तञ्जहो. ५ म०, Psb–इध. ६ म०. सिनाय. ७–७ म०–न ते. ८ म०–निस्सजन्ति, निरस्सजन्ति. ९ सी०–पमुखं, म०–पमुखं १० सी०–गहाय

७८९ अशा साम्प्रदायिक दृष्टीनें जर माणसाची शुद्धि होऊं लागली, अथवा केवळ ज्ञानानें जर तो दुःखाचा त्याग करूं लागला, तर मग तो सोपाधिक माणूस भलत्याच उपायानें शुद्ध होतो असें म्हटलें पाहिजे. आणि हें तसें बोलणाऱ्याची ती दृष्टीच ( तो मिथ्यादृष्टि आहे असें ) दाखवून देते. ( २ )

७९०. पण दृष्ट, श्रुत, शीलव्रत, अनुमित, पुण्य अथवा पाप, यात उपलिप्त न होणारा, कोणत्याही साम्प्रदायिक दृष्टीचा स्वीकार न करणारा, व जगात ( आसक्तिमय ) कर्में न करणारा ब्राह्मण अशा भलत्याच उपायानें शुद्धि होते असें म्हणत नाहीं ( ३ )

७९१. ( भलत्या उपायानें शुद्धि मानणारे ), तृष्णेच्या मागें लागलेले, ते जुनी दृष्टि सोडून नवी पकडतात, व सग तरून जात नाहींत वानर जसा समोरची फांदी पकडण्यासाठीं हातची सोडतो, त्याप्रमाणें ते ( नवी दृष्टि ) पकडतात व ( जुनी ) सोडतात. ( ४ )

१ टीकाकार येथें ' आत्मदृष्टी'चा ही उल्लेख करतो.

७९२ सय समादाय वतानि जन्तु। उच्चावच गच्छति सञ्ञसत्तो।
विद्वा च वेदेहि समेच्च धम्मं। न उच्चावच गच्छति भूरिपञ्ञो॥५॥
७९३ स सब्बधम्मेसु विसेनिभूतो। य किञ्चि दिट्ठं व सुतं मुतं वा।
तमेवदस्सिं विवटं चरन्तं। केनीध लोकस्मिं विकप्पयेय्य॥६॥
७९४ न कप्पयन्ति न पुरेक्खरोन्ति। अच्चन्तसुद्धी ति न ते वदन्ति।
आदानगन्थं गथितं विसज्ज। आसं न कुब्बन्ति कुहिंचि लोके॥७॥

१ सी०—पञ्ञ° म०—सञ्ञसत्तो, जन्तसत्तो २-२ सी०—सब्बेसु धम्मेसु ३ म०—वा ४ म०, Fsb—स्मि म०—पुरक्ख ९ म०—°सुद्धिं

७९२ प्राणी स्वतःच व्रतें आचरून संज्ञे (कल्पने) मध्यें आसक्त होतो व उच्चनीच भवाला जातो पण विपुलप्रज्ञ विद्वान् वेदांनी (प्रज्ञेनें) धर्म जाणून उच्चनीच भवाला जात नाहीं (५)

७९३ जें काहीं दृष्ट, श्रुत आणि अनुमित असेल (या सर्वांवर विजय मिळविल्यामुळें) यांपैकी कशाशींही विरोधभाव न बाळगणारा, व अशानेंच शुद्धि होते असें पाहणारा, सर्व गोष्टी उघड उघड करणारा, अशा त्याला या जगीं कोणता आणि कसला विकल्प असणें शक्य आहे? (६)

७९४ ते विकल्पात पडत नाहींत, एखाद्या गोष्टीचा पुरस्कार करीत नाहींत, व हीच अत्यंत शुद्धि आहे असें म्हणत नाहींत आणि ते उपादानांनीं बांधलेली गाठ (ग्रंथि) सोडून या जगात कशाचीही आशा धरीत नाहींत (७)

१ विरोधीभाव न बाळगणारा याबद्दल मूळ शब्द 'विसेनिभूत' असा आहे, व त्याचा 'सम्मेन विनासे वा पतिभावेन विसेनिभूतो' असा अट्ठकथाकारानें अर्थ केला आहे

७९५ सीमातिगो ब्राह्मणो तस्स नत्थि । ञत्वा वे दिस्वा वे समुग्गहीतं ।
न रागरागी न विरागरत्तो । तस्सीध नत्थि परमुग्गहीतं ति ॥८॥

सुद्धट्ठकसुत्तं निट्ठितं ।

४२

[ ५. परमट्ठकसुत्तं ]

७९६ परमं ति दिट्ठीसु परिब्बसानो । यदुत्तरिं कुरुते जन्तु लोके ।
हीना ति अञ्ञे ततो सब्बमाह । तस्मा विवादानि अवीतिवत्तो ॥ १

१ सी०, म०–च २ सी०, म०–वि रागरत्तो ३ म०–राग्ग विच ४ रो०–नत्थी ५ सी०, म०–दिट्ठिसु ६ म०–उत्तरिं

७९५ ज्या ब्राह्मणाने आसक्तिरूपणाऱ्या सीमा उल्लंघिल्या, तो कोणतीही वस्तु जाणून किंवा पाहून मिथ्या पकडून बसत नाही. तो रागरागी ( कामासक्त ) नव्हे व विरागरागीही नव्हे, या जगात अमुक एक दृष्टि परमश्रेष्ठ आहे असें तो समजत नाही ( ८ )

सुद्धट्ठकसुत्त समाप्त

४२

[ ५. परमट्ठकसुत्त ]

७९६ मनुष्य दृष्टीत ( मतात ) आपली दृष्टि उत्तम असें मानून चालणारा प्राणी या जगांत आपल्या मताला महत्त्व देतो, व त्याहून इतर मत हीन आहेत असें म्हणतो, व यामुळें तो विवादाच्या पलीकडे जात नाही ( १ )

७९७ यदत्तनी पस्सति आनिसंसं। दिट्ठे सुते सीलवते मुते वा,
तदेव सो तत्थ समुग्गहाय। निहीनतो पस्सति सब्बमञ्ञं॥२॥
७९८ तं वापि गन्थं कुसला वदन्ति। यं निस्सितो पस्सति हीनमञ्ञं।
तस्मा हि दिट्ठं व सुतं मुतं वा। सीलब्बतं भिक्खु न निस्सयेय्य॥३॥
७९९ दिट्ठिऽपि लोकस्मिं न कप्पयेय्य। ञाणेन वा सीलवतेन वाऽपि।
समो'ति अत्तानमनूपनेय्य। हीनो न मञ्ञेथ विसेसि वाऽपि॥४॥
८०० अत्तं पहाय अनुपादियानो। ञाणेऽपि सो निस्सयं नो करोति।
स वे वियत्तेसु न वग्गसारी। दिट्ठिऽपि सो न पच्चेति किञ्चि॥५॥

१ मा०, म०–नि. २ सी०–सब्बमञ्ञे ३–३ सी०–वा निस्सितो.
४ म०–लोकस्मि ५–५ सी०, प०–विसेसिनवाऽपि, म०–विसेसि चाऽपि.
६ म०–वियुत्तेसु, म०–वियत्तसु॰ वियत्तेन वियत्तेसु ७ अ०–कंचि.

७९७. तो आपल्या पंथातील दृष्ट, श्रुत शीलव्रत अथवा अनुमित यातच फायदा पाहतो, आणि त्यालाच चिकटून राहून इतर सर्व पंथांना हीन समजतो (२)

७९८ ज्या दृष्टीच्या आश्रयाने तो इतरांना हीन समजतो ती एक ग्रन्थि आहे असें कुशल म्हणतात. म्हणून भिक्षूनें दृष्ट, श्रुत, अनुमित किंवा शीलव्रत यांत आसक्त होऊ नये. (३)

७९९. या जगात त्यानें ज्ञानानें किंवा शीलव्रतानें कसलीही (सांप्रदायिक) दृष्टि प्राप्त होते अशी कल्पना करू नये. मी इतरांच्या समान आहें, इतरांहून हीन आहें किंवा श्रेष्ठ आहें, अशीही तुलना करूं नये. (४)

८००. तो स्वीकृत सोडून व उपादानविरहित होऊन ज्ञानामध्ये देखील आसक्त होत नाही; तो संप्रदायिक लोकांत गढूनही जात नाही, व तो कोणतीही दृष्टि पकडून बसत नाही (५)

१ आ महर्षि अथवा अर्थ घेता येईल.

८०१ यस्सूभयन्ते पणिधीध नत्थि। भवाभवाय इध वा हुरं वा।
निवेसना तस्स न सन्ति केचि। धम्मेसु निच्छेय्य समुग्गहीता॥६॥
८०२ तस्सीध दिट्ठे व सुते मुते वा। पकप्पिता नत्थि अणू ऽपि सञ्ञा।
तं ब्राह्मणं दिट्ठिमनादियानं। केनीध लोकस्मिं विकप्पयेय्य॥७॥
८०३ न कप्पयन्ति न पुरेक्खरोन्ति। धम्मा ऽपि तेसं न पटिच्छितासे।
न ब्राह्मणो सीलवतेन नेय्यो। पारं गतो न पच्चेति तादी ति॥८॥

परमट्ठकसुत्तं निट्ठितं। ८

---

१ सी०—यस्सुभन्ते २ म०—यम्म ३ म०—°हीत ४ म०—तस्स यिध ५ म०—वा ६ म०—अणु ७—७ मा०—ब्राह्मणा दिट्ठिमनादियाना ८ सी०—केनीध ९ म०, Fsb,—°स्मि १० म०—पुरक्ख° ११ मा०, Fsb — पनिच्छितासे

---

८०१. इहलोकीं किंवा परलोकीं भव आणि अभव या दोनही टोकांविषयीं ज्याला उत्कंठा नाहीं, त्याला सर्व गोष्टींचा विचार करून दृढपणें स्वीकारलेले कोणतेही संप्रदाय नाहींत (६)

८०२ दृष्ट, श्रुत, आणि अनुमित यांविषयीं विकल्पिलेली अशी कोणतीही अणुमात्र संज्ञा त्याला नाहीं कोणतीहि दृष्टि पकडून न ठेवणाऱ्या त्या ब्राह्मणाविषयीं या जगांत कोणचा व कसला विकल्प असू शकेल ? (७)

८०३ ते विकल्पांत पडत नाहींत, एखाद्या गोष्टीचा पुरस्कार करीत नाहींत आणि कोणतीही सांप्रदायिकता स्वीकारीत नाहींत. शीलव्रतानें ब्राह्मणाला पकडून धरून खेंचता येत नाहीं तो पार गेलेला पुन परत येत नाहीं (८)

परमट्ठकसुत्त समाप्त

## ४४

## [ ६. जरासुत्तं ]

८०४ अप्पं वत जीवितं इदं। ओरं वस्ससताऽपि मिय्यति।
यो[1] चेऽपि[2] अतिच्च जीवति। अथ खो सो जरसाऽपि मिय्यति ॥१॥

८०५ सोचन्ति जना ममायिते। न हि सन्ति निच्चा परिग्गहा।
विनाभावसन्तमेविदं। इति दिस्वा नागारमावसे ॥२॥

८०६ मरणेनऽपि तं पहीयति। यं पुरिसो ममयिदन्ति मञ्ञति।
एवऽपि विदित्वा पण्डितो। न ममत्तायँ नमेथ मामको ॥३॥

१ म०–सा २ सी०–म ३–३ म०–न हिसन्ति निच्चा, Fsb न हि स तानिचा ४ सी०, म० पहिय्यति ५–५ म०–ममय, ममाय, मय्हं ६ म० नि०–दं ७ म०, Fsb –ममत्ताय ८ म०–नमेथ

## ४४

## [ ६. जरासुत्त ]

८०४ अहा ! हें जीवित किती अल्प आहे मनुष्य शंभर वर्षांपूर्वीही मरतो, आणि त्याहून जास्त जगला तर तो जरेनेंच मेल्यासारखा असतो (१)

८०५ ममत्वामुळें लोक शोक करतात पण परिग्रह नित्य नव्हत हें अस्तित्वात असलेलें जग नश्वरधर्म असें जाणून अनागारिक होऊन रहावें (२)

८०६ मनुष्य ज्याला 'हें माझें' असें समजतो, तें मरणानेंही नष्ट होतें, असें जाणून माझ्या शहाण्या अनुयायानें ममत्वाकडे (मन) झुकूं देऊं नये (३)

८०७ सुपिनेन यथाऽपि संगतं । पटिबुद्धो पुरिसो न पस्सति ।
एवऽपि पियायितं[1] जनं । पेतं कालङ्कतं न पस्सति ॥४॥
८०८ दिट्ठाऽपि सुताऽपि ते जना । येसं नाममिदं पवुच्चति ।
नाम एवावसिस्सति[3] । अक्खेय्यऽपेतस्स[4] जन्तुनो ॥५॥
८०९ सोकपरिदेवमच्छरं । न जहन्ति गिद्धा ममायिते
तस्मा मुनयो परिग्गहं । हित्वा अचरिंसु[5] खेमदस्सिनो ॥६॥
८१० पतिलीनचरस्स भिक्खुनो । भजमानस्स विवित्तमासनं[7] ।
सामग्गियमाहु तस्स तं । यो[8] अत्तानं भवने न दस्सये ॥७॥

---

१ म०–भगा २ सी० जरायित ३ म०–नाम येवा°, एवावस्सयति, एव तावसिस्सति ४ म०– एतस्स ५ म०–अचरिंसु, अचरियसु, अचरियिंसु ६ म०–रति. ७ म०–विचित्तमानसं, सी० चित्तमानसं, नि०–विवित्तमासनं ८ म०– सो

---

८०७ स्वप्नात पाहिलेली वस्तु जसा जागा झालेला मनुष्य पाहत नाहीं, त्याप्रमाणें परलोकवासी, मृत, अशा प्रियजनाला तो पाहू शकत नाहीं. ( ४ )

८०८. अमुक अमुक नांवाच्या जनांना आपण पाहतों किंवा त्यांजविषयीं ऐकतों. त्यांपैकीं जो प्राणी परलोकवासी होतो, त्याचें अक्षेय असें नाव तेवढें शिल्लक राहतें ( ५ )

८०९ मम भावानें लुब्ध झालेले जन शोक, परिदेव आणि मत्सर सोडीत नाहींत. म्हणून क्षेमदर्शी मुनि परिग्रह सोडून राहतात (६)

८१० बाह्य वस्तूंपासून चित्त दूर ठेवून एकान्तवास सेवन करणारा भिक्षु आपलें मन गृहविचारांत घालीत नाहीं, ही त्याची ( मोक्षासाठीं ) पूर्व-तयारीचें म्हटली जाते ( ७ )

---

१ टीकाकार ' मां[illegible]सारखें ( आवडतें ) ' असा अर्थ देतो
२ टीकाकार ' [illegible] ( नि[illegible] ) योग्य तोच मोठा ' असा अर्थ देतो.

८१७ यसो कित्ति[1] च या पुब्बे हायते[2] वापि तस्स सा ।
एतऽपि दिस्वा सिक्खेथ मेथुन विप्पहातवे ॥४॥
८१८ सङ्कप्पेहि परेतो सो[3] कपणो विय झायति ।
सुत्वा परेस निग्घोस मङ्कु होति तथाविधो ॥५॥
८१९ अथ सत्थानि कुरुते परवादेहि चोदितो ।
एस ख्वस्स महागेधो मोसवज्ज पगाहति ॥६॥
८२० पण्डितो'ति समञ्ञातो[4] एकचरियं अधिट्ठितो ।
अथापि मेथुने युत्तो मन्दो'व परिकिस्सति ॥७॥

१ सी०–कित्त. २ सी०–हायते चापि. ३ Fsb.–यो. ४ म०–समञ्ञातो.

८१७. त्यानें पूर्वी मिळविलेलें यश व कीर्ति नष्ट होतात, हेंही पाहून स्त्रीसग सोडण्यास शिकावें. (४)

८१८. तो सकल्पपरायण माणूस दरिद्रासारखा चिंतामग्न होतो. तसा तो इतरानीं केलेली निंदा ऐकून खजील होतो (५)

८१९. आणि इतरानीं वादात आव्हान केलें असता तो शास्त्रें[1] रचतो, असा हा महालुब्ध माणूस असत्यात बुडून जातो (६)

८२०. एकचर्या (सन्यास) पत्करलेला एखादा माणूस 'पण्डित आहे' अशी ख्याति पावतो, पण तो जर स्त्रीसग धरू लागला तर मन्दबुद्धि माणसाप्रमाणें क्लिष्ट होतो. (७)

१. शास्त्रें–मूळ सत्थानि, त्याचा अट्ठकथाकारानें 'शस्त्रें' असा अर्थ केला आहे. आपणास व इतरास अपायकारक होतील अशीं वचनें वाल्ले' चिनी सस्करण ह्याच अर्थाला जवळ आहे.

८२१ एतमादीनवं ञत्वा मुनि पुब्बापरे इध ।
एकचरियं दळ्हं कयिरा न निसेवेथ मेथुनं ॥ ८ ॥

८२२ विवेकं येव सिक्खेथ एतदरियानमुत्तमं ।
तेन सेट्ठो न मञ्ञेथ स वे निब्बानसन्तिके ॥ ९ ॥

८२३ रित्तस्स मुनिनो चरतो कामेसु अनपेक्खिनो ।
ओघतिण्णस्स पिहयन्ति कामेसु गथिता पजा'ति ॥ १० ॥

तिस्समेत्तेय्यसुत्तं निट्ठितं ।

---

१ म०–कयिराथ, करियाथ. २ म०–एकचरियानं–०. ३–३ म०–न तेन सेट्ठो. ४ सी०–वित्तस्स. ५ म०–गधिता.

---

८२१. पूर्व आणि अपर वर्तनांतील फरकामुळें उत्पन्न होणारा हा दोष पाहून मुनीनें या जगात एकचर्या दृढ करावी व स्त्रीसंग करूं नये. (८)

८२२. एकान्तच शिकावा. तोच आर्यांना उत्तम वाटतो. तेवढें करून त्यानें आपणांस श्रेष्ठ समजूं नये. तोच निर्वाणाच्या अगदीं जवळ आहे असें जाणावें. (९)

८२३. कामोपभोगांत अनपेक्ष होऊन एकान्तात राहणाऱ्या ओघतीर्ण मुनीचा कामोपभोगांत गुंतलेले लोक हेवा करतात. (१०)

तिस्समेत्तेय्यसुत्त समाप्त

४६

## [ ८. पसूरसुत्तं ]

८२४ इधेव सुद्धिं[1] इति वादियन्ति[2] । नाञ्ञेसु[3] धम्मेसु विसुद्धिमाहु ।
य निस्सिता तत्थ सुभं[4] वदाना । पच्चेकसच्चेसु पुथू निविट्ठा ॥ १ ॥
८२५ ते वादकामा परिसं विगय्ह । बालं दहन्ति[5] मिथु अञ्ञमञ्ञं ।
वदेन्ति[6] ते अञ्ञसिता कथोज्जं । पसंसकामा कुसला वदाना ॥२॥
८२६ युत्तो कथाय[7] परिसाय मज्झे । पसंसमिच्छं विनिघाति होति ।
अपाहतस्मिं पन मङ्कु होति । निन्दाय सो कुप्पति रन्धमेसी ॥ ३ ॥

१ Fsb., सी०—सुद्धि. २ म०—वादयन्ति. ३ म०—नञ्ञेसु. ४ नि०—सुभा. ५ म०—हनन्ति ६ म०, नि०—वदन्ति. ७ सी०—°यं.

४६

## [ ८. पसूरसुत्त ]

८२४. लोक आपापल्या पंथातच शुद्धि आहे असें प्रतिपादन करतात, व इतर पंथात शुद्धि नाहीं असें म्हणतात. ज्या पंथाचा आश्रय करतात, त्यातच श्रेय आहे असें म्हणणारे ते निरनिराळ्या पंथात बद्ध होतात (१)

८२५. ते वाद करण्याच्या इच्छेनें सभेंत जाऊन परस्पर परस्परांना मूर्ख ठरवितात. ते अन्यत्र पंथात बद्ध झालेले व आपणास वादात कुशल म्हणविणारे प्रशंसेच्या इच्छेनें वादविवाद करतात. (२)

८२६. सभेमध्यें वादात गुंतला असता तो प्रशंसेच्या इच्छेनें दुसऱ्यावर ( वाणीचे ) घाव घालणारा होतो; पण वादात पराजित झाला तर खजील होतो, आणि निंदा झाली तर रागावतो व दुसऱ्याचें वर्म शोधतो. ( ३ )

८२७ यमस्स वाद परिहीनमाहु । अपाहत पञ्हवीमसंकासे ।
परिदेवेति सोचति हीनवादो । उपच्चगा म ति अनुथुणाति ॥४॥

८२८ एते विवादा समणेसु जाता । एतेसु उग्घाति निघाति होति ।
एतऽपि दिस्वा विरमे कथोज्ज । न हञ्ञदत्थत्थि पससलाभा ५

८२९ पससितो वा पन त थ होति । अक्खाय वाद परिसाय मज्झे ।
सो हस्सेति उण्णमतिञ्च तेन । पप्पुय्य तम थ यथामनो अहु ६

१ म०, Fsb, सी०-यञ्हवि, सी० Fsb-°सका ये २ Fsb-°ती ३ सी०, म०, Fsb-°नाति ४ म०-°पि ५ सी०-एव ६ Fsb - ती, म०-हसति ७ म०-°सी च, ८ Fsb स अत्थ म०-तमाथ ९ सी०-हु

८२७ तेथें जे परीक्षक असतील, ते जर 'याचा मुद्दा खोटा आहे व तो खोडून काढला गेला' असें म्हणाले, तर हा वादात हरलेला परिदेव आणि शोक करतो आणि प्रतिपक्षानें आपणावर जय मिळविला म्हणून चडफडतो (४)

८२८ अशा रीतीनें श्रमणामध्यें विवाद उत्पन्न होतात, व त्यात हा दुसऱ्यावर आघात करतो किंवा आपण आघात पावतो म्हणून हा प्रकार पाहून विवादापासून निवृत्त व्हावें कारण त्यात प्रशंसेच्या लाभाशिवाय दुसरा कोणताच फायदा नाहीं (५)

८२९ सभेमध्यें आपला मुद्दा मांडून कधीं कधीं तो तेथें प्रशंसा पावतो, व तेणेंकरून हर्षित होतो व वर डोकें करून चालतो तसा जय मिळवून तो परिपूर्ण-मनोरथ होतो. (६)

८३० या उण्णति साऽस्स विघातभूमि । मानातिमानं वदते पनेसो ।
एतऽपि दिस्वा न विवादयेथ । न हि तेन सुद्धिं कुसला वदन्ति ॥ ७ ॥

८३१ सूरो यथा राजखादाय पुट्ठो । अभिगज्जमेति पटिसूरमिच्छं ।
येनेव सो तेन पलेहि सूर । पुब्बेव नत्थि यदिदं युधाय ॥८

८३२ ये दिट्ठिमुग्गय्ह विवादियन्ति । इदमेव सच्च ति च वादियन्ति ।
ते त्वं वदस्सु न हि ते ध अत्थि । वादम्हि जाते पटिसेनिकत्ता ॥ ९ ॥

१ Fsb.— °सो. २ म०—सास, तस्स. ३ म०—सुद्धि ४ म०—फुठो.
५ म०—पलेति ६ म०—सूर, पुर. ७ म०—विवादयन्ति. ८ म०—वदस्सु.
९ म०—°व.

८३० पण हा जो गर्व तोच याच्या घाताचा पाया होय. (कारण), हा मनुष्य आपला मान (अहंकार) आणि अतिमान इतरांना दाखवीतच असतो हाही प्रकार पाहून माणसानें वादात शिरू नये. कारण वादानें शुद्धि होत नाहीं असें सुज्ञ म्हणतात. (७)

८३१ राजाच्या अन्नावर पोसलेला शूर जसा प्रतिशूर पाहत गर्जना करीत जातो, तसा हा वादी होय. पण, वा शूरा, तू शूराच्याच मार्गे लाग युद्ध करण्याला प्रवृत्त करणारा (जो अहंकार) तो माझा पूर्वीच नष्ट झाला आहे. (८)

८३२ जे साम्प्रदायिकतेला पकडून वादविवाद करतात व आपलें तेवढें सत्य असें प्रतिपादन करतात, त्यांजपाशीं जाऊन तू वाद कर. कारण तू वाद सुरू केलास तर प्रतिवादी होऊन उभा राहाणारा येथें तुला सापडणार नाहीं (९)

८३३ विसेनिकत्वा पन ये चरन्ति[1] । दिट्ठीहि दिट्ठिं अविरुज्झमाना ।
तेसु त्वं किं[2] लभेथो[3] पसूर[4] । येसीध नत्थि[5] परमुग्गहीतं[6] १०

८३४ अथ त्वं पवितक्क[7]मागमा । मनसा दिट्ठिगतानि चिन्तयन्तो ।
धोनेन युगं समागमा । न हि त्वं सग्घसि[8] सम्पयातवे
ति ॥ ११ ॥

पसूरसुत्तं निट्ठितं ।

---

१ म०—वदन्ति. २ म०—किर ३ म०—लभेथ ४ म०—समुद्द. ५ Fsb—नत्थी ६ म०—परम° ७ म०—सवितक्क° ८ सी०—पग्घसि, [illegible]०—अग्घसि, नि०—सक्खसि.

८३३ पण जे प्रतिपक्षबुद्धि नाहींशी करून रहातात व आपल्या पक्षातच दुसऱ्या पक्षाशीं विरोध करीत नाहींत, व ज्यांना आपलाच पक्ष श्रेष्ठ असें वाटत नाहीं, त्यांजपाशी, हे पसूरा, तुला काय मिळणार ? (१०)

८३४ आणि साम्प्रदायिक मताचा विचार करीत असता तुझ्या मनात वादबुद्धि उद्भवली पण येथें धूतपापाशीं प्रसंग असल्यामुळें तुला वाद चालविता येणें शक्य नाहीं (११)

पसूरसुत्त समाप्त

---

४७

## [ ९. मागन्दियसुत्तं ]

८३५ दिस्वान तण्हं अरतिं रगं च । नाहोसि छन्दो अपि मेथुनस्मिं ।
किमेविदं मुत्तकरीसपुण्णं । पादाऽपि नं सम्फुसितुं न इच्छे ॥१

८३६ एतादिसं चे रतनं न इच्छसि । नारिं नरिन्देहि बहूहि पत्थितं ।
दिट्ठिगतं सीलवतानुजीवितं । भवूपपत्तिं च वदेसि कीदिसं ॥२

१-१ म०-अरती च रगं. नि०-अरतिं च रगं. २ Fab -दिट्ठी°.

४७

## [ ९. मागन्दियसुत्त ]

८३५. ( भगवान्– ) तृष्णा, अरति आणि रगा ( रति ) या तीन मारकन्यांना पाहून देखील मैथुनाचा विचार मनात आला नाही. केवळ मूत्रपुरीषानें भरलेलें शरीर आहे, त्याला पायानेंही मी स्पर्श करूं इच्छीत नाही. ( १ )

८३६. ( मागन्दिय– ) अनेक राजांनी प्रार्थिलेलें असें हें स्त्री-रत्न जर तूं इच्छीत नाहीस, तर अशी तुझी दृष्टि, शील, व्रत व उपजीविका कोणती * आणि तुझा परलोक कसा प्रकारचा म्हणतोस ! (२)

* या तीन मारकन्या बुद्धाला मोह पाडण्यासाठी आल्या अशी कथा संयुत्तनिकायाच्या सगाथावग्गात आहे. मागन्दिय ब्राह्मणानें आपली कन्या बुद्धास अर्पण करण्यासाठी आणली. त्या प्रसंगी बुद्धानें ही गाथा म्हटली असें अट्ठकथेंत सांगितलें आहे.

८३७ इद वदामी ति न तस्स होति (मागन्दिया ति भगवा)
धम्मेसु निच्छेय्य समुग्गहीत।
पस्स च दिट्ठीसु अनुग्गहाय। अज्झत्तसंन्ति पैचिन अदस्सं ३
८३८ विनिच्छया यानि पकप्पितानि (इति मागन्दियो। ते वे मुनि
ब्रूसि अनुग्गहाय।
अज्झत्तसन्ती ति यमेतमत्थ। कथ नु धीरेहि पवेदित त ॥४॥
८३९ न दिट्ठिया न सुतिया न ञाणेन (मागन्दिया ति भगवा)।
सीलब्बतेनापि न सुद्धिमाह।
अदिट्ठिया अस्सुतिया अञ्ञाणा। असीलता अब्बता नोऽपि तेन
एते च निस्सज्ज अनुग्गहाय। सन्तो अनिस्साय भव न जप्पे ॥५

१ सी०, म०—अज्झत्त सन्ति (गाथा ९१९ पहा) २ म०—पविचिन ३ म०— अद्दस ४–४ म०—विनच्छयानि ५ सी०—चे ६ Fsb —मुनी ७–७ म० — विसुद्धि, सी०— माहा ८ म०, अ० — असुतिया ९ Fsb — अञ्ञाणा १० म०—न ११ म०—निसज्ज

८३७ त्या मला—हे मागन्दिया, असें भगवान् म्हणाला— धर्मपथात नीट विचार करून, एकादी दृष्टि पकडून, 'ही माझी' असें म्हणावेंसें वाटत नाहीं या ज्या दृष्टि त्या पकडण्याला योग्य नव्हत असें जाणून व विचार करून मी अध्यात्म शान्ति मिळविली (३)

८३८ जीं विकल्पिलेलीं निश्चित मतें आहेत—असें मागन्दिय म्हणाला—तीं, हे मुनि, पकडण्याला योग्य नव्हत असें तू म्हणतोस, तर मग ही जी अध्यात्म शान्ति, ती सुज्ञानी कशी वर्णिलेली आहे?(४)

८३९ दृष्टीनें, श्रुतीनें आणि ज्ञानानें— हे मागन्दिया, असें भगवान् म्हणाला—किंवा शीलानें आणि व्रतानें शुद्धि नाहीं अदृष्टीनें अश्रुतीनें, अज्ञानानें, अशीलानें आणि अव्रतानेंही शुद्धि नाहीं, हे सर्व पथ पकडण्यास योग्य नाहींत म्हणून ते सोडून, अनासक्त, शान्त माणसानें भव प्राप्त करून घेण्याकरिता व्याकुळतीस येऊ नये (५)

८४० नो चे किर दिट्ठिया न सुतिया न ञाणेन (इति मागन्दियो) सीलब्बतेनापि विसुद्धिमाह।
अदिट्ठिया असुतिया अञाणा। असीलता अब्बता नोऽपि तेन
मञ्ञेमेऽहं मोमुहमेव धम्मं। दिट्ठिया एके पच्चेन्ति सुद्धिं ॥६॥

८४१ दिट्ठिं च निस्साय अनुपुच्छमानो (मागन्दिया ति भगवा)। समुग्गहीतेसु पमोहमागा।
इतो च नाद्दक्खि अणुऽपि सञ्ञं। तस्मा तुवं मोमुहतो दहासि ॥ ७ ॥

१ म०, Fsb.-मञ्ञामहं. २-२ सि०-दिट्ठिसु. ३ सी०-समोह° म०-समोहमागमा, पमोहमागमा. ४ रो०-नादक्खि. ५ म०-दहासि, दक्खासि, दस्सति.

८४०. जर दर्शनें, श्रुतीनें आणि ज्ञानानें—असें मागन्दिय म्हणाला—किंवा शीलानें आणि व्रतानें शुद्धि नाहीं असें म्हणतोस, तसेंच अदर्शनें, अश्रुतीनें, अज्ञानानें, अशीलानें आणि अव्रतानें ही जर शुद्धि नाहीं, तर मग मला वाटतें कीं हें सर्व केवळ तुझें अज्ञानच होय. (कारण), कित्येक (लोक) दर्शनें शुद्धि मिळते असें समजतात. (६)

८४१. साम्प्रदायिक मताच्या आधारानें विचारणारा तूं—हे मागन्दिया, असें भगवान् म्हणाला—लोकांनीं स्वीकारलेल्या मतांत मोह पावतोस; (म्हणून) मी जें सांगितलें तें तुला अणुमात्रही न समजल्यामुळें मी (जें म्हटलें तें) मोहमय आहे असें तू समजतोस. (७)

८४२ समो विसेसी उद वा निहीनो। यो मञ्ञति सो विवदेथ तेन।
तीसु विधासु अविकम्पमानो। समो विसेसी ति न तस्स होति॥८

८४३ सच्च ति सो ब्राह्मणो किं वदेय्य। मुसा ति वा सो विवदेथ केन।
यस्मिं समं विसमं चापि नत्थि। सो केन वादं पटिसंयुजेय्य॥९

८४४ ओकं पहाय अनिकेतसारी। गामे अकुब्ब मुनि सन्थवानि।
कामेहि रित्तो अपुरेक्खरानो। कथं न विग्गय्ह जनेन कयिरा॥१०

१ म०–विहीनो २ म०, नि०–वाऽपि ३ म०–अपुरेक्खमानो ४ सी०, नि०–नु

८४२ जो आपणाला इतरांच्या समान, इतराहून श्रेष्ठ किंवा हीन समजतो, तो त्यामुळें विवादात पडेल. पण या तीनही प्रकारात जो कंप पावत नाहीं त्याला आपण इतरांच्या समान किंवा इतराहून श्रेष्ठ वाटत नाहीं (८)

८४३. तो ब्राह्मण 'हेंच काय तें सत्य' असं कसें म्हणेल? किंवा 'तें खोटें' म्हणून वाद कसा करील? ज्याला आपण सम किंवा विषम आहों असें वाटत नाहीं, तो कोणाशीं वाद करील? (९)

८४४ घर सोडून अनागारिक भावाने चालणारा, गावातील लोकांशीं सलगी न जोडणारा, कामोपभोगापासून निवृत्त आणि कोणत्याही सांप्रदायिक मताचा पुरस्कार न करणारा मुनि लोकांशीं वादविवाद करीत बसत नाहीं (१०)

४८

## [ १०. पुराभेदसुत्तं ]

८४८ कथंदस्सी कथंसीलो उपसन्तो ति वुच्चति ।
त मे गोतम पब्रूहि पुच्छितो उत्तमं नरं ॥ १ ॥
८४९ वीततण्हो पुरा भेदा ( ति भगवा ) पुब्बमन्तमनिस्सितो ।
वेमज्झे नूपसंखेय्यो तस्स नत्थि पुरेक्खतं ॥ २ ॥
८५० अक्कोधनो असन्तासी अविकत्थी अकुक्कुचो ।
मन्तभाणी अनुद्धतो स वे वाचायतो मुनि ॥ ३ ॥

१ म—नुप°, न प°. २ म०—पुरक्खतं ३ म०—°च्चो

४८

## [ १०. पुराभेदसुत्त ]

८४८ "कोणत्या दर्शनामुळें आणि कोणत्या शीलामुळें (मनुष्य) 'उपशान्त' म्हटला जातो? हे गोतमा, असा उत्तम माणूस कोणता हें विचारतों, तें मला सांग" ( १ )

८४९ शरीरभेदापूर्वी जो वीततृष्ण—असें भगवान् म्हणाला—तो अतीत काळाला चिकटून राहत नाहीं, वर्तमानकाळीं ( एखाद्या मर्यादित संज्ञेनें ) वर्णिला जात नाहीं, आणि त्याला भविष्यकाळाविषयीं आसक्ति नाहीं ( २ )

८५० अक्रोधन, संत्रस्त न होणारा, आपली शेखी न मिरविणारा, कौकृत्य नसणारा, विचारपूर्वक बोलणारा व अभ्रान्त, तोच वाचासंयमी मुनि होय ( ३ )

१ ९२५ व्या गाथेतील ह्या शब्दावरील टीप पाहा

८५१ निरासत्ति अनागते अतीतं नानुसोचति ।
विवेकदस्सी फस्सेसु दिट्ठीसु च न निय्यति ॥ ४ ॥
८५२ पतिलीनो अकुहको अपिहालु अमच्छरी ।
अप्पगब्भो अजेगुच्छो पेसुणेय्ये च नो युतो ॥ ५ ॥
८५३ सातियेसु अनस्सावी अतिमाने च नो युतो ।
सण्हो च पटिभानवा न सद्धो न विरज्जति ॥ ६ ॥
८५४ लाभकम्या न सिक्खति अलाभे न च कुप्पति ।
अविरुद्धो च तण्हाय रसे च नानुगिज्झति ॥ ७ ॥

---

१ सी०, म०—°सत्ति, Fsb —°त्ती. २ म०—पटि°. ३ म०—युत्तो. ४ म०—लोभ,° °कम्या. ५—५ म०—च न, ६—६ म०, अ०—रसेसु

---

८५१. त्याला अनागत वस्तूची आसक्ति नाहीं, तो अतीत वस्तूविषयीं शोक करीत नाहीं, तो विषयस्पर्शापासून मुक्तता जाणतो आणि तो सांप्रदायिक मतांनीं ओढला जात नाहीं. (४)

८५२ तो बाह्य जगापासून दूर, अदांभिक, निःस्पृह, अमत्सरी, अप्रगल्भ, अजुगुप्सी असतो व चाहाडी करीत नाहीं. (५)

८५३. तो कामसुखाचा स्वतःवर पगडा बसूं देत नाहीं व अभिमान धरीत नाहीं; तो कोमल व प्रतिभासंपन्न असतो, आणि त्याला (साक्षात्कार झाल्यामुळें) श्रद्धेची आणि वैराग्याची गरज राहत नाहीं. (६)

८५४. तो लाभासाठीं धर्म शिकत नाहीं; लाभ मिळाला नसता रागावत नाहीं; आणि सर्वांशीं अविरुद्ध होऊन तृष्णेत आणि रसांत लुब्ध होत नाहीं. (७)

## ४९

### [ ११. कलहविवादसुत्तं ]

८६२ कुतो पहूता कलहा विवादा । परिदेवसोका सह मच्छरा च ।
मानातिमाना सह पेसुणा च । कुतो पहूता ते तदिङ्घ ब्रूहि ॥ १॥
८६३ पियो पहूता कलहा विवादा । परिदेवसोका सह मच्छरा च ।
मानातिमाना सह पेसुणा च । मच्छरियुत्ता कलहा विवादा ।
विवादजातेसु च पेसुणानि ॥ २ ॥
८६४ पिया सु लोकस्मिं कुतोनिदाना । ये वाऽपि लोभा विचरन्ति लोके ।
आसा च निट्ठा च कुतोनिदाना । ये सम्परायाय नरस्स होन्ति ॥३॥

१– १ म० पियप्पहूता

## ४९

### [ ११. कलहविवादसुत्त ]

८६२ "कलह आणि विवाद, परिदेव, शोक आणि मत्सर हे कोठून उत्पन्न होतात? आणि अहंकार, अतिमान, आणि चाहाड्या कोठून उत्पन्न होतात हें कृपा करून सांग" (१)

८६३ "कलह आणि विवाद, परिदेव, शोक आणि मत्सर, अहंकार अतिमान आणि चाहाड्या प्रिय वस्तूपासून उत्पन्न होतात मात्सर्यापासून कलह आणि विवाद उत्पन्न होतात, आणि वादविवादांत पडणाऱ्या मनुष्यामध्यें चाहाड्या उद्भवतात" (२)

८६४ "या जगांत वस्तू प्रिय कशामुळें उत्पन्न होतात? जे जगांत लोभ वावरतात ते कशामुळें उत्पन्न होतात? आणि माणसाच्या पुनर्भवाला ज्या कारणीभूत होतात त्या आशा आणि निष्ठा ( फलप्राप्ति ) कशामुळें उत्पन्न होतात?" (३)

८६५ छन्दानिदानानि पियानि लोके। ये वाऽपि लोभा विचरन्ति लोके।
आसा च निट्ठा च इतोनिदाना। ये सपरायाय नरस्स होन्ति ॥४॥

८६६ छन्दो नु लोकस्मिं कुतोनिदानो। विनिच्छया वाऽपि कुतो पहूता।
कोधो मोसवज्जं च कथंकथा च। ये वाऽपि धम्मा समणेन वुत्ता॥ ५

८६७ सातं असातं ति यमाहु लोके। तमूपनिस्साय पहोति छन्दो।
रूपेसु दिस्वा विभवं भवं च। विनिच्छयं कुरुते जन्तु लोके॥६॥

८६८ कोधो मोसवज्जं च कथंकथा च। एतेऽपि धम्मा द्वयमेव सन्ते।
कथंकथी ञाणपथाय सिक्खे। ञत्वा पवुत्ता समणेन धम्मा ॥७॥

---

८६५ "या जगात वस्तु छंदामुळें प्रिय होतात जगात वावरणारे लोभ छंदामुळें होतात, माणसाच्या पुनर्भवाला ज्या कारणीभूत होतात त्या आशा आणि निष्ठा (फलप्राप्ति) यामुळें होतात" (४)

८६६ "जगात छंद कशामुळें होतो? ठाम मतें कोठून उत्पन्न होतात? आणि क्रोध, लबाडी, कुशंका किंवा श्रमणानें (बुद्धानें) दाखवून दिलेले असे दुसरे (दोष) कशामुळें होतात?" (५)

८६७ "ज्याला जगात सुख आणि दुःख म्हणतात त्यापासून छंद उत्पन्न होतो (मनाचे विषय बनलेल्या) रूपासंबंधीं उत्पाद आणि व्यय पाहून प्राणी जगात ठाम मतें बनवतो (६)

८६८ क्रोध, लबाडी आणि कुशंका या गोष्टीही याच द्वयामुळें (सुखदुःखामुळें) उत्पन्न होतात श्रमणानें ज्ञान मिळवून हे (कुशलाकुशल) धर्म दाखवून दिले आहेत म्हणून संशयग्रस्त माणसानें त्याचा धर्ममार्ग शिकावा" (७)

८६९. सात असात च कुतोनिदाना । किस्मिं असन्ते न भवन्ति हेते ।
विभव भव चापि यमेतमत्थ । एत मे पब्रूहि यतोनिदान ॥ ८ ॥

८७० फस्सेनिदान सातमसात । फस्से असन्ते न भवन्ति हेते ।
विभव भव चापि यमेतम थ । एत ते पब्रूमि इतोनिदान ॥ ९ ॥

८७१ फस्सो नु लोकस्मि कुतोनिदानो । परिग्गहा चापि कुतो पहूता ।
किस्मिं असन्ते न ममत्तमत्थि । किस्मिं विभूते न फुसन्ति फस्सा १०

८७२ नाम च रूप च पटिच्च फस्सा । इच्छानिदानानि परिग्गहानि ।
इच्छा न सन्त्या न ममत्तमत्थि । रूपे विभूते न फुसन्ति फस्सा ११

१ नि०–फस्स निदान, २ अ॰ऽपि ३–३ म०, नि०–इच्छायऽसन्त्या

८६९ " सुख आणि दु ख ही कशामुळें होतात ? कोणत्या गोष्टीचा नाश झाल्यानें ही होत नाहींत ? आणि ( ह्याचाच ) लाभ आणि हानि कशामुळें होतात हेंही मला साग " ( ८ )

८७० "स्पर्शामुळें सुख आणि दु ख ही होतात, स्पर्श नसला तर हीं होत नाहींत, ( ह्याचा ) लाभ आणि ( ह्याची ) हानिही याचमुळें होते, असें मी म्हणतों " ( ९ )

८७१ " जगात स्पर्श कशामुळें होतो ? परिग्रह कशामुळें उत्पन्न होतात ? कशाचा नाश झाला असता ममत्व राहत नाहीं ? आणि कशाच्या नाशानें स्पर्श उत्पन्न होत नाहीं ?" ( १० )

८७२. " नाम आणि रूप यावर अवलबून स्पर्श उत्पन्न होतात, इच्छेमुळें परिग्रह उत्पन्न होतात, इच्छा नष्ट झाली तर ममत्व राहत नाहीं, आणि रूप-( विचार ) नष्ट झाल्यानें स्पर्श उत्पन्न होत नाहीं ( ११ )

८७३ कथं-समेतस्स विभोति रूपं । सुखं दुखं चाऽपि कथं विभोति ।
एतं मे ब्रूहि यथा विभोति । तं जानियाम[1] इति मे मनो अहु ॥१२॥

८७४ न सञ्ञसञ्ञी न विसञ्ञसञ्ञी । नोऽपि असञ्ञी न विभूतसञ्ञी ।
एवं समेतस्स विभोति रूपं । सञ्ञानिदाना हि पपञ्चसंखा ॥१३॥

८७५ यं तं अपुच्छिम्ह अकित्तयी[2] नो । अञ्ञं तं पुच्छाम तदिंघ ब्रूहि ।
एत्तावतग्गं नो वदन्ति हेके । यक्खस्स सुद्धिं इध पण्डितासे ।
उदाहु अञ्ञऽपि वदन्ति एत्तो ॥ १४ ॥

---

१ म०-जानिस्साम २ म०-अकित्तयि

---

८७३. "कोणत्या गुणांनी युक्त झाल्यानें रूप-विचार नष्ट होतो? सुख आणि दुःख कशामुळें नष्ट होतें? हीं कशीं नष्ट होतात, हें मला सांग. तें जाणण्याची माझी इच्छा आहे." (१२)

८७४. "(प्राकृतिक) संज्ञा नसलेला, किंवा त्याची संज्ञा नष्ट झाली आहे असा (वेडा किंवा भ्रमिष्ट) नसणारा, (निरोध-समाधि प्राप्त झाल्यामुळें किंवा असंज्ञी-सत्त्व बनल्यामुळें) संज्ञाविहीन झाला आहे असेंही नसणारा, किंवा (अरूपध्यान प्राप्त झाल्यामुळें) रूपें ओलांडली आहेत असें ही नसणारा—अशा गुणांनी जो युक्त, त्याचा रूपविचार नष्ट होतो. कारण ज्याला प्रपंच म्हणतात तो ह्या संज्ञेमुळें होतो[1]." (१३)

८७५. "जें आम्ही विचारलें, तें तू आम्हांस सांगितलेंस. आतां तुला आम्ही आणखी एक विचारतों तें कृपा करून सांग. या जगांत जे पंडित आहेत, ते (रूपविचाराचा नाश) हीच अग्र आत्मशुद्धि म्हणतात काय? किंवा याहून अन्य शुद्धि समजतात?" (१४)

---

१. टीकाकाराला अनुसरून ह्या कूटगाथेचा अर्थ दिला आहे.

८७६ एत्तावतग्गंऽपि वदन्ति हेके । यक्खस्स सुद्धिं इध पण्डितासे ।
तेसं पुनेके समयं वदन्ति । अनुपादिसेसे कुसला वदाना ॥ १५ ॥
८७७ एते च ञत्वा उपनिस्सिता ति । ञत्वा मुनी निस्सये सो विमंसी ।
ञत्वा विमुत्तो न विवादमेति । भवाभवाय न समेति धीरो ति १६

कलहविवादसुत्तं निट्ठितं ।

५०

[ १२. चूळवियूहसुत्तं ]

८७८ सकं सकं दिट्ठिपरिब्बसाना । विग्गय्ह नाना कुसला वदन्ति ।
"यो एवं जानाति स वेदि धम्मं । इदं पटिकोसमकेवली सो" १

१. म०—मुनि.

८७६. "या जगांत कित्येक पंडित हीच अग्र आत्मशुद्धि असें म्हणतात. पण दुसरे कांहीं आपणाला अनुपादिशेष (निर्वाणांत) कुशल समजणारे आत्म्या उच्छेदवाद अग्र आहे असें सांगतात. (१५)

८७७. पण हे सर्व उपनिश्रित (आश्रित) आहेत असें जाणून मुनि यांच्या आश्रयांची मीमांसा करून ज्ञान मिळवून मुक्त होतो, आणि वादांत पडत नाहीं; आणि तो सुज्ञ (पुढें) कोणत्याही भवांत जन्म घेत नाहीं. (१६)

कलहविवादसुत्त समाप्त

५०

[ १२. चुळवियूहसुत्त ]

८७८. आपापल्या सांप्रदायिक मताला धरून व इतरांशीं वाद करून आपापणाला कुशल म्हणवतात व म्हणतात कीं, 'जो हें मत जाणतो तोच धर्म समजतो व जो या मताला दोष देतो तो अ-केवली (बद्ध) होय.' (१)

८७९ एवऽपि विग्गय्ह विवादियन्ति। बालो परो अकुसलो ति चाहु।
सच्चो नु वादो कतमो इमेस। सब्बे व हीमे कुसला वदाना ॥२॥

८८० परस्स चे धम्ममनानुजानं। बालो मगो होति निहीनपञ्ञो।
सब्बे व बाला सुनिहीनपञ्ञा। सब्बे विमे दिट्ठिपरिब्बसाना ३॥

८८१ सन्दिट्ठिया चे पन वीवदाता। संसुद्धपञ्ञा कुसला मुतीमा
न तेस कोचि परिहीनपञ्ञो। दिट्ठि हि तेसऽपि तथा समत्ता॥४॥

८८२ न चाहमेतं तथियं ति ब्रूमि। यमाहु बाला मिथु अञ्ञमञ्ञं।
सकं सकं दिट्ठिमकंसु सच्चं। तस्मा हि बालो ति परं दहन्ति॥५॥

१ सी०-चे २ नि०-मगो. ३ म०-वीवदाना. ४ Fsb दिट्ठी.
५ रो०-चाऽहमेत.

८७९. या प्रमाणें वाद करून ते विवाद माजवितात, आणि दुसऱ्याना अकुशल, मूर्ख म्हणतात. हे सगळे आपणाला कुशल म्हणवतात, तेव्हां त्यांच्या वादात (मतात) कोणता वाद सत्य होय? (२)

८८० दुसऱ्याचा धर्माला वाव न ठेवणारा जर मूर्ख, पशु आणि हीनबुद्धि ठरतो, तर मग हे स्वतःच्या सांप्रदायिक मताना धरून चालणारे सर्वच मूर्ख आणि सर्वच हीनबुद्धीचे ठरतात (३)

८८१ आपलेंच मत उत्तम समजून वाद करणारे विशुद्धबुद्धि, कुशल आणि मतिमान् ठरतात, तर मग, त्यांत– मताविषयीं वाद करणाऱ्यात– कोणीच हीनबुद्धीचे ठरत नाहींत. कां कीं, तेही इतराप्रमाणेंच आपापलें मत उत्तम समजतात (४)

८८२ जें ते परस्पराना मूर्ख म्हणतात, तें तथ्य नव्हे असें मी म्हणतों कारण आपापल्या मताना ते सत्य समजतात, आणि म्हणून इतराना मूर्ख ठरवतात (५)

८८३ यमाहु सच्चं तथियं ति एके। तमाहु अञ्ञे तुच्छं मुसा ति।
एवऽपि विग्गय्ह विवादियन्ति[1]। कस्मा न एकं समणा वदन्ति॥६॥

८८४ एकं हि सच्चं न दुतियमत्थि। यस्मिं पजा नो विवदे पजानं।
नाना ते सच्चानि सयं थुनन्ति। तस्मा न एकं समणा वदन्ति॥७॥

८८५ कस्मा नु सच्चानि वदन्ति नाना। पवादियासे कुसला वदाना।
सच्चानि सुतानि[2] बहूनि नाना। उदाहु ते तक्कमनुस्सरन्ति॥८॥

८८६ न हेव सच्चानि बहूनि नाना। अञ्ञत्र सञ्ञाय निच्चानि लोके।
तक्कं च दिट्ठीसु पकप्पयित्वा। सच्चं मुसा ति द्वयधम्ममाहु॥९॥

---

१ म०— विवादयन्ति. २ रो०—सु तानि

---

८८३ कित्येक जें तथ्य आणि सत्य म्हणतात, तें दुसरे तुच्छ आणि खोटें म्हणतात, व याप्रमाणें वाद करून विवाद माजवितात. हे श्रमण एकच सत्य का प्रतिपादीत नाहींत ? (६)

८८४. सत्य एकच आहे, दुसरें नाहीं, ज्याविषयीं समजस लोक आपसात विवाद करणार नाहीत पण श्रमण सत्यें अनेक अशी वढाई मारतात, आणि म्हणून ते ' सत्य एक ' असें म्हणत नाहींत (७)

८८५ ते आपणांस कुशल समजणारे वादी अनेक सत्यें आहेत असें का म्हणतात ? खरोखरच सत्यें पुष्कळ आणि अनेक आहेत असें परंपरागत आहे काय ? का ते नुसता तर्कच करीत असतात ? (८)

८८६ जगात सत्यें पुष्कळ आणि अनेक नाहींतच संज्ञेशिवाय (स्वत च करून घेतलेल्या कल्पनेशिवाय) त्यात नित्य असें काहीं नाहीं साम्प्रदायिक मतांत तर्क चालवून सत्य आणि असत्य या दोन गोष्टी ते प्रतिपादीत असतात (९)

८८७ दिट्ठे सुते सीलवते मुते वा। एते च निस्साय विमानदस्सी।
विनिच्छये ठत्वा पहस्समानो[1]। बालो परो अकुसलो[2]'ति चाह॥१०॥
८८८ येनेव बालो ति परं दहाति। तेनातुमानं कुसलो ति चाह।
सयमत्तना सो कुसलो वदानो। अञ्ञं विमानेति तदेव पाव[3]॥११॥
८८९ अतिसार[4] दिट्ठिया सो समत्तो। मानेन मत्तो परिपुण्णमानी।
सयमेव सामं मनसाऽभिसित्तो। दिट्ठी हि तस्स तथा समत्ता॥१२॥
८९० परस्स चे हि वचसा निहीनो। तुमो[5] सहा होति निहीनपञ्ञो।
अथ चे सयं वेदगू होति धीरो। न कोचि बालो समणेसु अत्थि॥१३॥

१-१ नि०-एतेसु २ नि०-पहंसमानो. ३ नि०-अकुसलो ४-४ नि०-तदेव पावद. ५ नि०-अतिसारदिट्ठिया ६ नि०-तुम्हो.

८८७. दृष्ट, श्रुत, शील, व्रत किंवा अनुमित यातच अहंकाराचा नाश (म्हणजे शुद्धि) आहे असें जाणून व ठाम मत करून तो हर्षित होतो, आणि दुसरा मूर्ख व अकुशल आहे असें म्हणतो. (१०)

८८८. ज्या (साम्प्रदायिक मताला चिकटून राहण्याच्या) गोष्टीमुळें तो दुसऱ्याला मूर्ख ठरवतो त्याचमुळें आपणाला कुशल म्हणतो. स्वत ,आपणाला कुशल म्हणवतो, परक्याचा तिरस्कार करतो व त्याप्रमाणेंच बोलतो. (११)

८८९. आपल्या मतात अत्यंत सार आहे असा विचारानें तो फुगलेला मानानें मत्त आणि परिपूर्णमानी होतो, व आपल्या मनानेंच आपणाला अभिषेक करून घेतो का कीं, ती साम्प्रदायिकता त्यानें तशा रीतीनेंच स्वीकारलेली असते. (१२)

८९०. दुसऱ्याच्या वचनानें जर हीनबुद्धि ठरतो, तर तो (दुसऱ्याला हीनबुद्धि ठरविणारा) त्याच्या बरोबरच स्वत ही हीन-बुद्धि ठरतो, आणि जर आपल्याच मतें आपण वेदपारग आणि शुद्ध ठरतो, तर मग श्रमणामध्यें मूर्ख असा कोणीच राहणार नाही. (१३)

८९१ अञ्ञं इतो याभिवदन्ति धम्मं। अपरद्धा सुद्धिमकेवलीनो[1]।
एवं हि तित्थ्या पुथुसो वदन्ति। संदिट्ठिरागेन हि तेऽभिरत्ता[2]॥१४॥
८९२ इधेव सुद्धि इति वादियन्ति[3]। नाञ्ञेसु धम्मेसु विसुद्धिमाहु।
एवऽपि तित्थ्या पुथुसो निविट्ठा। सकायने तत्थ[4] दळ्हं वदाना॥१५॥
८९३ सकायने चापि दळ्हं वदाना। कमेत्थ बालो'ति परं दहेय्य।
सयमेव[5] सो मेधकं[5] आवहेय्य। परं वदं बालमसुद्धधम्मं[6]॥१६॥
८९४ विनिच्छये ठत्वा सयं पमाय। उद्धं सो लोकस्मिं विवादमेति।
हित्वान सब्बानि विनिच्छयानि। न मेधकं कुरुते[7] जन्तु लोके॥१७॥

चूळवियूहसुत्तं[8] निट्ठितं।

---

१ लि०—सुद्धिमकेवली मे. २ नि०—त्वाभिरत्ता ३ नि०—वादयान्ति. ४ नि०—कं तत्थ. ५–५ नि०—सयं'व सो मेधगं. ६ रो०—बालमसुद्धिधम्मं. ७ नि०—न मेधगं कुब्बति. ८ म०— चूळब्यूहसुत्तं.

---

८९१. 'जे माझ्या पंथाहून भिन्न धर्म प्रतिपादितात, ते शुद्धीला उलट जातात, व ते केवली नव्हत,' असें साम्प्रदायिकपंथी परस्परांना म्हणतात. कां कीं, ते स्वसंप्रदायाच्या लोभानें लुब्ध होतात. (१४)

८९२. 'याच पंथांत शुद्धि' असें ते प्रतिपादितात, व 'इतर पंथांत शुद्धि नाहीं' असें म्हणतात. याप्रमाणें आपल्याच पंथाचें दृढ समर्थन करणारे सांप्रदायिकपंथी भिन्न भिन्न मतांत निविष्ट होतात. (१५)

८९३. आपल्याच पंथाचें दृढ समर्थन करणाऱ्यांत एक दुसऱ्याला कोणाला मूर्ख ठरवूं शकेल ? दुसऱ्याला जर तो अशुद्धधर्मी मूर्ख म्हणूं लागला, तर तो स्वत:च आपणावर वाद ओढवून घेईल. (१६)

८९४. तो ठाम मत करून घेतो व स्वत:च अनुमान करून तदनंतर लोकांशीं वाद करतो. पण जो प्राणी सर्व ठाम मतें सोडून देतो, तो लोकांशीं वाद करीत नाहीं. (१७)

चूळवियूहसुत्त समाप्त

## ५१

## [ १३. महावियूहसुत्तं ]

८९५ ये केचि'मे दिट्ठिपरिब्बसाना ! इदमेव सच्चं'ति विवादियन्ति '
सब्बे'व ते निन्दमन्वानयन्ति । अथो पससऽपि लभन्ति तत्थ ॥१॥

८९६ अप्प हि एतं न अलं समाय । दुवे विवादस्स फलानि ब्रूमि ।
एतऽपि दिस्वा न विवादियेथ[1] । खेमाभिपस्सं अविवादभूमिं ॥२॥

८९७ या काचि'मा सम्मुतियो पुथुज्जा । सब्बा'व एता न उपेति विद्वा ।
अनूपयो सो उपयं किमेय्य । दिट्ठे सुते खन्तिमकुब्बमानो ॥३॥

१ एतं पि दिस्वा न विवादयेथ.

## ५१

## [ १३. महावियूहसुत्त ]

८९५. जे कोणी साम्प्रदायिक मतांना अनुसरणारे आपलें तेवढें सत्य असें प्रतिपादन करतात, ते सर्व निन्देला पात्र होतात, आणि (कधीं कधीं) प्रशंसाही मिळवितात. (१)

८९६. (निन्दा व स्तुति) हीं दोन विवादाचीं फळें असें मी म्हणतों. पण अशा क्षुद्र गोष्टी उपशमाला कारणीभूत होत नसतात. या रीतीनें विचार करून 'अविवादभूमि कल्याणप्रद आहे' असें जाणणाऱ्यानें वादांत पडूं नये. (२)

८९७. हीं जीं सामान्य लोकांचीं मतें आहेत, तीं सर्व विद्वान् स्वीकारीत नाहीं. दृष्ट आणि श्रुत यांत आसक्ति उत्पन्न न करणारा निश्चळ असा तो चंचल कसा होईल ? (३)

८९८ सीलुत्तमा सयमेनाहु सुद्धिं । वत समादाय समुट्ठितासे ।
इधेव सिक्खेम अथऽस्स सुद्धिं । भवूपनीता कुसला वदाना ॥४॥
८९९ स चे चुतो सीलवतातो होति । स वेधति कम्म विराधयित्वा ।
स जप्पति पत्थयती सुद्धिं । सत्था व हीनो पवसं घरम्हा ॥५॥
९०० सीलब्बत वा पि पहाय सब्ब । कम्म च सावज्जऽनवज्जमेत ।
सुद्धिं असुद्धिं'ति अपत्थयानो । विरतो चरे सन्तिमनुग्गहाय ॥६॥

१ नि०–सीलव्वतो २ म०–पवेदति, नि०–पवेधति ३–४ नि०–पजप्पाति पत्थयातिच. ५ म०–सत्था विहीनो.

८९८. शील हेंच उत्तम समजणारे व व्रताचरणातच मोठेपणा मानणारे सयमानेंच शुद्धि होते असें म्हणतात ते भवात बद्ध झालेले व आपणास कुशल म्हणविणारे म्हणतात की, याच पथात शुद्धि मिळत असल्याचें आम्ही शिकतों, व (४)

८९९. (अशीं व्रतें आचरणारा) तो जर आपल्या शीलव्रता-पासून च्युत झाला तर आपलें कर्तव्य चुकलें म्हणून कंपित होतो. घर सोडून सार्थाच्या (तांड्याच्या) समूहासह प्रवास करणारा माणूस सार्थापासून मार्गे पडला असता (जसा सार्थसमूहात जाण्या-करिता) काकुळतीनें याचना करतो, तसा हा आपली शुद्धि करून घेण्याकरिता काकुळतें याचना करतो (५)

९०० पण सर्व शीलव्रतें व वाईट आणि बरें कर्म सोडून शुद्धीची आणि अशुद्धीची आस्था न बाळगता माणसानें (दृष्टीमुळें प्राप्त होणाऱ्या कल्पित) शांतीचा लाभ न होताही विरक्त होऊन राहावें. (६)

१ टीकाकार 'शान्ति' शब्दाचा अर्थ 'दृष्टि' असाच करतो त्यानें 'कोणतीहि दृष्टि न पकडता' असाच अर्थ दिला आहे. 'निद्देस' ह्या जुन्या अट्ठकथेंतही असाच अर्थ आहे

९०१ तपूपनिस्साय जिगुच्छितं वा । अथ वाऽपि दिट्ठं व सुतं मुतं वा ।
उद्धंसरा सुद्धिमनुत्थुनन्ति । अवीततण्हासे भवाभवेसु ॥७॥
९०२ पत्थयमानस्स हि जप्पितानि । संवेधितं चाऽपि पकप्पितेसु ।
चुतूपपातो इध यस्स नत्थि । स केन वेधेय्य कुहिं व जप्पे ॥ ८ ॥
९०३ यमाहु धम्मं परमं ति एके तमेव हीनं ति पनाहु अञ्ञे ।
सच्चो नु वादो कतमो इमेसं । सब्बे व हीमे कुसला वदाना ॥ ९ ॥
९०४ सकं हि धम्मं परिपुण्णमाहु । अञ्ञस्स धम्मं पन हीनमाहु ।
एवऽपि विग्गय्ह विवादियन्ति । सकं सकं सम्मुतिमाहु सच्चं १०

१ म०–तपुपनिस्साय २–२ सी०–पवेदितं चापि ३–३ रो०–कुहिं च ४ नि०–वियादयन्ति

९०१ तप, जिगुप्सित (एक प्रकारचें तप), दृष्ट, श्रुत, किंवा अनुमित यावर अवलंबून शुद्धि आहे असें ते निरनिराळ्या भवाविषयी मतृष्ण राहून मोठ्या काठरयानें प्रतिपादितात (७)

९०२ याचना करणाऱ्याच्या ठिकाणी व्याकुळतीची भाषा असते, आणि कल्पिलेल्या वस्तूसंबंधें तो कम्प पावतो पण ज्याला च्युति आणि उत्पत्ति राहिली नाहीं, तो कशानें कंप पावणार व कोठून व्याकुळणार ? (८)

९०३ ज्याला कित्येक परमधर्म म्हणतात, त्यालाच दुसरे हीन धर्म म्हणतात हे सर्वच आपणाला कुशल म्हणवतात, तेव्हां त्यांपैकीं कोणाचा वाद खरा ? (९)

९०४ आपला धर्म परिपूर्ण आणि दुसऱ्याचा धर्म हीन असें ते म्हणतात याप्रमाणें वाद करून ते विवाद माजवितात आणि आपापणास संमत असेल तें दृष्टिच सत्य म्हणतात (१०)

९०५ परस्स चे वम्भयितेन हीनो । न कोचि धम्मेसु विसेसि अस्स ।
पुथू हि अञ्ञस्स वदन्ति धम्मं निहीनतो सम्हि दळ्ह वदाना ११

९०६ स-धम्मपूजा च पना तथेव । यथा पससन्ति सकायनानि ।
सब्बे पवादा तथिवा भवेय्यु । सुद्धि हि तेस पच्चत्तमेव ॥ १२ ॥

९०७ न ब्राह्मणस्स परनेय्यमत्थि । धम्मेसु निच्छेय्य समुग्गहीत ।
तस्मा विवादानि उपातिवत्तो । न हि सेट्ठतो पस्सति
धम्ममञ्ञ ॥ १३ ॥

९०८ जानामि पस्सामि तथेव एत । दिट्ठिया एके पच्चेन्ति सुद्धिं ।
अद्दक्खि चे किं हि तुमस्स तेन । अतिसित्वा अञ्ञेन वदन्ति
सुद्धिं ॥१४॥

---

९०५ दुसऱ्यानें केलेल्या निंदेनें जर हीन ठरतो तर कोणत्याही पथाचा माणूस श्रेष्ठ होऊ शकत नाहीं कारण आपल्या पथाचें दृढ समर्थन करणारे भिन्न भिन्न लोक इतरांच्या पथाला हीनच म्हणतात (११)

९०६ आणि जेव्हा ते आपापल्या पथाची स्तुति करतात, तेव्हा ते स्वतःच्या धर्माची पूजाच करतात, आणि मग तीं सर्वच मतें खरीं ठरतील कारण त्यांच्या मतें प्रत्येक पथाची शुद्धि ही आत्मनिष्ठ ( म्हणजे स्व-कपोल-कल्पितच ) आहे. (१२)

९०७. पण ( खऱ्या ) ब्राह्मणाला दुसऱ्याकडून शिकण्यासारखें कांहीं नाहीं, किंवा सर्व गोष्टींचा विचार करून दृढपणें स्वीकारलेलें असें सांप्रदायिक मतही नाहीं म्हणून तो वादविवाद ओलांडून जातो कारण कोणताही धर्मपथ श्रेष्ठ आहे, असें तो समजत नाहीं (१३)

९०८ ‘हें मी जाणतों व पाहतों, हें तसेंच आहे’–अशा दृष्टीनें शुद्धि होते असें कित्येक समजतात पण असें त्यांनी पाहिल्यानें तुम्हास त्याचा फायदा कोणता ? योग्य मार्ग सोडून भलत्याच मार्गानें शुद्धि होते असेंच केवळ ते म्हणतात (१४)

९०९ पस्सं नरो दक्खिति नामरूपं । दिस्वान वा ञस्सति[1] तानिमेव ।
काम बहु पस्सतु अप्पकं वा । न हि तेन सुद्धिं कुसला वदन्ति ॥ १५

९१० निविस्सवादी न हि सुब्बिनायो[2] । पकप्पितं[3] दिट्ठि पुरेक्खरानो ।
यं निस्सितो तत्थ सुभं वदानो । सुद्धिंवदो[4] तत्थ तथद्दसा सो ॥ १६

९११ न ब्राह्मणो कप्पमुपेति संखा । न हि दिट्ठिसारी नऽपि ञाणबन्धु ।
ञत्वा च सो सम्मुतियो पुथुज्जा । उपेक्खति उग्गहणन्तमञ्ञे[5] ॥ १७

---

१ नि०—ञायति. २ सी०, रो०—सुद्धिनायो, सुब्बिनयो. ३ नि०—पकप्पिता. ४ नि०—सुद्धिवदो. ५ म०—उग्गहणन्तिमञ्ञे.

---

९०९. असें पाहणारा मनुष्य नामरूप तेवढेंच पाहील, आणि तें पाहून तेवढ्याचेंच त्याला ज्ञान होईल. ते त्याला अल्प किंवा पुष्कळ खुशाल पाहू द्या. पण तेवढ्यानें शुद्धि होते असें सुज्ञ म्हणत नाहींत. (१५)

९१०. आपण कल्पिलेल्या मताचा पुरस्कार करणाऱ्याला व हट्टानें वाद करणाऱ्याला उपदेशानें वळविता येणें सोपें नाहीं. ज्या मताचा तो आश्रय करतो, त्यांतच कल्याण व शुद्धि आहे असें म्हणतो, कारण तशीच त्याची दृष्टि आहे (१६)

९११. पण (खरा) ब्राह्मण सर्व गोष्टी जाणून विकल्पाच्या मर्यादेंत जात नाहीं. तो दृष्टीला धरून बसत नाहीं, व ज्ञानाचेंहि बंधन होऊं देत नाहीं. तो सामान्य लोकांची मतें जाणतो पण त्यांची उपेक्षा करतो. इतर लोक मात्र तीं स्वीकारतात. (१७)

९१२ विसज्ज गन्थानि मुनीध लोके । विवादजातेसु न वग्गसारी ।
सन्तो असन्तेसु उपेक्खको सो । अनुग्गहो उग्गहण्तेमञ्ञे ॥१८
९१३ पुब्बासवे हित्वा नवे अकुब्ब । न छन्दगू नोऽपि निविस्सवादो ।
स विप्पमुत्तो दिट्ठिगतेहि धीरो । न लिप्पंति लोके अनत्तगरही ॥१९
९१४ स सब्बधम्मेसु विसेनिभूतो । य किं चि दिट्ठंव सुत मुत वा ।
स पन्नभारो मुनि विप्पयुत्तो, न कप्पियो नूपरतो न पत्थियो ति
( भगवा ति ) ॥२०॥

महावियूहसुत्तं निट्ठितं ।

---

१ म०—उग्गहणन्तिमञ्ञे, २ नि०—लिम्पति ३ नि०—अनत्थगरही
४ नि०—विप्पमुत्तो. ५ म०— महा०यूह

---

९१२ मुनि या जगातील ग्रन्थी सोडून देतो व विवादापन्न लोकामध्ये कोणताही पक्ष घेत नाहीं तो अशान्त लोकात शान्त आणि उपेक्षक होतो, आणि दुसरे आपापल्या मताचा आग्रह धरीत असता तो अनाग्रही होतो (१८)

९१३ तो पूर्वीचे आश्रव सोडून नवे जोडीत नाहीं, छंदानुसार जात नाहीं आणि हटवादीही होत नाहीं तो आत्मनिंदा न करणारा सुज्ञ सांप्रदायिक मतापासून मुक्त होतो व या जगात बद्ध होत नाहीं (१९)

९१४ जें काहीं दृष्ट, श्रुत किंवा अनुमित---- (या सर्व गोष्टींवर त्यानें विजय मिळविल्यामुळें) ह्यापैकीं कशाशींही विरोधीभाव न बाळगणारा तो, भार टाकून देऊन विमुक्त झालेला मुनि विकल्प पावत नाहीं, विरत होत नाहीं आणि (कशाचीही) याचना करीत नाहीं, असें भगवान् म्हणाला (२०)

महावियूहसुत्त समाप्त

# ५२

## [ १४. तुवट्टकसुत्तं ]

९१५ पुच्छामि तं आदिच्चबन्धु । विवेकं सन्तिपदं च महेसिं ।
कथं दिस्वा निब्बाति भिक्खु । अनुपादियानो लोकस्मिं किंचि॥१॥

९१६ मूलं पपञ्चसखाया (ति भगवा) । मन्ता अस्मीति सब्बमुपरुन्धे ।
या काचि तण्हा अज्झत्तं । तासं विनया सदा सतो सिक्खे ॥२॥

९१७ यं किंचि धम्ममभिजञ्ञा । अज्झत्तं अथ वाऽपि बहिद्धा ।
न तेन थामं कुब्बेथ । न हि सा निब्बुति सतं वुत्ता ॥३॥

१ नि०—महेसी. २ म० कद्धे. ३ म०— मान.

# ५२

## [ १४. तुवट्टकसुत्त ]

९१५. "विविक्त शान्तिपद कोणतें तें मी आदित्यबन्धु महर्षीला विचारतों या जगात कशावेंहि उपादान न करतां भिक्षु काय पाहून निर्वाण पावतो ?" ( १ )

९१६ प्रपंचाचें मूळ अहंकार— असें भगवान् म्हणाला— त्याचा प्रज्ञेनें समूळ निरोध करावा, आणि सदोदित स्मृतिमान् राहून ज्या काहीं अन्तःकरणात तृष्णा असतील, त्याचा नाश करण्यास शिकावें. ( २ )

९१७. ज्या काहीं आध्यात्मिक किंवा बाह्य गोष्टींचें ज्ञान मिळेल त्यायोगें अहंकार करूं नये. कारण तें सज्जनाचें निर्वाण नव्हे. ( ३ )

९१८ सेय्यो न तेन मञ्ञेय्य । नीचेय्यो अथ वाऽपि सरिक्खो ।
फुट्ठो[1] अनेकरूपेहि । नातुमानं विकप्पयं तिट्ठे ॥४॥
९१९ अज्झत्तमेव उपसमे । नाञ्ञतो भिक्खु सन्तिमेसेय्य ।
अज्झत्तं उपसन्तस्स । नत्थि अत्तं[2] कुतो निरत्तं[3] वा ॥५॥
९२० मज्झे यथा समुद्दस्स । ऊमि नो जायति ठितो होति ।
एवं ठितो अनेजस्स । उस्सदं भिक्खु न करेय्य कुहिं चि ॥६॥
९२१ अकित्तयि विवटचक्खु । सक्खिधम्मं परिस्सयविनयं ।
पटिपदं वदेहि भद्दं ते । पातिमोक्खं अथ वाऽपि समाधिं ॥७॥

१ सी०—पुट्ठो. २ नि०—अत्ता. ३ नि०—निरत्ता.

९१८. त्या ज्ञानानें आपणास इतरांहून श्रेष्ठ, हीन किंवा त्यांच्या समान समजूं नये. अनेक गोष्टींशी संबंध आला असतां त्यांत अहंतेची कल्पनाहि येऊं देऊं नये. (४)

९१९. भिक्षूनें आपल्याच अन्तःकरणांत शान्ति मिळवावी, व बाह्य पदार्थांपासून शान्ति मिळविण्याचें पाहूं नये. जो आपल्या अन्तःकरणांत शान्त होतो, त्याला स्वीकृत असें कांहींच नाहीं मग निकृ-कृतें कोठून असणार? (५)

९२०. समुद्राच्या मुळाशीं जशी लाट उठत नाहीं, आणि त्यामुळें स्थिर राहतां येतें, त्याप्रमाणें भिक्षूनें स्थिर आणि अप्रकम्प्य व्हावें, आणि कसल्याहि उत्सद करूं नये. (६)

९२१. (त्यां) विवृतचक्षूनें (बुद्धानें) विघ्नविनाशक प्रत्यक्ष-फलद असा धर्म मला समजावून सांगितला.—त्या तुझें कल्याण होवो—आता मला त्या धर्माचा मार्ग— म्हणजे प्रातिमोक्ष किंवा समाधि— सांग. (७)

१ गाथा ७८७ वरील टीप पहा.

९२२ चक्खूहि नेव लोल्स्स । गामकथाय आवरये सोत ।
रसे च नानुगिज्झेय्य । न च ममायेथ किञ्चि लोकस्मि॥८॥
९२३ फस्सेन यदा फुट्ठस्स । परिदेव भिक्खु न करेय्य कुहिं चि ।
भव च नाभिजप्पेय्य । भेरवेसु च न सपवेधेय्य ॥९॥
९२४ अन्नानमथो पानान । खादनीयानमथोऽपि वत्थान ।
लद्धा न सन्निधिं कयिरा । न च परित्तसे तानि अलभमानो १०॥
९२५ झायी न पादलोलस्स । विरमे कुकुच्चा नप्पमज्जेय्य ।
अथ आसनेसु सयनेसु । अप्पसद्देसु भिक्खु विहरेय्य॥११॥

१ सी०—कुक्कुच.

९२२. डोळ्यानी चचळ नसावें, गावातील गप्पा-गोष्टींपासून कानाचें रक्षण करावें, (जिभेच्या) गोडीत लुब्ध होऊ नये, आणि जगात कशाचेंहि ममत्व बाळगू नये. (८)

९२३. (दु खद) स्पर्शाचा सयोग झाला असता भिक्षूनें मुळींच शोक करू नये. भवाची आकाक्षा बाळगू नये आणि भेसूर देखावा पाहून घाबरू नये. (९)

९२४ अन्न, पान, खाद्य आणि वस्त्र हे पदार्थ मिळाले असता त्याचा संग्रह करू नये आणि ते मिळाले नसता त्रास मानू नये (१०)

९२५. भिक्षूनें ध्यानरत व्हावें, पायानीं चचल होऊ नये, सर्व प्रकारचें कौकृत्य[1] सोडून द्यावें. बेसावध राहू नये आणि जेथें गडबड कमी असेल अशा बसण्या-निजण्याच्या जागीं रहावें. (११)

१ मानसिक विकृति दाखविणारे शारीरिक हातापायाचे चाळे, किंवा चागल्या गोष्टीला वाईट व वाइटाला चागलें म्हणणें, किंवा करण्याजोगी गोष्ट केली नाहीं म्हणून किंवा न करण्याजोगी गोष्ट केली म्हणून मनाला होणारी टोचणी. बौद्ध-संस्कृत ग्रंथांतून 'कुकृत्या'बद्दल हाच शब्द योजलेला आहे.

९२६ निद्दं न बहुलीकरेय्य । जागरियं भजेय्य आतापी ।
तन्दिं मायं हस्सं खिड्डं । मेथुनं विप्पजहे सविभूसं ॥१२॥

९२७ आथब्बणं सुपिनं लक्खणं । नो विदहे अथो पि नक्खत्तं ।
विरुतं च गब्भकरणं । तिकिच्छं मामको न सेवेय्य॥१३॥

९२८ निन्दाय नप्पवेधेय्य । न उण्णमेय्य पससितो भिक्खु ।
लोभं सह मच्छरियेन । कोधं पेसुणियं च पनुदेय्य॥१४॥

९२९ कयविक्कये न तिट्ठेय्य । उपवादं भिक्खु न करेय्य कुहिं चि ।
गामे च नाभिसज्जेय्य । लाभकम्या जनं न लपयेय्य॥१५॥

१ म०—बहुलं न करेय्य २ नि०—विरुद

९२६ त्यानें निद्रा वाढवू नये, उत्साही होऊन जागृति वाढवावी आणि तन्द्री, माया, हास्य, क्रीडा, स्त्रीसंग आणि भूषणें यांचा त्याग करावा (१२)

९२७ माझ्या श्रावकानें अथर्वणमंत्र, स्वप्नफल, स्त्रीपुरुषलक्षणें आणि नक्षत्रफल सांगणें या गोष्टींत पडू नये तसेंच मृगपक्ष्यांच्या शब्दांचीं फळें सांगणें, गर्भधारणेचा मंत्र आणि चिकित्सा यांच्याही (भानगडींत) पडू नये (१३)

९२८ भिक्षूनें आपली निंदा ऐकून चलचित्त होऊं नये, आणि स्तुति ऐकून गर्व मानूं नये त्यानें लोभ, मात्सर्य, क्रोध आणि चहाडी यांचा त्याग करावा (१४)

९२९ भिक्षूनें क्रयविक्रय करूं नये, ठपका येईल असें कोणतेंही कृत्य करूं नये, गावांतील लोकांशीं सलगी करूं नये, आणि आपल्या लाभास्तव लोकांबरोबर बडबड करूं नये (१५)

९३० न च कत्थिता सिया भिक्खु । न च वाच पयुत भासेय्य ।
　　पागब्भिय न सिक्खेय्य । कथ विग्गाहिक न कथयेय्य॥१६॥
९३१ मोसवज्जे न निय्येथ । सम्पजानो सठानि न कयिरा ।
　　अथ जीवितेन पञ्ञाय । सीलब्बतेन नाञ्ञमतिमञ्ञे॥१७॥
९३२ सुत्वा रुसितो बहु वाच । समणान पुथुवचनान ।[२]
　　फरुसेन ते न पतिवज्जा । न हि सन्तो पटिसेनिकरोन्ति॥१८॥
९३३ एत च धम्ममञ्ञाय । विचिन भिक्खु सदा सतो सिक्खे ।
　　सन्ती ति निब्बुतिं ञत्वा । सासने गोतमस्स नप्पमज्जेय्य॥१९॥

१ म०–पयुत्त २–२ नि०–रूसितो बहुवाच. ३ नि०–पटिसेनि°.

९३० भिक्षूनें आत्मश्लाघायुक्त/ बडबड करणारा होऊ नये, (दान-) सूचक वाक्य बोलू नये, प्रगल्भता करू नये, आणि वादविवादात पडू नये (१६)

९३१. त्यानें असत्य भाषण करू नये, लोक ठकविले जातील असें बुद्धिपूर्वक आचरण करू नये, आणि आपल्या सदाचारानें, प्रज्ञेनें, शीलानें आणि व्रतानें दुसऱ्याची अवहेलना करू नये (१७)

९३२ इतर श्रमण याला निरनिराळ्या वचनानीं (राग आणू पाहत असता) यानें यांचें भाषण ऐकून रुष्ट होऊन कठोर वचनानें त्याचा प्रतिकार करू नये का कीं, सन्तजन प्रतिकारबुद्धि बाळगीत नसतात. (१८)

९३३. भिक्षूनें हा धर्म जाणून व स्मृतिमान् होऊन तो सदोदित शिकावा. शांति हेंच निर्वाण असें जाणावें व त्यानें गोतमाच्या पथात बेसावधपणें वागू नये. (१९)

९३४ अभिभू हि सो अनभिभूतो । सक्खिधम्म अनीतिहमदस्सी[1] ।
तस्मा हि तस्स भगवतो । सासने अप्पमत्तो सदा नमस्समनु-
सिक्खे ति ( भगवा ति )॥२०॥

तुवट्टकसुत्त निट्ठित ।

---

१ नि०—°अहति

---

९३४ तो ( भगवान् ) जयशाली पण अजिंक्य, आणि परपरागत नसून ( अनीतिहं ) प्रत्यक्ष फल देणारा असा धर्म जाणणारा, म्हणून त्या भगवताला नमस्कार करून त्याच्या पथात सदोदित सावधपणें वागण्यास शिकावें (२०)

तुवट्टकसुत्त समाप्त

---

[1] ' अन् + इति + ह '—अशी ह्या शब्दाची व्युत्पत्ती घेतली पाहिजे याच्या उलट ' इतिहीतिह ( इति + ह + इति + ह ) ' असा शब्द गाथा १०८४, ११३५ मध्यें आला आहे ' अनीतिह ' ह्या शब्दातील ' नी ' केवळ छदाकरिता दीर्घ केलेला दिसतो पुढें गाथा १०५३ व १०६६ पहा ' प्रत्यक्ष ', ' आत्मप्रत्यक्ष ' असा अर्थ टीकाकारानें दिला आहे

## ५३

### [ १५. अत्तदण्डसुत्तं ]

९३५ अत्तदण्डा भयं जातं जनं पस्सथ मेधकं।
संवेगं कित्तयिस्सामि यथा संविजितं मया॥१॥

९३६ फन्दमानं पजं दिस्वा मच्छे अप्पोदके यथा।
अञ्ञमञ्ञेहि व्यारुद्धे दिस्वा मं भयमाविसि॥२॥

९३७ समन्तमसरो लोको दिसा सब्बा समेरिता।
इच्छं भवनमत्तनो नाद्दसासिं अनोसितं॥३॥

१ नि० म०—मेधगं २ सी०—संविदितं ३ नि०, म०—समन्तमसारो
४ नि०—नाद्दसामि

## ५३

### [ १५. अत्तदण्डसुत्त ]

९३५ हातीं धारण केलेल्या दण्डापासून भय उत्पन्न झालें आहे. परस्परांशीं कलह करणाऱ्या लोकांकडे पहा ज्या योगें मला संवेग प्राप्त झाला तो संवेग मी (आता) सांगतों (१)

९३६ थोड्या पाण्यात तडफडणाऱ्या माशांप्रमाणें परस्परांशीं विरोध करून तडफड करणाऱ्या लोकांना पाहून माझ्या अंतःकरणात भय शिरलें (२)

९३७ हें सभोंवतीचें जग असार आहे व सर्व दिशा कंपित होत आहेत, (असें मला वाटू लागलें) यात माझ्यासाठीं निवाऱ्याची जागा शोधीत असता ती मला कोठेंच मोकळी आढळेना (३)

१ पुढील अर्थ टीकेला अनुसरून दिलेला आहे—'स्वतःच्या दुश्चरितामुळें भय उत्पन्न झालें आहे'

९३८ ओसाने त्वेव व्यारुद्धे दिस्वा मे अरति अहु ।
अथेत्थ सल्लमद्दक्खिं दुद्दस हदयनिस्सितं॥४॥

९३९ येन सल्लेन ओतिण्णो दिसा सब्बा विधावति ।
तमेव सल्लं अब्बुय्ह न धावति निसीदति ॥ ५ ॥

९४० तत्थ सिक्खानुगीयन्ति (यानि लोके गधितानि)
न तेसु पसुतो सिया ।
निब्बिज्झ सब्बसो कामे सिक्खे निब्बाणमत्तनो ॥ ६ ॥

९४१ सच्चो सिया अप्पगब्भो अमायो रित्तपेसुणो ।
अक्कोधनो लोभपाप वेविच्छं वितरे मुनि ॥ ७ ॥

१ नि०—हदय सित २ नि०—न सीदती.

९३८ शेवटपर्यंत (मरणाच्या दारीं असतानाही) हे लोक भांडत आहेत, हें पाहून मला जगाचा अत्यंत कंटाळा आला, तेव्हा आपल्याच हृदयातील दुर्दर्श असें शल्य मला दिसलें—(४)

९३९ ज्या शल्यानें विद्ध झाला असता माणूस सर्व दिशाना धावपळ करतो, पण तें बाहेर काढलें असता तो धावपळ न करता एका जागीं स्थिर होतो (५)

९४० त्यासाठीं शिकवण (शिक्षा) सांगितली जाते—जगात ज्या ग्रन्थी आहेत त्यात बद्ध होऊं नये कामोपभोगापासून सर्वथा विरक्त होऊन आपणाला निर्वाण कसें मिळेल हें शिकावें (६)

९४१ मुनीनें सत्यप्रिय, अप्रगल्भ, अमायावी आणि चाहाडी पासून मुक्त व्हावें, आणि अक्रोधन होऊन लोभ, पाप आणि विविच्छा[1] (हावरेपणा) तरून जावें (७)

१ टीकाकार 'मात्सर्य' असा अर्थ देतो.

९४२ निद्दं तन्दिं सहे थीनं पमादेन न संवसे ।
अतिमाने न तिट्ठेय्य निब्बाणमनसो नरो ॥ ८ ॥

९४३ मोसवज्जे न निय्येथ रूपे स्नेहं न कुब्बये ।
मानं च परिजानेय्य साहसा विरतो चरे ॥ ९ ॥

९४४ पुराणं नाभिनन्देय्य नवे खन्तिं[1] न कुब्बये ।
हीयमाने[2] न सोचेय्य आकासं न सितो सिया ॥ १० ॥

९४५ गेधं ब्रूमि महोघो ति आजवं[3] ब्रूमि जप्पनं ।
आरम्मणं पकप्पनं कामपङ्को दुरच्चयो ॥ ११ ॥

१ नि०—खन्तिमकुब्बये. २ नि०—हिय्यमाने. ३ नि०—आचमं.

९४२ निर्वाणाभिरत माणसानें निद्रा, तन्द्री आणि अनुत्साह यांजवर जय मिळवावा, बेसावधपणें राहू नये आणि अतिमान धरू नये. (८)

९४३. त्यानें खोटेपणानें वागू नये, रूपाचा स्नेह धरू नये, अहंकार जाणून सोडून द्यावा व साहसापासून विरत होऊन रहावें. (९)

९४४. त्यानें अतीत वस्तूबद्दल आनंद मानू नये, नव्या वस्तूंत आवड उत्पन्न करू नये, व तिचा नाश होत असतां खेद करू नये; आणि *आकाशासारख्या[1] (शून्य पदार्थावर) अवलंबून राहू नये* (१०)

९४५ (या संसारांत) लुब्धता हा महौघ, याञ्चा म्हणजे त्यांत वाहून जाणें (आजव), विकल्प हें अवलम्बन आणि कामसुख हा दुस्तर चिखल असें मी म्हणतों. (११)

[1] टीकाकार ' तृष्णा ' असा अर्थ करतो, व पुढील गाथेंतील गेध, महोघ, आजव, जप्पन वगैरे शब्द तृष्णेचेच पर्यायवाचक असें म्हणतो.

९४६ सच्चा अवोक्कम्म मुनि थले तिट्ठति ब्राह्मणो।
सब्बं सो पटिनिस्सज्ज स वे[1] सन्तो'ति वुच्चति ॥ १२ ॥
९४७ स वे[2] विद्वा स वेदगु ञत्वा धम्मं अनिस्सितो।
सम्मा सो लोके इरियानो न पिहेतीध कस्सचि ॥ १३ ॥
९४८ यो ध कामे अच्चतरि सङ्गं लोके दुरच्चयं।
न सो सोचति नाज्झेति छिन्नसोतो अबन्धनो ॥ १४ ॥
९४९ यं पुब्बे तं विसोसेहि पच्छा ते माऽहु किञ्चनं।
मज्झे चे[2] नो गहेस्ससि उपसन्तो चरिस्ससि ॥ १५ ॥

---

१ नि०-अवोकम २ नि०-चे.

---

९४६. (त्यातून) तो मुनि--ब्राह्मण--सत्याला धरून आणि बाकी सर्व सोडून (निर्वाण-)तीरावर येतो. तोच शान्त म्हटला जातो. (१२)

९४७. जो धर्म जाणून अनाश्रित होतो, तोच खरा विद्वान् व तोच वेदपारग होय तो जगात सम्यक्-रीतीनें वागून कशाचीही स्पृहा करीत नाहीं.(१३)

९४८ या जगात जो दुस्तर सङ्ग आणि कामोपभोग अतिक्रमून गेला तो, प्रवाहाच्या पार गेलेला, व बन्धनापासून मुक्त झालेला, शोक करीत नाहीं आणि लुब्ध होत नाहीं. (१४)

९४९. जें जुनें तें शोषून टाक, भविष्यकाळासाठीं काहीं राहू देऊं नकोस. आणि जर तू वर्तमानकाळाबाबतींही पकडून बसणार नाहींस तर उपशांत होऊन फिरत राहशील. (१५)

९५० सब्बसो नामरूपस्मिं यस्स नत्थि ममायितं ।
असता च न सोचति स वे लोके न जिय्यति ॥ १६ ॥

९५१ यस्स नत्थि इदं मे ति परेसं वाऽपि किञ्चनं ।
ममत्तं सो असविन्दं नत्थि मे ति न सोचति ॥ १७ ॥

९५२ अनिट्ठुरी अननुगिद्धो अनेजो सब्बधीसमो ।
तमानिसंसं पब्रूमि पुच्छितो अविकम्पिनं ॥ १८ ॥

९५३ अनेजस्स विजानतो नत्थि काचि निसङ्खिति ।
विरतो सो वियारब्भा खेमं पस्सति सब्बधि ॥ १९ ॥

१ नि०—चे.

९५०. नामरूपामध्यें ज्याला सर्वथा ममत्व नाहीं, आणि जो नसलेल्या वस्तूबद्दल शोक करीत नाहीं, तोच या लोकीं जीर्ण होत नाहीं (१६)

९५१ ज्याला कोणत्याही वस्तूसंबंधीं 'ही माझी' किंवा 'ही इतराची' असें वाटत नाहीं व ज्याला ममत्वाची वेदना नाहीं, तो 'ही माझी वस्तु नष्ट झाली' असें म्हणून शोक करीत नाहीं. (१७)

९५२. मला जर कोणी 'अविकंपित माणूस कसा असतो' असा प्रश्न करील, तर मी म्हणेन कीं, जो अनिष्ठुर, अलुब्ध, अकम्प्य आणि सर्वत्र समान-भावानें वागणारा—अशा ( चारही ) गुणांनीं युक्त तो (१८)

९५३ निर्भय आणि जाणत्या माणसाला कोणतीच वासना राहत नाहीं. तो कर्मा—( निसङ्खिति)पासून विरत होतो, व सर्वत्र क्षेम पाहतो (१९)

९५४ न समेसु न ओमेसु न उस्सेसु वदते मुनि ।
सन्तो सो वीतमच्छरो नादेति न निरस्सती ति (भगवा ति) २०
अत्तदण्डसुत्तं निट्ठितं ।

---

## ५४
### [ १६. सारिपुत्तसुत्तं ]

९५५ न मे दिट्ठो इतो पुब्बे ( इच्चायस्मा सारिपुत्तो )
नस्सुतो उद कस्सचि ।
एवं वग्गुवदो सत्था तुसिता गणिमागतो ॥ १ ॥
९५६ सदेवकस्स लोकस्स यथा दिस्सति चक्खुमा ।
सब्बं तमं विनोदेत्वा एको व रतिमज्झगा ॥ २ ॥

---

१ नि०–न सुतो

---

९५४. तो मुनि आपली समानात, हीनात किंवा उत्तमात गणना करून वाद करीत नाहीं. वीतमत्सर व शांत असा तो आदानहि करीत नाहीं व त्यागही करीत नाहीं (असें भगवान् म्हणाला). (२०)

अत्तदण्डसुत्त समाप्त

---

## ५४
### [ १६. सारिपुत्तसुत्त ]

९५५ असा गोड बोलणारा, तुषित देवलोकाहून इहलोकीं आलेला व गणाचा पुढारी (गुरु)– असें आयुष्मान् शारिपुत्र म्हणाला– मीं यापूर्वी पाहिला नाहीं, किंवा कोणाकडून ऐकला नाहीं. (१)

९५६. सर्व तमाचा नाश करून एकचर्येंत रत झालेला असा हा सदेवक जगाला एकच चक्षुष्मान् दिसत आहे. (२)

९५७ न बुद्ध असित तादिं अकुह गणिमागत ।
बहुन्नमिध बद्धान अत्थि पञ्हेन आगम ॥ ३ ॥
९५८ भिक्खुनो विजिगुच्छतो भजतो रित्तमासन ।
रुक्खमूलं सुसान वा पब्बतान गुहासु वा ॥ ४ ॥
९५९ उच्चावचेसु सयनेसु कीवन्तो[1] तत्थ भेरवा ।
येहि भिक्खु न वेधेय्य निग्घोसे सयनासने ॥ ५ ॥
९६० कति परिस्सया लोके गच्छतो अगत[2] दिस ।
ये भिक्खु अभिसम्भवे पन्तम्हि सयनासने ॥ ६ ॥
९६१ क्यास्स व्यप्पथयो अस्सु क्यास्सस्सु इध गोचरा ।
कानि सीलब्बतानस्सु पहितत्तस्स भिक्खुनो ॥ ७ ॥

१ नि०—कीवन्ता २ नि०—अमत

९५७ अनाश्रित व अदाम्भिक अशा या बुद्धपदाला पावलेल्या गणाच्या पुढाऱ्यापाशीं मी अनेक बद्ध माणसांच्या (हितोदेशानें) प्रश्न विचारण्यासाठीं आलों आहें (३)

९५८ ससाराला उबगलेल्या व वाडाखालीं, स्मशानात, किंवा पर्वताच्या गुहामध्ये एकान्तवास सेवन करणाऱ्या भिक्षूला, (४)

९५९ तशा या उच्चनीच जागीं भयदायक वस्तू कोणत्या कीं, ज्यापासून तशा नि शब्द स्थळीं भिक्षूनें घाबरता कामा नये ? (५)

९६० अमृत दिशेला जाणाऱ्याला जगात विघ्नें कोणतीं कीं, जीं भिक्षूनें अरण्याच्या सामेवर राहत असता सहन केलीं पाहिजेत ? (६)

९६१ त्या दृढबुद्धि, भिक्षूची वाणी कशी असावी ? त्याचें राहणें-सवरणें कसें असावें ? आणि त्याचें शील आणि व्रत कसें असावें ? (७)

९६२ क सो सिक्ख समादाय एकोदि' निपको सतो।
कम्मारो रजतस्सेव निद्धमे मलमत्तनो ॥ ८ ॥
९६३ विजिगुच्छमानस्स यदिदं फासु ( सारिपुत्ता ति भगवा )।
सयनं रित्तासनं सेवतो चे।
सम्बोधिकामस्स यथानुधम्मं। तं ते पवक्खामि यथा पजानं ॥९॥
९६४ पञ्चन्नं धीरो भयानं न भाये। भिक्खु सतो सपरियन्तचारी।
डंसाधिपातानं सिरिंसपानं। मनुस्सफस्सानं चतुप्पदानं ॥१०॥
९६५ परधम्मिकानं न सन्तसेय्य। दिस्वाऽपि तेसं बहुभेरवानि।
अथापरानि अभिसम्भवेय्य। परिस्सयानि कुसलानुएसी ॥११॥

१ म०—एकोधि. २ नि०—पञ्चन्न ३ नि०—सरीसपान

९६२ सोनार जसा रुपें आगीन घालून, त्यातील हीणकस काढून टाकतो, त्याप्रमाणें समाहित, हुशार आणि स्मृतिमान् भिक्षूनें कोणती शिक्षणपद्धति ग्रहण करून आपल्या मनाचा मळ जाळून टाकावा? (८)

९६३ संसाराला उबगलेल्या—हे शारिपुत्रा, असें भगवान् म्हणाला—व एकांतवास सेवन करणाऱ्या संबोधिपरायण अशा तुला, जें सुखकर तें, मी जसें जाणतों तसें, धर्माला अनुसरून, सांगतों (९)

९६४. एकान्तवासांत राहणाऱ्या स्मृतिमान् सुज्ञ भिक्षूनें पांच भयांना भिऊं नये —डासांच्या चाव्यांना, सर्पांना, मनुष्यांच्या त्रासाला, चतुष्पादांना, (१०)

९६५. आणि परधार्मिकांची पुष्कळ भेसूर कृत्यें पाहून देखील त्यांना घाबरू नये आणि त्या कुशलान्वेषी भिक्षूनें दुसरींही विघ्नें सहन करावीत. (११)

९६६ आतकफस्सेन खुदाय फुट्ठो । सीत अच्चुण्हं[1] अधिवासयेय्य ।
सो तेहि फुट्ठो बहुधा अनोको । विरिय परक्कम्मं[2] दळ्हं करेय्य १२॥
९६७ थेय्य न करेय्य[3] न मुसा भणेय्य । मेत्ताय फस्से तसथावरानि ।
यदाविलत्त मनसो विजञ्ञा । कण्हस्स पक्खो ति विनोदयेय्य १३
९६८ कोधातिमानस्स वस न गच्छे । मूलऽपि तेस पलिखञ्ञ तिट्ठे ।
अथप्पिय वा पन अप्पिय वा । अद्धा भवन्तो अभिसम्भवेय्य ॥१४॥
९६९ पञ्ञ पुरक्खत्वा[4] कल्याणपीति । विक्खम्भये तानि परिस्सयानि ।
अरतिं सहेथ सयनम्हि पन्ते । चतुरो सहेय्य परिदेवधम्मे ॥ १५ ॥

१ नि०—अतुण्ह  २ नि०—परक्कम  ३ नि०—कारे  ४ नि०—पुरक्खित्वा

९६६ रोगानें आणि भुकेनें ग्रस्त झाला असता (तो उपद्रव) व शीत आणि अत्युष्ण हीं त्यानें सहन करावींत त्या विघ्नानीं अनेक रीतींनीं त्रास दिला तरी, गृहरहित राहून, त्यानें आपला उत्साह पराक्रम दृढ करावा (१२)

९६७ त्यानें चोरी करू नये, खोटें बोलू नये, स्थिर आणि चर प्राण्यावर मैत्रीची भावना करावी, आणि मनाचा कलुषितपणा हा माराचा (कृष्णाचा) पक्षपाती असें जाणून त्याचा नाश करावा (१३)

९६८. त्यानें क्रोधाला आणि अतिमानाला वश होऊ नये, त्यांचीं मुळें देखील खणून काढावीत, आणि मग त्या वृद्धिंगत होऊ पाहणाऱ्याला प्रिय अथवा अप्रिय वस्तूवर खात्रीनें जय मिळविता येईल (१४)

९६९. कल्याणप्रिय मनुष्यानें प्रज्ञेचा पुरस्कार करून तीं विघ्नें सहन करावींत, एकान्तवासस्थळीं असंतोष वाटला असता तोही सहन करावा, आणि चार शोकदायक गोष्टी सहन कराव्यात–(१५)

९७० किंसु असिस्सामि[1] कुव वा असिस्सं[2]। दुक्खं वत सेत्थ[3] कुवज्ज सेस्सं[4]।
एते वितक्के परिदेवनेय्ये। विनयेथ सेखो अनिकेतसारी[5]॥ १६ ॥

९७१ अन्नं च लद्धा वसनं च काले। मत्तं सो[6] जञ्ञा इध तोसनत्थं।
सो तेसु गुत्तो यतचारि[7] गामे। रुसितोऽपि[8] वाचं फरुसं न वज्जा॥ १७

९७२ ओक्खित्तचक्खु न च पादलोलो। झानानुयुत्तो बहुजागरस्स।
उपेक्खमारब्भ समाहितत्तो। तक्कासयं कुक्कुच्चियूपछिन्दे[9] ॥ १८॥

१ नि०—असिस्सं. २ नि०—कुथ वा. ३–४ नि०—सेत्थ कज्ज सेय्य ५ नि०—अनिकेतचारी. ६ नि०—सो. ७ नि०—यतचारी. ८ नि०—दूसितोऽपि. ९ नि०—कुक्कुच्च चूपछिन्दे.

९७० (त्या ह्या–) ‘मी आज काय खाईन, अथवा कोठें जेवेन, रात्रीं निजण्याचे बाबतींत मला फार त्रास झाला, (तेव्हा) आज मी कोठें निजावें ?’[1] अनागारिक भावानें राहणाऱ्या शैक्ष्यानें (सेखानें) या (चार) दुःखकारक वितर्कांचा नाश करावा (१६)

९७१ योग्य वेळीं अन्न आणि वस्त्र मिळालें असता, आपला संतोष रहावा म्हणून त्या पदार्थांच्या सेवनांत त्यानें प्रमाण जाणावें. त्या पदार्थांपासून मनाचें रक्षण करणाऱ्या व गावांत संयमानें वागणाऱ्या त्या भिक्षूनें (इतरांनी राग येण्याजोगें कृत्य केलें असताही) रुष्ट होऊन कठोर वचन बोलू नये (१७)

९७२ त्यानें आपली दृष्टि पायाजवळ ठेवावी, पायांनीं चंचल होऊं नये, ध्यानरत व्हावें, (व) रात्रीचा बराच काळ जागृतावस्थेंत घालवावा, उपेक्षेचा अवलंब करून चित्ताची एकाग्रता मिळवावी, व तर्क आणि कौकृत्य यांचा त्याग करावा (१८)

१. ९२८ व्या गाथेवरील टीप पहा.

९७३ चुदितो वचीहि सतिमाऽभिनन्दे । सब्रह्मचारीसु खिलं पभिन्दे ।
वाचं पमुञ्चे कुसलं नातिवेलं । जनवादधम्माय न चेतयेय्य १९
९७४ अथापरं पञ्च रजानि लोके । येसं सतीमा विनयाय सिक्खे ।
रूपेसु सद्देसु अथो रसेसु । गन्धेसु फस्सेसु सहेथ राग ॥ २० ॥
९७५ एतेसु धम्मेसु विनेय्य छन्दं । भिक्खु सतीमा सुविमुत्तचित्तो ।
कालेन सो सम्मा धम्मं परिवीमंसमानो । एकोदिभूतो विहने तमं
सो ति (भगवा ति) ॥ २१ ॥

सारिपुत्तसुत्तं निट्ठितं ।

अट्ठकवग्गो चतुत्थो ।

१ अ०—थरपञ्हसुत्त ति पि

९७३. त्या स्मृतिमन्तानें आपले दोष दाखवून देणाराचें अभिनंदन करावें, सब्रह्मचाऱ्यांविषयीं कठोरता बाळगू नये, प्रसंगानुसार योग्य असलेलेच शब्द बोलावेत, व लोकांच्या वादविवादांत शिरण्याची इच्छा धरू नये. (१९)

९७४ आणि तदनंतर जे जगांत पांच प्रकारचे रज आहेत, त्यांचा नाश करण्यास स्मृतिमन्तानें शिकावें (म्हणजे) रूप, शब्द, रस, गन्ध, आणि स्पर्श यांचा लोभ निकावा (२०)

९७५. या पदार्थांचा छंद सोडून तो स्मृतिमान्, सुविमुक्तचित्त, वेळींच सद्धर्माचें चिन्तन करणारा, व एकाग्रता पावलेला भिक्षु अन्धकाराचा नाश करण्यास समर्थ होईल (असें भगवान् म्हणाला) (२१)

सारिपुत्तसुत्त समाप्त

अट्ठकवग्ग चौथा

तस्सुद्दानं—
काम गुहट्ठं-दुट्ठा च सुद्धट्ठं-परमा-जरा।
मेत्तेय्यो च पसूरो च मागन्दि पुराभेदन॥
कलह द्वे च ब्यूहानि पुनरेव तुवट्टक।
अत्तदण्डवरसुत्त थेरपञ्हेन सोळस।
तानि एतानि सुत्तानि सब्बानट्ठकवग्गिकानि॥

# [ ५. पारायणवग्गो ]

५५

[ १. वत्थुगाथा ]

९७६ कोसलान पुरा रम्मा अगमा दक्खिणापथं।
आकिञ्चञ्ञं पत्थयानो ब्राह्मणो मन्तपारगू॥ १॥

१ रो०—गुह. २ रो०—सुद्ध च. ३ सी०—अत्तदण्ड थेरसुत्त.

याची अनुक्रमणिका—काम, गुहट्ठ, दुट्ठठ, सुद्धट्ठ, परमट्ठ, जरा, मेत्तेय्य, पसूर, मागन्दिय, पुराभेद, कलहविवाद, चूळवियूह, महावियूह, तुवट्टक, अत्तदण्ड, आणि सारिपुत्त हीं अट्ठकवग्गातील सुत्तें जाणावीत.

# [ पारायणवग्ग, पांचवा ]

५५

[ १. वत्थुगाथा ]

९७६. अकिंचनपणाची इच्छा करणारा (बावरि नांवाचा) मंत्रपारग ब्राह्मण कोसलाच्या रम्य पुराहून (श्रावस्तीहून) दक्षिणापथाला गेला. (१)

९७७ सो अस्सकस्स विसये मूळ्हकस्स समासने ।
वसि गोधावरीकूले उञ्छेन च फलेन च ॥ २ ॥

९७८ तस्सेव उपनिस्साय गामो च विपुलो अहु ।
ततो जातेन आयेन महायञ्ञ अकप्पयि ॥ ३ ॥

९७९ महायञ्ञ यजित्वान पुन पाविसि अस्सम । ३ ।
तस्मिं पतिपविट्ठम्हि अञ्ञो आगञ्छि ब्राह्मणो ॥ ४ ॥

९८० उग्घट्टपादो तसितो पङ्कदन्तो रजस्सिरो ।
सो च न उपसकम्म सतानि पञ्च याचति ॥ ५ ॥

१ रो०, सी०—अळकस्स. २ रो०—वसी. ३ म०—आगच्छि.

९७७. तेथें अस्सक आणि मूळ्क या दोन राजाच्या सरहद्दी-जवळ गोदावरीतीरीं तो उञ्छवृत्तीनें आणि फलमूलादिकानीं आपली उपजीविका करून राहिला. (२)

९७८. त्याच्या आजूबाजूला एक मोठा गाव वसला. त्यातून त्याला जें मिळालें तें घेऊन त्यानें एक मोठा यज्ञ केला. (३)

९७९. मोठा यज्ञ आटोपून पुनः तो आश्रमात गेला. तो आश्रमात गेल्याबरोबर तेथें दुसरा एक ब्राह्मण आला. (४)

९८०. त्याच्या पायाला घट्टे पडले होते, दात मलिन झाले होते, डोकें धुळीनें भरलें होते व तो तृषित झाला होता. तो बावरीजवळ येऊन पाचशें ( कार्षापण ) मागू लागला. (५)

१. येथें अट्ठकथेला अनुसरून अर्थ दिला आहे. पण मूळकाच्या सरहद्दीवर आणि अस्सकाच्या हद्दींत, असाही अर्थ करता येण्यासारखा आहे.

९८१ तमेन बावरि दिस्वा आसनेन निमन्तयि ।
सुखं च कुसलं पुच्छि इदं वचनमब्रवि ॥ ६ ॥
९८२ यं खो[1] मम[2] देय्यधम्मं सब्बं विस्सज्जितं मया ।
अनुजानाहि मे ब्रह्मे नत्थि पञ्च सतानि मे ॥ ७ ॥
९८३ सचे मे याचमानस्स भवं नानुपदस्सति[3] ।
सत्तमे दिवसे तुय्हं मुद्धा फलतु सत्तधा ॥ ८ ॥
९८४ अभिसङ्खरित्वा[4] कुहको भेरवं सो अकित्तयि[5] ।
तस्स तं वचनं सुत्वा बावरि दुक्खितो अहु[6] ॥ ९ ॥
९८५ उस्सुस्सति अनाहारो सोकसल्लसमप्पितो ।
अथोऽपि एवं चित्तस्स झाने न रमती मनो ॥ १० ॥

१ सी०–अब्रुवि २–२ म०–चे मम ३ म०–दिस्सति, °देस्सति
४ म०–°सङ्खारित्वा ५ म०–पकित्तयि ६ म०–अहू

९८१ त्याला पाहून बावरीनें आसनावर बसावयास सांगितलें, व त्याचें सुख आणि कुशल विचारलें, आणि तो म्हणाला (६)

९८२ जें काही मजपाशीं देण्याजोगें होतें तें सर्व मी देऊन टाकलें आहे हे ब्राह्मणा, मजपाशीं आता पाचशें (कार्षापण) नाहींत हें माझें म्हणणें (विश्वास ठेवून) तू मान्य कर (७)

९८३ (ब्राह्मण— )"याचना केली असता जर भवान् (तू) मला देणार नाहींस, तर सातव्या दिवशीं तुझ्या डोक्याचे सात तुकडे होतील" (८)

९८४ आपलें सामान गोळा करून[1] त्या दांभिकानें असा भयंकर शाप दिला. त्याचें तें वचन ऐकून बावरि दु:खित झाला (९)

९८५ तो शोकशल्यानें विद्ध होऊन उपवासानीं वाळत चालला आणि त्या विचारानें त्याचें चित्त ध्यानसमाधानाकडे लागेना (१०)

१ 'मन्त्र तयार करून' असा अर्थ टीकाकारानें दिला आहे

९८६ उत्रस्त दुक्खित दिस्वा देवता अत्थकामिनी ।
बावरिं उपसकम्म इद वचनमब्रवी ॥ ११ ॥

९८७ न सो मुद्ध पजानाति कुहको सो धनत्थिको ।
मुद्धनि मुद्धपाते वा आण तस्स न विज्जति ॥ १२ ॥

९८८ भोती चरहि जानानि त मे अक्खाहि पुच्छिता ।
मुद्ध मुद्धाधिपात च त सुणोमि वच तव ॥ १३ ॥

९८९ अहऽपेत न जानामि आण मे त्थ न विज्जति ।
मुद्ध मुद्धाधिपातो च जिनान हेत दस्सन ॥ १४ ॥

१ म–°मत्थकामिनी. २ म०–बुद्ध. ३ म०–मुद्धाभिपाते. ४ म– च. ५ म०–भोति ६ म०–मुण अह एत. ७ म०–एत्थ ८–८ म०–मुद्धनि मुद्धातिपाते. ९ सी०–जनाग १० म०–इ'त्थ, हे'त्थ

९८६ उत्रस्त आणि दु खित झालेल्या बावरीला पाहून त्याची हितेच्छु देवता त्याजपाशीं येऊन म्हणाली— ( ११ )

९८७. " तो ब्राह्मण डोकें म्हणजे काय, हें जाणत नाहीं. तो दांभिक व धनलोभी होय. त्याला डोक्याविषयीं व डोक्याच्या फुटण्याविषयीं ज्ञान नाहीं " ( १२ )

९८८ ( बावरि– ) भवति देवते, तर मग हें तू जाणत आहेस; आणि मी हेंच तर विचारीत आहे, तेव्हा तें मला सांग. डोकें आणि डोक्याचें फुटणें कोणतें हें तुजपासून मला ऐकू दे. ( १३ )

९८९. ( देवता– ) मी देखील तें जाणत नाहीं. त्याचें मला ज्ञान नाहीं. कारण डोकें आणि डोकें फुटणें हें जिन तेवढे जाणतात. (१४)

९९० अथ को चरहि जानाति अस्मिं पुथविमण्डले ।
मुद्धं मुद्धाधिपातं च तं मे अक्खाहि देवते ॥ १५ ॥

९९१ पुरा कपिलवत्थुम्हा निक्खन्तो लोकनायको ।
अपच्चो ओक्काकराजस्स सक्यपुत्तो पभंकरो ॥ १६ ॥

९९२ सो हि ब्राह्मण सम्बुद्धो सब्बधम्मान पारगू ।
सब्बाभिञ्ञाबलप्पत्तो सब्बधम्मेसु चक्खुमा ।
सब्बधम्मक्खयं पत्तो विमुत्तो उपधिसंखये ॥ १७ ॥

९९३ बुद्धो सो भगवा लोके धम्मं देसेति चक्खुमा ।
तं त्वं गन्त्वान पुच्छस्सु सो ते तं ब्याकरिस्सति ॥ १८ ॥

१ म०—पथवि २ म०—मुद्धातिपातं ३ म०—सब्बकम्मक्खयं ४ म०—उपधिक्खये ५ म० देसेसि ६ सी०—तं ७ म० ॰याकरिस्सति.

९९० (बावरि—) तर मग या पृथ्वीमंडलावर डोकें आणि डोकें फुटणें म्हणजे काय हें जाणणारा असा कोण आहे तें, हे देवते, मला सांग (१५)

९९१ (देवता—) कपिलवस्तुनगराहून निघालेला लोकनायक, इक्ष्वाकुराजवंशज व (जगाला) प्रकाशित करणारा असा शाक्यपुत्र आहे (१६)

९९२ हे ब्राह्मणा, तो संबुद्ध, सर्व धर्मांत पारंगत, सर्वाभिज्ञाबल पावलेला, सर्व धर्मांविषयीं डोळस, सर्व धर्मांच्या अंताला गेलेला आणि उपाधींचा नाश करून मुक्त झालेला आहे (१७)

९९३ तो चक्षुष्मान्, बुद्ध, भगवान् लोकांना धर्मोपदेश करीत आहे तेथें जाऊन त्याला हे विचार, म्हणजे तो तें तुला समजावून सांगेल (१८)

९९४ सबुद्धो ति वचो सुत्वा उदग्गो बावरि अहु ।
सोकस्स तनुको आसि पीतिं च विपुल लभि ॥ १९ ॥

९९५ सो बावरि अत्तमनो उदग्गो । त देवत पुच्छति वेदजातो ।
कतमम्हि गामे निगमम्हि वा पुन । कतमम्हि वा जनपदे लोकनाथो
यत्थ गन्त्वा नमस्सेमु संबुद्ध दिपदुत्तमं ॥ २० ॥

९९६ सावत्थिय कोसलमन्दिरे जिनो । पहूतपञ्ञो वरभूरिमेधसो ।
सो सक्यपुत्तो विधुरो अनासवो । मुद्धाधिपातस्स विदू नरासभो ॥ २१ ॥

९९७ ततो आमन्तयी सिस्से ब्राह्मणे मन्तपारगे ।
एथ माणव अक्खिस्स सुणोथ वचन मम ॥ २२ ॥

१ म०—नमस्सेम २ म०—द्वि°, ३ म०—°यि ४ म०—एथ.

९९४. सबुद्ध हा शब्द ऐकल्यावरोबर बावरि हर्षित झाला, त्याचा शोक कमी झाला, आणि त्याला अत्यन्त आनंद वाटला. (१९)

९९५ त्या हर्षित, आनंदित आणि सन्तुष्ट बावरीनें त्या देवतेला विचारलें, ' तो लोकनायक कोणत्या गावात, शहरात किंवा प्रदेशात राहतो की, जेथें जाऊन त्या द्विपदोत्तम सबुद्धाला आम्ही नमस्कार करू शकू ' ( २० )

९९६. तो विपुलप्रज्ञ, विपुलश्रेष्ठबुद्धि, अप्रतिम धुरीण, अनाश्रव, मूर्धाधिपात जाणणारा, मनुष्यर्षभ, शाक्यपुत्र, जिन कोसल देशातील पवित्र ठिकाणीं श्रावस्ती येथें राहतो. ( २१ )

९९७. त्यावर बावरि आपल्या मत्रपारग ब्राह्मण शिष्याना म्हणाला, " माणवहो, या, मी तुम्हाला सागतों, माझें वचन ऐका ! ( २२ )

१००२ सचे अगार अज्झावसति विजेय्य पठविं इम।
अदण्डेन असत्थेन धम्मेनमनुसासति ॥ २७ ॥
१००३ सचे च सो पब्बजति अगारा अनगारिय।
विवत्तच्छदो सम्बुद्धो अरहा भवति अनुत्तरो ॥ २८ ॥
१००४ जातिं गोत्तं च लक्खणं मन्ते सिस्से पुनापरे।
मुद्धं मुद्धाधिपातं च मनसा येव पुच्छथ ॥ २९ ॥
१००५ अनावरणदस्सावी यदि बुद्धो भविस्सति।
मनसा पुच्छिते पञ्हे वाचाय विस्सजेस्सति ॥ ३० ॥
१००६ बावरिस्स वचो सुत्वा सिस्सा सोळस ब्राह्मणा।
अजितो तिस्समेत्तेय्यो पुण्णको अथ मेत्तगू ॥ ३१ ॥

१ म०, Fsb –आवसति २ म० – विवटच्छदो, सी०–विवत्तच्छद्दो ३ म०–विसज्जिस्सति, विस्सज्जिस्सति

१००२. जर तो घरातच राहिला, तर ही पृथ्वी जिंकून तिचें अदण्डानें, अशस्त्रानें आणि धर्मानें पालन करतो (२७)

१००३ पण जर तो गृहत्याग करून अनागारिक प्रव्रज्या घेईल, तर अज्ञानावरण दूर सारणारा अर्हन् आणि अनुत्तर असा सम्बुद्ध होतो. (२८)

१००४ माझा जन्म, गोत्र, लक्षण, वेदविद्या, आणि माझे शिष्य कितीं तें, आणि डोकें व डोकें फुटणें, या सर्व गोष्टी तुम्ही त्याला मनातल्या मनातच विचारा (२९)

१००५ तो जर अनावरणज्ञानी बुद्ध असेल, तर तुम्हीं मनातल्या मनात विचारलेल्या प्रश्नांची उत्तरें तोंडानें देईल. (३०)

१००६. बावरीचें हें बोलणें ऐकून त्याचे सोळा ब्राह्मण शिष्य, —अजित, तिस्स-मेत्तेय, पुण्णक आणि मेत्तगू, (३१)

१००७ धोतको उपसीवो च नन्दो चं अथ हेमको ।
तोदेय्यकप्पा[1] दुभयो जातुकण्णी च पण्डितो ॥३२॥
१००८ भद्रावुधो[2] उदयो च पोसालो चापि ब्राह्मणो ।
मोघराजा च मेधावी पिंगियो च महा इसि ॥३३॥
१००९ पथेकगणिनो सब्बे सब्बलोकस्स विस्सुता ।
झायी झानरता धीरा पुब्बवासनवासिता ॥३४॥
१०१० बावरिं अभिवादेत्वा कत्वा च न पदक्खिणं ।
जटाजिनधरा सब्बे पक्कामुं उत्तरामुखा ॥३५॥
१०११ मूळ्कस्स[3] पतिट्ठान पुरिमं माहिस्सतिं[4] तदा ।
उज्जेनिं चापि गोनद्धं[5] वेदिसं वनसव्हय ॥३६॥

---

१ म०—°कप्प. २ सी०—भद्रायुधो. ३ सी०, री०—अळकस्स, ४ म०—पुरि माहिस्सति. ५ म०—गोनद्दं.

१००७. धोतक, उपसीव, नन्द, आणि हेमक, तोदेय्य आणि कप्प हे दोघे, आणि पंडित जातुकण्णी, (३२)

१००८. भद्रावुध, उदय आणि पोसाल ब्राह्मण, बुद्धिमान मोघराजा आणि महर्षि पिंगिय—(३३)

१००९. हे सर्व आपापल्या ब्राह्मणगणाचे पुढारी, सर्व लोकांत प्रसिद्ध, समाधिसंपन्न, ध्यानरत, सुज्ञ आणि पूर्वजन्मीं कृतपुण्य, (३४)

१०१०. जटा आणि अजिन चर्म धारण करणारे, असे ते सर्व बावरीला नमस्कार व प्रदक्षिणा करून उत्तर दिशेच्या बाजूनें चालते झाले. (३५)

१०११. तेव्हा प्रथमतः ते मूळकाच्या प्रतिष्ठानाला नतर माहिष्मती राजधानीला आले; तेथून (अनुक्रमें) उज्जयिनीला, गोनद्धाला, विदिशेला आणि वनसा नांवाच्या नगराला, (३६)

१०१२ कोसम्बिं चापि साकेतं सावत्थिं च पुरुत्तमं ।
सेतव्यं कपिलवत्थुं कुसिनारं च मंदिरं ॥३७॥
१०१३ पावं च भोगनगरं वेसालिं मागधं पुरं ।
पासाणकं चेतियं च रमणीयं मनोरमं ॥३८॥
१०१४ तसितो वुदकं सीतं महालाभं'व वाणिजो ।
छायं घम्माभितत्तो व तुरिता पब्बतमारुहुं ॥३९॥
१०१५ भगवा च तम्हि समये भिक्खुसंघपुरक्खतो ।
भिक्खून धम्मं देसेति सीहो व नदती वने ॥४०॥
१०१६ अजितो अद्दस संबुद्धं वीतरंसी व भानुमं ।
चन्दं यथा पन्नरसे पारिपूरिं उपागतं ॥४१॥

१ म०–कपिल°. २ म०–च ओदकं, ३ नि०–महालाभं. ४ सी०–°भारुहं, °मारुहुं, अ०–°मारुहिं. ५ म०–नदति. ६ म०–अद्द. ७ म०–जितरंसं, सतरंसिं, म० पीतरंसिं, ९ सी०– पण्णरसे. १० म०–परिपूरं.

१०१२. कौशाम्बीला, साकेताला, आणि सर्व नगरांत श्रेष्ठ अशा श्रावस्तीला, सेतव्याला, कपिलवस्तूला, कुसिनारा-मंदिराला, (३७)

१०१३. पावाला, भोगनगराला, वैशालीला, मगधपुराला ( राजगृहाला ), आणि रमणीय व मनोरम पाषाणक चैत्याला ते आले. (३८)

१०१४. तान्हेलेला जसा पाण्याकडे जातो, वाणी जसा मोठ्या फायद्याकडे जातो, व उन्हानें सन्तप्त झालेला जसा छायेकडे जातो, तसे ते त्वरेनें त्या पर्वतावर चढले. (३९)

१०१५. भिक्षुसंघानें पुरस्कृत असा भगवान् त्या समयीं अरण्यांत गर्जना करणाऱ्या सिंहाप्रमाणें भिक्षूंना धर्मोपदेश करीत होता. (४०)

१०१६. ( शांतपणें प्रकाशणाऱ्या ) वीतरश्मि सूर्यासारख्या आणि पौर्णिमेला पूर्णतेला गेलेल्या चन्द्रासारख्या त्या संबुद्धाला अजितानें पाहिलें. (४१)

१०१७ अथऽस्स गत्ते दिस्वान पेरिपूर च व्यञ्जन।
एकमन्तं ठितो हट्ठो मनोपञ्हे अपुच्छथ ॥४२॥

१०१८ आदिस्स जम्मन ब्रूहि गोत्त ब्रूहि सलक्खण।
मन्तेसु पारमिं ब्रूहि कति वाचेति ब्राह्मणो ॥४३॥

१०१९ वीस वस्ससत आयु सो च गोत्तेन बावरि।
तीणस्स लक्खणा गत्ते तिण्ण वेदान पारगू ॥४४॥

१०२० लक्खणे इतिहासे च सनिघण्डुसकेटुभे।
पञ्च सतानि वाचेति सधम्मे पारमिं गतो ॥४५॥

१–१ म०—परिपुण्ण च ब्यञ्जन, परिपूर वियजन २ म०—अप्पत
३ म०—तीणिऽस्स ४ म०—केटुभे ५ म०—सद्धम्मे

१०१७ आणि त्याच्या गात्रावर परिपूर्ण लक्षणें पाहून तो एका बाजूस उभा राहिला, आणि हर्षित होऊन त्यानें आपल्या मनातल्या मनात बुद्धाला प्रश्न विचारले—(४२)

१०१८ प्रथमत त्याचें (बावरीचें) वय—जन्म केव्हा झाला तें—सांग, आणि मग गोत्र आणि लक्षणें सांग नतर वेदाध्ययनातील पारगतता, आणि तो किती ब्राह्मणाना शिकवितो तें सांग (४३)

१०१९. (भगवान्—) त्याचें वय एकशेंवीस वर्षें, गोत्र बावरि, त्याच्या गात्रावर तीन लक्षणें आहेत, आणि तो तीन वेदात पारगत आहे (४४)

१०२० तो लक्षणज्ञानात, इतिहासात, निघटून व केटुभातेंहि पारगत आहे. स्वधर्मात पारगत असा तो पाचशें विद्यार्थ्यांना वेद शिकवितो (४५)

१ या शब्दावरील षेळनुसार दिलेली टीप पहा (पान १८०)

१०२१ लक्खणानि पेरिचिय्यं बावरिस्स नरुत्तम ।
तण्हच्छिद पकासेहि मा नो कंखायितं अहु ॥४६॥

१०२२ मुखं जिव्हाय छादेति उण्णस्स भमुकन्तरे ।
कोसोहितं वत्थगुय्हं एवं जानाहि माणव ॥४७॥

१०२३ पुच्छं हि किञ्चि असुणन्तो सुत्वा पञ्हे वियाकते ।
विचिन्तेति जनो सब्बो वेदजातो कतञ्जली ॥४८॥

१०२४ को नु देवो वा ब्रह्मा वा इन्दो वापि सुजंपति ।
मनसा पुच्छिते पञ्हे कमेतं पटिभासति ॥ ४९ ॥

१ म०—स मनच्छितं, म०—तण्हच्छितं. २ म०—सं च, त, Fsb—कन्चि. ३ सी०—°ली. ४ सी० न,Fsb , म०—वा. ५ सी०—वाऽपि. ६ सी०-°सी.

१०२१. (अजित—) हे तृष्णेचा नाश करणाऱ्या नरोत्तमा, बावरीच्या शरिरावर कोणती लक्षणें आहेत हें मला व आम्हांस (तुझ्याविषयीं) शंका राहू देऊ नकोस. (४६)

१०२२. (भगवान् -) तो जिभेनें आपला चेहरा झाकूं शकतो; त्याच्या भिंवयांच्या मध्यमार्गी लोम आहेत व, हे माणवा, याचें वस्त्रगुह्य कोशावहित आहे असें समज. (४७)

१०२३. प्रश्न केलेले ऐकू येत नाहींत व उत्तरें तेवढीं ऐकू येतात, (असें पाहून) तेथें जमलेले लोक आनंदित होऊन व हात जोडून विचार करू लागले कीं, (४८)

१०२४. हे प्रश्न विचारणारा कोणता देव, ब्रह्मा किंवा सुजंपति इन्द्र ? हा (भगवान्) मनातल्या मनात विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें कोणास देतो ? (४९)

१०२५ मुद्धं मुद्धाधिपात च बावरि परिपुच्छति ।
त व्याकरोहि भगवा कखं विनय नो इसे ॥ ५० ॥

१०२६ अविज्जा मुद्धा ति[1] जानाहि[2] विज्जा मुद्धाधिपातिनी ।
सद्धासतिसमाधीहि छन्दविरियेन संयुता ॥ ५१ ॥

१०२७ ततो वेदेन महता संथंभित्वान[3] माणवो ।
एकसं अजिनं कत्वा पादेसु सिरसा पति ॥ ५२ ॥

१०२८ बावरि ब्राह्मणो भोतो सह सिस्सेहि मारिस ।
उदग्गचित्तो सुमनो पादे वन्दति चक्खुम[4] ॥ ५३ ॥

---

१ सी०–मुद्धा. २–२ म०–विजानाहि. ३ सी०–सथम्भित्वान, संथंभेत्वान. ४ सी०, म०, Fsb.–चक्खुमा.

---

१०२५. (अजित–) हे भगवन्, बावरि डोकें व डोकें फुटणें म्हणजे काय हें विचारतो. हे ऋषे, त्याचें उत्तर देऊन आमची शका दूर कर (५०)

१०२६. "डोकें म्हणजे अविद्या, आणि डोकें फोडणारी म्हणजे श्रद्धा, स्मृति, समाधि, कुशलच्छंद व उत्साह यांनी सयुक्त अशी विद्या (प्रज्ञा) असें समज." (५१)

१०२७. तेव्हा त्या अजित माणवानें मोठ्या आनंदानें, मनाचा निर्धार करून व अजिनचर्म एकाच खांद्यावरून पांघरून भगवताच्या पायावर आपलें डोकें ठेवलें. (५२)

१०२८. (अजित-) हे मारिषा, हे चक्षुष्मन्, बावरि[1] ब्राह्मण, शिष्यांसह, हर्षित आणि आनंदित होऊन तुझ्या पायां पडत आहे. (५३)

---

१ शिष्याच्या रूपानें.

१०२९ सुखितो बावरि होतु सह सिस्सेहि ब्राह्मणो ।
त्वं चापि सुखितो होहि चिरं जीवाहि माणव ॥ ५४ ॥

१०३० बावरिस्स च तुम्हं वा सब्बेसं सब्बसंसयं ।
कतावकासा पुच्छव्हो यं किञ्चि मनसिच्छथ ॥ ५५ ॥

१०३१ सम्बुद्धेन कतोकासो निसीदित्वान पञ्जलि ।
अजितो पठमं पञ्हं तत्थ पुच्छि तथागतं ॥ ५६ ॥

वत्थुगाथा निट्ठिता ।

---

१ म०--चापि २ सी०, म०—°ली. ३ म०-°कथा निट्ठिता °कथ निट्ठित.

---

१०२९. (भगवान्-) हे माणवा, बावरि ब्राह्मण शिष्यासह सुखी होवो, आणि तूही सुखी व चिरंजीव हो (५४)

१०३० बावरीला, तुला किंवा तुम्हा सर्वांना ज्या शंका असतील त्या सर्व विचारण्यास मी मोकळीक देतों, तुमच्या मनात जें असेल तें तुम्ही विचारा. ५५

१०३१. सम्बुद्धानें मोकळीक दिली असता अजितानें तेथें खालीं बसून व हात जोडून तथागताला प्रथमत प्रश्न विचारला (५६)

प्रास्ताविक गाथा समाप्त

## ५६

### [ २. अजितमाणवपुच्छा ]

१०३२ केनस्सु निवुतो लोको (इच्चायस्मा अजितो) केनस्सु नप्पकासति।
किस्साभिलेपनं ब्रूसि किं सु तस्स महब्भयं ॥ १ ॥

१०३३ अविज्जाय निवुतो लोको (अजिता ति भगवा) वेविच्छा पमादा नप्पकासति।
जप्पाभिलेपनं ब्रूमि दुक्खं अस्स महब्भयं ॥ २ ॥

१०३४ सवन्ति सब्बधी सोता (इच्चायस्मा अजितो) सोतानं किं निवारणं।
सोतानं संवरं ब्रूहि केन सोता पिधिय्यरे ॥ ३ ॥

१ सी०-किस्साभिसेचनं. २ म०, सी०-विविच्छा, वेवच्छा. ३ म०-पिधिय्यरे.

## ५६

### [ २. अजितमाणवपुच्छा (१) ]

१०३२ हें जग कशानें झाकलें जातें— असें आयुष्मान् अजित म्हणाला—तें कशामुळें प्रकाशत नाहीं, याचें अभिलेपन कोणतें म्हणतोस ? आणि याला भय कोणतें ? ( १ )

१०३३. जग अविद्येनें झाकलें गेलें आहे—हे अजिता, असें भगवान् म्हणाला— विचिकित्सेमुळें आणि प्रमादामुळें तें प्रकाशत नाहीं, कामुकतेची याचना हें त्याचें अभिलेपन, आणि दुःख हें त्याला मोठें भय होय असें मी म्हणतों ( २ )

१०३४ सर्वत्र प्रवाह वाहत आहेत—असें आयुष्मान् अजित म्हणाला—त्या प्रवाहाचें निवारण कोणतें ? प्रवाहाचें नियमन कोणतें तें सांग, व ते प्रवाह कशामुळें बंद होतात ? ( ३ )

१ ९४१ व्या गाथेंतील ह्या शब्दाचा अर्थ व त्यावरील टीप पहा.
२. टीकाकार ' तृष्णा ' असा अर्थ करतो.

१०३५ यानि सोतानि लोकस्मिं(अजिता ति भगवा) सति तेस निवारण।
. सोतान संवर ब्रूमि पञ्ञायेते पिथिय्यरे ॥ ४ ॥
१०३६ पञ्ञा चेव सती च (इच्चायस्मा अजितो) नामरूप च मारिस ।
एत मे पुट्ठो पब्रूहि कत्थेत उपरुज्झति ॥ ५ ॥
१०३७ य एत पञ्ह अपुच्छि अजित त वदामि ते ।
यत्थ नाम च रूप च असेस उपरुज्झति ।
विञ्ञाणस्स निरोधेन एत्थेत उपरुज्झति ॥ ६ ॥
१०३८ ये च सखतधम्मासे ये च सेखा पुथू इध ।
तेस मे निपको इरिय पुट्ठो पब्रूहि मारिस ॥ ७ ॥

१ म०-सति. २ म०-यं च, नि०-चारि. ३ म०-एव,नि०-एतं. ४ नि०, अ०-सङ्खातधम्मासे.

१०३५. जगात जे प्रवाह आहेत—हे अजिता, असें भगवान् म्हणाला—त्याचें निवारण स्मृति होय. तीच प्रवाहाचें नियमन असें मी म्हणतों व प्रज्ञेमुळें ते बंद होतात. ( ४ )

१०३६. हे मारिषा, प्रज्ञा आणि स्मृति—असें आयुष्मान् अजित म्हणाला—आणि नामरूप यांचा निरोध कोठें होतो हें मी विचारतों, तें मला सांग. ( ५ )

१०३७. हे अजिता, हा जो तू प्रश्न विचारलास, त्याचें मी तुला उत्तर देतों; जेथें नाम आणि रूप पूर्णपणें निरोध पावतात, तें मी तुला सांगतों—विज्ञानाच्या निरोधानें यांचा निरोध होतो. ( ६ )

१०३८ इहलोकीं जे अनेक सर्व धर्मांचें ( वस्तूंचें ) यथार्थ ज्ञान असलेले असे (अर्हन्त) आणि शैक्ष्य आहेत, त्यामध्यें तू कुशल आहेस; तेव्हा त्यांची वागणूक कशी असते हें मी तुला विचारतों तें, हे मारिषा, मला सांग. ( ७ )

१०३९ कामेसु नाभिगिज्झेय्य मनसाऽनाविलो सिया।
कुसलो सब्बधम्मानं सतो भिक्खु परिब्बजे ति ॥ ८ ॥
अजितमाणवपुच्छा निट्ठिता।

५७

[ ३. तिस्समेत्तेय्यमाणवपुच्छा ( २ ) ]

१०४० को'ध सन्तुसितो लोके (इच्चायस्मा तिस्सो मेत्तेय्यो) कस्स
नो सन्ति इञ्जिता।
को उभन्तमभिञ्ञाय मज्झे मन्ता न लिप्पति।
कं ब्रूसि महापुरिसो ति को इध सिब्बनिमच्चगा ॥ १ ॥

१ म०-तिस्समेत्तेय्यो, २ Fsb-उभन्त°, ३ म०-लिंपति, ४ म०-सिप्पनि°, सिब्बिनि°, ५ म० °मज्झगा.

१०३९ कामोपभोगाचा लोभ धरू नये, मनानें पवित्र व्हावें सर्व धर्मांत कुशल व स्मृतिमान् होऊन त्यानें भिक्षु म्हणून प्रव्रज्या घ्यावी. ( ८ )

अजितमाणवपुच्छा समाप्त

५७

[ ३. तिस्समेत्तेय्यमाणवपुच्छा ( २ ) ]

१०४० या जगांत सन्तुष्ट कोण ?—असें आयुष्मान् तिस्समेत्तेय्य म्हणाला—कोणाला प्रकंप नाहींत ? दोन्ही अन्त जाणून प्रज्ञेमुळें मध्याला चिकटून कोण राहत नाहीं ? व महापुरुष कोणाला म्हणतोस ? व या जगांत तृष्णेच्या (सिब्बनी) पार कोण जातो ? (१)

१०४१ कामेसु ब्रह्मचरियवा (मेत्तेय्या ति भगवा) वीततण्हो सदा सतो ।
सखाय निब्बुतो भिक्खु तस्स नो सन्ति इञ्जिता ॥ २ ॥

१०४२ सो उभन्तमभिञ्ञाय मज्झे मन्ता न लिप्पति ।
तं ब्रूमि महापुरिसो ति सो इध सिब्बनिमच्चगा ति ॥ ३ ॥

तिस्समेत्तेय्यमाणवपुच्छा निट्ठिता ।

---

१०४१. कामोपभोगाचा त्याग करून, ब्रह्मचारी राहून—हे मेत्तेय्या, असें भगवान् म्हणाला—जो वीततृष्ण आणि सदोदित स्मृतिमान् होतो, तो भिक्षु प्रज्ञेच्या योगें शांत ( सन्तुष्ट ) होतो, त्याला प्रकंप नाहींत. ( २ )

१०४२. तो दोन्ही अन्त जाणून प्रज्ञेमुळें मध्याला चिकटून राहत नाहीं, त्यालाच मी महापुरुष म्हणतों, आणि या जगात तोच तृष्णेच्या पार जातो. ( ३ )

तिस्समेत्तेय्यमाणवपुच्छा समाप्त

## ५८

## [ ४. पुण्णकमाणवपुच्छा ( ३ ) ]

१०४३ अनेजं मूलदस्साविं (इच्चायस्मा पुण्णको) अत्थि पञ्हेन आगमं।
किं-निस्सिता इसयो मनुजा खत्तिया ब्राह्मणा देवतानं
यञ्ञमकप्पयिंसु पुथू इध लोके।
पुच्छामि तं भगवा ब्रूहि मे तं ॥ १ ॥
१०४४ ये केचि'मे इसयो मनुजा (पुण्णका ति भगवा) खत्तिया
ब्राह्मणा देवतानं यञ्ञमकप्पयिंसु पुथू इधलोके।
आसिंसमाना पुण्णक इत्थभावं। जरं सिता यञ्ञमकप्पयिंसु२

१ म०—अनेज २—३ म०—पञ्हेनमागम. ३ म०—आगमि, आगमिं ४ Fsb [इसयो मनुजा] .. [पुथु इध लोके] ५ Fsb —ब्राह्मणा च. ६ म०—°मकप्पिंसु. ७ म०—इत्थत्त.

## ५८

## [ ४. पुण्णकमाणवपुच्छा ( ३ ) ]

१०४३ अप्रकम्प्य आणि संसाराचें मूळ जाणणारा, त्याजपाशीं—असें आयुष्मान् पुण्णक म्हणाला—प्रश्न विचारण्याच्या हेतूनें आलों आहें. कशानें बद्ध झालेले ऋषि, क्षत्रिय, ब्राह्मण किंवा इतर माणसें देवताना उद्देशून या जगात भिन्न भिन्न यज्ञ करतात, तें मी विचारतों. हे भगवन्, तें मला सांग. ( १ )

१०४४. जे कोणी ऋषि—हे पुण्णका, असें भगवान् म्हणाला—क्षत्रिय, ब्राह्मण किंवा इतर माणसें देवताना उद्देशून या जगात भिन्न भिन्न यज्ञ करतात ते, हे पुण्णका, इहलोकीं पुनर्जन्माची अपेक्षा करतात व जरेनें बद्ध होऊनच यज्ञ करतात. (२)

१०४५ ये केचि॰मे इसयो मनुजा ( इच्चायस्मा पुण्णको ) खत्तिया.
पे॰.. इध लोके
कच्चि सु ते भगवा यञ्ञपथे अप्पमत्ता। अतारुं जातिं च
जरं च मारिस।
पुच्छामि तं भगवा ब्रूहि मे तं ॥ ३ ॥
१०४६ आसिंसन्ति थोमयन्ति अभिजप्पन्ति जुहन्ति ( पुण्णका ति
भगवा ) कामाभिजप्पन्ति पटिच्च लाभं।
ते याजयोगा भवरागरत्ता। नातरिंसु जातिजरं ति ब्रूमि॥४॥

१ म॰—किंचि, किञ्चि, कचि. २ म॰—अतरु. ३ सी॰, म॰—जहन्ति, (नि॰=हेन्ति). ४ सी॰—लोभ. ५ म॰—याच

१०४५. जे कोणी ऋषि—असें आयुष्मान् पुण्णक म्हणाला—क्षत्रिय, ब्राह्मण किंवा इतर माणसें देवताना उद्देशून या जगात भिन्न भिन्न यज्ञ करतात ते, हे भगवन्, हे मारिषा, यज्ञकर्मात सावध राहून जन्म आणि जरा तरून जातात काय? हे भगवन्, मी तुला विचारतों, तें मला सांग. (३)

१०४६ ते अपेक्षा करतात, स्तुति करतात, काकुळतीनें याचना करतात, हवन करतात—हे पुण्णका, असें भगवान् म्हणाला—आपल्या लाभासाठीं कामसुखाची काकुळतीनें याचना करतात ते यज्ञात गुन्तलेले भवलोभासक्त जन्म आणि जरा तरून जात नाहींत, असें मी म्हणतों (४)

